शरत्-साहित्य माला–१७

# पंडित महाशय

[ डॉ. शरच्चंद्र चतर्जी यांच्या मूळ बंगाली कादंबरीवरून ]

: अनुवादक :

भा. वि. वरेरकर

: प्रकाशक :

नवभारत प्रकाशन-संस्था, मुंबई ४

# १

कुंज वैष्णवाची धाकटी बहीण कुसुम हिचा बालपणचा इतिहास इतका ओंगळ होता कीं त्या साऱ्या गोष्टी आठवल्या कीं ती लाजेनें चुरमार होऊन जात असे. ती दोन वर्षांची होती तेव्हां तिचा बाप वारला. भिक्षा मागून आईनें त्या मुलाचें आणि मुलीचें प्रतिपालन केलें. ती पांच वर्षांची होती त्यावेळीं तिचें रूप ध्यानीं घेऊन बाडलग्रामच्या सुसंपन्न असलेल्या गौरदास अधिकारी या गृहस्थानीं आपला मुलगा वृंदावन याजबरोबर तिचें लग्न लावून दिलें. लग्नानंतर थोड्याच दिवसांनीं कुसुमच्या विधवा आईच्या चारित्र्याबद्दल बऱ्याच बातम्या पसरल्या, त्यामुळें कुसुमला घालवून देऊन गौरदास यानें आपल्या मुलाचें दुसऱ्या मुलीशीं लग्न लावून दिलें.

दु:खानें गांजलेली असली तरी कुसुमची आई फार अभिमानी होती. रागारागानें ती मुलीला घेऊन दुसऱ्या गांवीं गेली आणि त्याच महिन्यांत तिनें एका बैराग्याबरोबर मुलीचा * कंठीबदल विधी उरकून घेतला. पण

---

* बंगाल्यांत श्रीकृष्णचैतन्यांच्या संप्रदायांत जे लोक सामील झाले त्यांच्यांतून ‘ वैष्णव ’ ही एक स्वतंत्र जात निर्माण झाली. बंगाली भाषेंत या शब्दाचा उच्चार ‘ बोष्टम ’ असा करतात. या जातींत चातुर्वर्ण्य मानला जात नाहीं. वैदिक किंवा पौराणिक लग्नविधीप्रमाणें जरी त्यांचीं लग्नें होत असलीं तरीही ‘ कंठीबदल ’ विधी—म्हणजे स्त्री आणि पुरुष यांनीं दीक्षेच्या वेळीं

सहा महिन्यांच्या आंतच तो बैरागीही वैकुंठवासी झाला. तो कोण होता, त्याचें गांव कुठें होतें, तें कुसुमच्या आईखेरीज दुसऱ्या कुणालाच माहीत नव्हतें. कुंजलासुद्धा माहीत नव्हतें. या विधीच्या वेळीं तिनें कुणालाच आपल्याबरोबर नेलें नव्हतें. कंठीबदलविधी खरोखरच झाला होता कीं नुसता तो झाल्याचें सांगण्यांत आलें होतें तें सुद्धां कुणालाही निश्चितपणें सांगतां आलें नसतें.

कुसुमला सात वर्षें पुरीं होईपर्यंतच हे सारे प्रकार होऊन गेले होते. तेव्हांपासून कुसुम विधवा समजली जात होती. तिच्या बालपणचा असा हा संक्षिप्त इतिहास होता. सध्यां ती सोळा वर्षांची तरुणी होती. तिचें सौंदर्य नुसतें ओसंडून जात होतें. गुणांनींही ती तशीच होती. गृहकृत्यांत अत्यंत निपुण होती. शिवाय तिला लिहिता वाचतांही येत होतें. चांगल्या मोठ-मोठ्यांच्या घरीं सुद्धां तिच्या तोडीची मुलगी क्वचितच दिसून आली असती.

तिकडे वृंदावनचा बाप मयत झाला होता. त्याची दुसरी बायकोही मेली होती आणि त्यावेळीं त्याचें वयही पंचवीस सव्वीस वर्षांपेक्षां जास्त नव्हतें. आतां कुसुमला पुनः घरीं घ्यायला तो तयार झाला होता. त्यासाठीं कुंजला रोख पन्नास रुपये, पांच जोड्या धोतरें, उपरणीं आणि कुसुमला पांच भार सोनें आणि शभर भार चांदीचे दागिने द्यायला तो तयार झाला होता. गरीब बिचाऱ्या कुंजच्या जिभेला पाणी सुटलें होतें, कुसुमनें संमति द्यावी अशी त्याची फार इच्छा होती पण कुसुम मात्र त्या बाबतींत एक शब्दसुद्धां ऐकायला तयार नव्हती.

त्याचें कारण असें होतें—त्या दोघांना आईबाप नव्हते. ज्या लहानशा घरांत हीं दोघें बहिणभावंडें रहात होतीं तें घर गांवांतल्या ब्राह्मणवाडींतच होतें. लहानपणापासून कुसुम ब्राह्मणांच्या मुलीबरोबरच वाढली होती,

---

धारण केलेली तुळशीची माळ परस्परांनीं बदलली. म्हणजे तो एक प्रकारचा विवाहविधी झाला असें समजण्यांत येतें. पुनः ही कंठी ( माळ ) फिरून बदलली कीं तो विवाह मोडला जातो. ' वैष्णव ' ही जात कोकणांतील भिक्षा मागणाऱ्या ' ठाकूर ' या जातीसारखी आहे. बहुधा त्यांचा चरितार्थ भजन करून भिक्षा मागण्यावरच अवलंबून असतो.

त्यांच्याबरोबरच पंडितजीच्या पाठशाळेंत शिकली होती, त्यांच्याबरोबरच खेळली होती, बागडली होती, आज तागायत त्याच तिच्या सख्यासोबतीणी होत्या, म्हणूनच या प्रस्तावामुळें तिच्या सर्वांगावर कांटा उभा राहिला.

मलेरिया आणि महामारीनें पछाडलेल्या वंगदेशांत विधवा व्हायला कुणा मुलीला वेळ लागत नसे. तिच्या बालमैत्रिणींपैकीं बऱ्याच जणींच्या हातांतल्या बांगड्या पिचल्या होत्या आणि कपाळचें कुंकूं पुसून त्या आपल्या माहेरीं 'मागें' आल्या होत्या. याच मुली तिच्या दृष्टीनें तिला आदर्शवत् होत्या. छे! छे! दादाचें म्हणणें कबूल केलें तर या जन्मीं हें काळें तोंड कांहीं कुणाला दाखवतां यायचें नाहीं!

कुंज म्हणाला, "तूं कबूली दे ताई. तसं पाहिलं तर वृंदावनच तुझा खरा नवरा आहे."

"खरा खोटा मी जाणत नाहीं दादा," कुसुम अतिशय रागावून म्हणाली, "मी विधवा आहें एवढेंच मी जाणतें. काय म्हणून होय म्हणूं? हवंतसं वागायला मी काय कुत्र्यामांजराच्या जातीची आहें? आज लग्न, उद्यां कंठीबदल—पुनः लग्न, पुनः कंठीबदल! जा, यापुढं असली कांहीं गोष्ट माझ्यासमोर काढूं नकोस. वाडलगांवच्या कुणाचाही आमचा कांहीं संबंध नाहीं. माझा नवरा मेला—मी विधवा आहें."

भोळा बिचारा कुंज, यापुढें काय बोलणार होता. आपल्या सुशिक्षित आणि तेजस्वी बहिणीसमोर तो सहजच नांगी टाकीत असे. त्याला वाटत होतें तें वेगळेंच होतें. त्याला वाटे, बिचारी दुःखीकष्टी—हें लहानसं घर—घराजवळची आंबेफणसाची लहानशी बाग—त्याखेरीज कसलाच आधार नाहीं! एवढा रोख पैसा आणि एवढ्या जोड्या धोतरउपरणीं, म्हणजे त्याच्या लेखीं कांहीं लहानसहान गोष्ट नव्हती. हा आमिषाचा प्रश्न बाजूला ठेवला तरीसुद्धां जिवाभावाच्या एकुलत्या एक बहिणीला चांगल्या स्थळीं नांदत असलेली पहावें आणि तिच्या सुखानें सुखी व्हावें असें त्याला वाटे.

कंठीबदलविधि त्यांच्या समाजांत चालू होता. त्याची आई ही भानगड करून बसली होती. पण ज्या अर्थी आतां ती मेली आणि कुसुमचा नवरा वृंदावन ज्यां अर्थी एवढा काकुळतीला येतो आहे, त्या अर्थी असलें हें भाग्य लाथाडायला कुसूम कां प्रवृत्त होते आहे हेंच त्याला कळत नव्हतें. प्रश्न होता

काय तो समाजांतील फौजदार छडीदारांचें मत घ्यायचा आणि ते सांगतील तो दंड द्यायचा. त्या खर्चाची जबाबदारी घ्यायला वृंदावन तयार होता. मग हा असला कंगालाचा संसार सोडून तिला एकदम महाराणी होऊन बसतां येणें शक्य होतें. किती वेडी आहे ही कुसुम! कुंजला वाटे, आपण तरी कुसूम असतां. रोज त्याचा हाच विचार चाले.

कुंज फेरीवाल्याचा धंदा करीत असे. एका मोठ्या पांटींत माळा, फण्या, डब्या, कुंकवाचे करंडे, तेलाचा मसाला, मुलासाठीं लहान मोठ्या बाहुल्या वगैरे जिन्नस, त्याचप्रमाणें कुसुमनें स्वतः तयार केलेले कशिद्याचे जिन्नस वगैरे घेऊन ती टोपली तो पांच सात गांवांत माथीं घेऊन फिरत असे. सारा दिवस विक्री करून जें मिळे तें सारें आणून बहिणीच्या हातीं देई. मुद्दल कायम ठेवून त्यांतल्या मिळकतींत कुसुम सारा संसार कसा चालवते तें त्याचें त्यालाच कळत नसे—कळून घ्यायचा तो कधीं प्रयत्नच करीत नसे.

आज सकाळीं फिरत फिरत तो वाडल गांवीं जाऊन पोहोंचला. वाटेंत वृंदावन भेटला, तो शेतावर जायला निघाला होता पण गेला नाहीं. आधीं जातीचा आणि त्यांतून नात्याचा—आग्रह करकरून त्यानें कुंजला आपल्या घरीं नेलें, हातपाय धुवायला पाणी दिलें आणि गुडगुडी भरून देऊन त्याचें स्वागत केलें. दुपारीं वृंदावनच्या आईनें चार प्रकारचे चार जिन्नस करून त्याला वाढले, आग्रह कर करून खायला घातलें आणि भर दुपारीं तो जायला निघाला असतां त्याला मुद्दाम राहवून घेतलें.

संध्याकाळीं कुंज घरीं आला. हातपाय धुऊन थोडे चणे चुरमुरे चघळीत चघळीत त्यानें ती सारी हकीकत बहिणीला सांगितली. हकीकत सांगून झाल्यावर तो म्हणाला, "खरोखरच एक गृहस्थ माणूस आहे तो. बाग, तलाव, शेतवाडी—कसला काहीं अभाव नाहीं, लक्ष्मी जशी कांहीं नांदते आहे घरांत!"

कुसुम मुकाट्यानें ऐकत होती. ती एक शब्दसुद्धां बोलली नाहीं.

आपल्या बोलण्याचा तिच्या मनावर परिणाम झाला आहे असे कुंजला वाटलें. वृंदावनच्या आईनें जेवायला काय काय केलें होतें, कसा कसा आपल्याला आग्रह केला होता, त्याची इत्थंभूत हकिकत सांगून तो म्हणाला, "नुसता कांहीं जेवायचाच आग्रह तिनं केला असं नव्हे! म्हणाली, अशा भर उन्हांतून गेलं तर डोकं दुखेल. आजारी पडायला होईल!—"

दादाच्या तोंडाकडे पाहून हंसत कुसुम म्हणाली, "सारा दिवसभर दादा एवढंच काम करीत असतो वाटतं ? जेवायचं न् झोंपायचं ?"

तिचा दादासुद्धां हंसला आणि म्हणाला, "मी तरी काय करूं ताई ? सोडीच ना ती—मग जायचं कसं शब्द मोडून ?"

कुसुम म्हणाली, "तर मग यापुढं आतां त्या गांवीं जाऊं नकोस."

तिच्या बोलण्याचें धोरण कुंजला कळलें नाहीं. त्यानें विचारलें, "जाऊं नको ?—कां ?"

"रस्त्यांत भेटलास तर तुला धरून नेतील ना ? ते मोठे लोक. त्यांना कांहीं कमी नाहीं. पण असं केलं तर आपले दिवस कसे निभतील दादा ?"

बहिणीचें भाषण ऐकून कुंजला वाईट वाटलें.

कुसुमच्या तें ध्यानीं आलें. ती हंसली आणि म्हणाली, "तसं म्हणत नाहीं दादा, तसं म्हणत नाहीं बरं ! एकदोन दिवसांनीं कांहीं बिघडत नाहीं ! तें नव्हे—पण मी म्हणतें, ते मोठे लोक—आपण गरीब—उगीच त्यांच्या नादीं लागणं शोभतं का आपल्याला ?"

कुंज उत्तरला, "पण मी तरी कुठं त्यांच्या घरीं जायला निघालों होतों कुसुम ?"

"तें खरं. पण त्यांनीं आग्रह केला म्हणून गेलास कशाला दादा ?"

"अन् तूं देखील बामणांच्या पोरींबरोबर एवढी घोंटाळतेस ?—ते सुद्धां मोठे लोक आहेत—मग जातेस कां ?"

दादाचें धोरण ध्यानीं येऊन कुसुम हसूं लागली. ती म्हणाली, "लहानपणापासून त्यांच्याबरोबरच ना मी वाढलेंय ? शिवाय तीं कांहीं आमच्या जातीचीं नव्हत, कीं आमच्या समाजांतलींहीं नव्हत. तिथं कांहीं कुणाची लाज बाळगायला नको. पण ही गोष्ट वेगळी आहे."

कांहीं वेळ उगीच राहून कुंज म्हणाला, "तिथंही नको लाज वाटायला. लक्ष्मीची त्यांच्यावर कृपा आहे. चार पैसे बाळगून आहेत खरे पण एवढासुद्धां गर्व नाहीं कीं मिजास नाहीं. सारीं जशीं कांहीं अगदीं सामान्य माणसं. वृंदावनच्या आईनं अगदीं दोन्ही हात धरून मला आग्रह केला—"

त्याचें वाक्य पुरे झालें नाहीं. एकदम चवताळून उठून कुसुम मधेंच म्हणाली, "पुनः त्या जुन्या गोष्टी काढल्यास ! आईच्या नांवानं त्यानीं जी बदनामी केली होती त्यावेळीं ती इतक्यांत विसरलास वाटतं दादा ?"

अढीला येऊन कुंज म्हणाला, " कांहींसुद्धां बोलली नव्हती तीं ! उगीच कुणा बदमापांनीं मत्सरानं त्यांच्या नांवावर घातलंय—बदनाम केलंय. "

कुसुम म्हणाली, " म्हणूनच वाटतं मला घरांतून घालवून देऊन दुसरं लग्न केलं त्यांनीं ? होय ना ? "

तें ऐकून कुंज ओशाळला—तरीही म्हणाला, " तें खरं. तरी पण असं पहा. त्यांत बिचाऱ्या वृंदावनचा कांहींच दोष नव्हता. जें जें कांहीं केलं तें त्याच्या बापानं. दोष बापाचा. "

कांहीं वेळ थांबून कुसूम अगदीं शांतपणानें म्हणाली, " कुणाचा का दोष असेना दादा, जें एकदां झालं तें गेलं. आतां त्यांत बदल व्हायचा नाहीं. शंभर वेळ तीच तीच गोष्ट काढायची काय जरूरी ? आतां यापुढं या बाबतींत वितंडवाद नकोय मला."

कुंजला पहिल्यानें उत्तर सुचलें नाहीं. पण थोड्या वेळानें तो जरासें रागावल्यासारखें करून म्हणाला, " तुला वितंडवाद नकोय खरा पण मला चाऱ्ही बाजूंनीं पाहिलं पाहिजे. उद्यां मी मेलों तर तुझं काय होईल याचा कधीं विचार केलायस ? "

कुसुमला अत्यंत चीड आली, तिनें मुळींच उत्तर दिलें नाहीं.

गंभीर होऊन कुंज बोलत होता, "—मी आमच्या साऱ्या जाणत्या माणसांचं मत घेतलंय. तुझ्या सासूनं जलडांग्याच्या म्हाताऱ्या बुवाजीपर्यंत सर्वांचीं मतं घेतलींयत. सर्वांनीं मोठ्या खुषीनं संमती दिलीय तें माहीत आहे तुला ? "

कुसुमची मुद्रा पहातां पहातां कठोर झाली. ही सारी हकीकत तिला संक्षेपानें पूर्वीच कळली होती म्हणूनच ती उगी राहिली.

तिच्या नांवानें, तिच्या आईच्या नांवानें, त्याचप्रमाणें तिच्या विधीचा उल्लेख करून त्यांच्या समाजांत चर्चा सुरू झाली होती, समाजांतल्या मोठमोठ्या माणसाचीं मतें घेतलीं जात होतीं, याच गोष्टींची तिला अत्यंत चीड आली होती. ती आलेली चीड मनांतल्या मनांत ठेवून ती विषय बदलून म्हणाली, " आतां यावेळीं जेवायला काय करूं दादा ? "

बहिणीचें धोरण कुंजला जाणवलें. तोंड वांकडें करून तो म्हणाला, " कांहीं नको. मला भूक नाहीं. "

कुसुम अधिकच चिडली. पण ती चीड दिसूं न देतां मन आवरून ती तिथून निघून गेली.

कुंजनें चिलीम हातीं घेऊन तंबाखू भरला आणि गुडगुडी ओढून झाल्यावर ती भिंतीला टेंकून ठेवून देऊन त्यानें हांक मारली, " कुसुम ! "

कुसुम आपल्या खोलींत कशिदा काढीत बसली होती, तिथूनच तिनें उत्तर दिलें, " काय आहे ? "

" म्हटलं रात्र झाली ना फार. रांधणार केव्हां ? "

पुनः कुसुमनें तिथूनच जबाब दिला, " आज आतां नाहीं कांहीं रांधीत. "

" कां ? तेंच विचारतोंय मी ? "

कुसुम किंचाळून म्हणाली, "शंभर वेळ तेंच तेंच बोलतां येत नाहीं मला."

बहिणीचे उद्गार कानीं पडतांच हातपाय आपटीत कुंज तिच्या खोलींत येऊन हजर झाला आणि तसाच किंचाळून म्हणाला, " माझं माथं फिरवूं नकोस कुशे ! असंच करायचं असेल तुला, तर डोळ्यासमोर दिसेल त्या वाटेनं निघून जाईन कुठं तरी. सांगून ठेवतोंय तुला ! "

" जा. आतांच्या आतां जा. भरल्या घरांत असा महारमांगासारखा आरडा-ओरडा करायला द्यायची नाहीं मी. वाटेल तिकडे जा—जा तिकडे रस्त्यावर उभा रहा न् मग जेवढं ओरडायचं असेल तेवढं ओरड. "

कुंजचा राग भडकून उठला. तो म्हणाला, " भद्रकपाळे, तूं धाकटी बहीण—वडील भावाला घरांतून बाहेर जा म्हणतेस ? "

" हो, म्हणतें. " कुसुम म्हणाली, " वडील भाऊ झालास म्हणून काय वाटेल तें करणार आहेस ? "

बहिणीच्या मुद्रेकडे पाहिल्याबरोबर कुंज मनांतल्या मनांत चरमला. आवाज जरा खालीं आणून म्हणाला, " वाटेल तें काय केलं मी ? सांग ना ? "

" मला सांगितल्याशिवाय कां जाऊन त्यांच्या घरीं जेवून आलास ? "

" कां ? त्यांत काय बिघडलं ? "

" काय बिघडलं ? " कुसुम चिरडीला येऊन म्हणाली, " फार फार बिघडलं. मी एकदां सांगून ठेवतें, यापुढं तिथं पुनः कधीं जायचं नाहीं."

किती झालें तरी आपण वडील भाऊ असल्याची कुंजला जाणीव होती. भांडणाच्या बाबतींत अशी पड खायची त्याला लाज वाटली. तो म्हणाला,

" मला हुकूम करायला तूं काय माझी आका आहेस ? मला वाटलं तर मी जाईन तिथं. "

कुसुम तावातावानें म्हणाली, " नाहीं—जायचं नाहीं. गेलास असं कळलं मला, तर त्याचा परिणाम फार वाईट होईल. तुला सांगून ठेवतेंय दादा. "

आतां मात्र कुंज खरोखरच घाबरला. तरी सुद्धां चेहऱ्यावरचा आव कायम ठेवून उसनें अवसान आणून म्हणाला, " अन् गेलों—तर काय करशील तूं ? "

हातांतलें कशिद्याचें सामान फेकून कुसुम ताड्कन् उठून उभी राहिली आणि किंचाळून म्हणाली, " मला चिडवूं नकोस दादा. सांगून ठेवतें. निघून जा माझ्या पुढून. नीघ म्हणतें ना ? "

कुंज घाबऱ्याघाबऱ्या खोलींतून बाहेर गेला आणि दरवाजाच्या आड उभा राहून हळूच म्हणाला, " पहा तर खरं. तुला डरतोंय मी ? नाहीं गेलों इथून तर काय करणार आहेस ? "

कुसुमनें उत्तर दिलें नाहीं. दिव्यांतील वात सारून उजेड मोठा करून ती कशिदा काढूं लागली. आड राहिल्यामुळें कुंजला जरा धीर आला. पूर्वीपेक्षां आवाज थोडा जास्त चढवून तो म्हणाला, " लोक म्हणतात, मेल्याशिवाय स्वभाव बदलत नाहीं माणसाचा. स्वतः दैत्यासारखी ओरडतेस त्याला मात्र दोष नाहीं आणि माझा आवाज जरा कुठं थोडासा चढला—" असें म्हणून कुंज थांबला. पण आंतून कांहीं उत्तर येत नाहीं असें पाहून त्याला मनांतल्या मनांत बरेंच समाधान वाटलें. बाहेर जाऊन त्यानें गुडगुडी हातीं घेतली आणि उगीच एकदोन दम मारून आवाज आणखी एक स्वर वर चढवून तो तिथूनच म्हणाला, "—मी वडील आहें—घरचा मालक आहें मी—माझ्या हुकुमानं सारं कांहीं झालं पाहिजे इथं !—" असें म्हणून त्यानें चिलीम उपडी केली आणि पुनः तींत तंबाखू भरीत भरीत तसाच आवाज चढवून तो ओरडून म्हणाला, "—कुणाचंसुद्धां ऐकायचा नाहीं. पुनः पुनः हजार वेळ 'नाहीं नाहीं' म्हटलेलं मला खपायचं नाहीं. मी घरधनी आहें—हें घर माझं आहे—मी म्हणेन तसंच झालं पाहिजे—" असें म्हणून तो थांबला. मागून कुणाची तरी पायांची चाहूल लागल्यामुळें मान खालीं घालून स्तब्ध राहिला.

कुसुम मुकाट्यानें आंत आली होती. रागारागानें त्याच्याकडे पहात ती म्हणाली, " बसल्याबसल्या कंदाळ कसली करतोयस ? नाहीं जात इथून ? "

धाकट्या बहिणीच्या तिखट नजरेसमोर धनीपणा गाजवायची वडील भावाची लहर फिकी पडली. त्याच्या तोंडाबाहेर शब्द उमटला नाहीं. त्याच आवेशानें कुसुम म्हणाली, " दादा, जातोयस कीं नाहीं ? "

आतां तो कुंजनाथही नव्हता, तो चढा आवाजही नव्हता, तें अवसान केव्हांच संपलें होतें. चीं चीं करीत तो म्हणाला, " म्हणतोंय ना, एवढा तंबाखू भरून दे म्हणजे जातों ना ? "

" दे इकडे." असें म्हणून कुसुमनें हात पुढें करून चिलीम घेतली आणि ती निघून गेली. एकदोन मिनिटांनीं ती परत आली आणि गुडगुडीवर चिलीम ठेवून म्हणाली, " सोनाराच्या दुकानीं जातोयस ना ? "

" हो. " कुंज म्हणाला.

" जा तर. " कुसुम अगदीं सहजासहजीं म्हणाली, " फार रात्र करूं नकोस. आतांच होईल जेवण तयार. "

हातीं गुडगुडी घेऊन कुंज हळूहळू घराबाहेर पडला.

## २

त्या दिवशीं वृंदावनचा कौटुंबिक इतिहास बहिणीजवळ सांगतांना कुंजनें यत्किंचितही अतिशयोक्ति केली नव्हती. खरोखरच त्याच्या घरांत लक्ष्मी बागडत होती. असें असतांही कुणीही त्याबद्दल वृथाभिमान किंवा ताठा बाळगीत नव्हतें.

त्या गांवीं शाळा नव्हती. लहानपणीं वृंदावन स्वतःच्या प्रयत्नानेंच बंगाली लिहायला वाचायला शिकला होता आणि तेव्हांपासूनच गांवांत एक शाळा उघडायचा त्यानें संकल्प केला होता. त्याचा बाप गौरदास पक्का माणूस होता. वृंदावन त्याचा एकुलता एक मुलगा, पण त्याचा हा एवढा हट्टसुद्धां पुरवायला तो तयार झाला नाहीं.

बापाच्या मृत्यूनंतर त्यानें आपल्या स्वतःच्याच ओसरीवर शाळा उघडण्याचा संकल्प करून तो अमलांत आणला. त्या शाळेंत कुणाला फी नव्हती.

गांवांत एक म्हातारा पेन्शनर मास्तर होता. त्याच्याजवळ त्यानें इंग्रजी शिकायला सुरवात केली. रात्रीच्या वेळीं येऊन तो त्याला शिकवीत असे

त्यामुळें ही गोष्ट गुप्त राहिली होती. वृंदा वैष्णवाला इंग्रजी येतें हें गांवांत कुणाला कळलें नव्हतें. चारपांच वर्षांपूर्वी बायको मेल्यापासून त्यानें हेंच काम हातीं घेतलें होतें. सारी रात्र तो अभ्यास करीत असे आणि सकाळीं घरकाम आणि वतनवाडीची व्यवस्था पहात असे. दुपारीं स्वतः स्थापन केलेल्या शाळेंत शेतकऱ्यांच्या मुलाना शिकवीत असे. त्याच्या आईनें पुनः त्याचें लग्न करण्याची गोष्ट काढली तर आपल्या छोट्या मुलास दाखवून तो म्हणे, " मुलांसाठींच ना लग्न करायचं ? तो तर हा आहे. आतां कशाला हवंय लग्न आई ? "

आईनें कितीही रडारड केली तरी तो ती कानीं घेत नसे. अशा प्रकारें एकदोन वर्षें गेलीं.

त्यानंतर एके दिवशीं अचानक कुंज वैष्णवाच्या घरासमोर त्यानें कुसुमला पाहिलें. नदीवर स्नान करून कडेवर कळशी घेऊन कुसुम घरीं परत येत होती. नुकतेंच तिनें यौवनांत पदार्पण केलें होतें. सारखी टक लावून वृंदावन तिच्याकडे पहात राहिला होता. कुसुम घरांत गेली असें पाहून तो जड पावलांनीं तिथून निघून गेला. या गांवांतलीं सारीं माणसें त्याच्या परिचयाचीं होतीं— अर्थात् तिला पाहिल्याबरोबर ती कोण हें त्यानें अचुक ओळखलें.

एक मूल झालें कीं आई आणि मुलगा यांच्यामध्यें फारसा संकोच रहात नाहीं. तो घरीं परत आला त्या वेळीं म्हणूनच त्यानें सारी हकीकत मोकळ्या मनानें आपल्या आईला सांगितली.

" असं कधीं झालंय बाबा ? " आई म्हणाली, " खोड आहे ना या प्रकरणांत ? "

" असेना का खोड ! " वृंदावन उत्तरला, " किती झालं तरी ती तुझी सून आहे ना आई ? लग्न करून दिलंस त्याच वेळीं कां विचार केला नव्हतास या गोष्टीचा ? "

" खरं आहे." आई म्हणाली, " पण तें जें कांहीं होतं तें तुझ्या वडिलांना माहीत होतं. त्यांना जें योग्य वाटलं तें त्यांनीं केलं."

" मग तेंच योग्य आहे तर. " वृंदावन रागारागानें म्हणाला, " मी आतां आहें असाच रहाणार. यापुढं माझ्या लग्नाच्या बाबतींत मुळींच किरकिर लावूं नकोस ! " असें म्हणून तो तिथून निघून गेला.

यानंतर तीन वर्षें निघून गेलीं. या मुदतींत वृंदावनच्या आईनें कुसुमला घरीं आणण्याबद्दल फार फार प्रयत्न केले पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. कांहीं झालें तरी कुसुमला पुन: यायला लावणें शक्य झालें नाहीं.

या गोष्टीला कुसुमच्या दृष्टीनें दोन मोठीं कारणें होतीं. पहिलें कारण—आपल्या खुळ्याभोळ्या आणि अल्पबुद्धी भावाला एकटा टाकून कुठेंतरी जाण्यांत तिला समाधान वाटलें नसतें. दुसरें कारण—पूर्वींच सांगितलें गेलें आहे. फारशी सामाजिक उठाठेव न करतां नवऱ्याच्या घरीं जर तिला जातां आलें असतें तर कदाचित् दादाची एवढी किटकिट बंद करण्यासाठीं तरी ती सासरीं गेली असती. पण बऱ्याच गोष्टी करणें अवश्य होतें—वैष्णवांच्या जमातीची बैठक झाली पाहिजे होती, तिच्या आईवर केलेल्या खोट्या आरोपांचा इतिहास, विसरून टाकलेली तिची बालजीवनांतील घटना वगैरे गोष्टींचा उल्लेख झाला असता, आरडाओरड झाली असती, चांभारचौकशा करणारे गांवचे लोक उगीच गोळा झाले असते, तिच्या सख्यासोबतीणींची नजरसुद्धां सगळे आडपडदे दूर करून कदाचित तिकडे वेधली गेली असती आणि शेवटीं घरीं गेल्यावर त्यांनीं सरळ शब्दांनीं हंसत हंसत म्हटलें असतें, 'मांगडोंबांच्यासारखा कुसुमचा देखील निक्का लागला होता.' या सर्व गोष्टींची कल्पना येतांच लाजेनें तिच्या सर्वांगावर कांटा उभा रहात असे.

गृहस्थांच्या मुलीबरोबर तिनें शिक्षण घेतलें होते. त्यांच्याच सोबतींत ती त्यांच्याचसारखी लहानाची मोठी झाली होती. गरीबी असली तरी आचार-व्यवहाराच्या बाबतींत त्यांच्यापेक्षां आपला दर्जा कमी ठरेल ही कल्पनासुद्धां तिला सहन झाली नसती.

काल संध्याकाळीं दादाबरोबर कुसुमचें भांडण झालें होतें. लाकडी पेटीच्या चाव्या रागारागानें दादाच्या पायाशीं फेंकून देऊन ती तावातावानें म्हणाली होती, "आतां कांहीं झालं तरी या घरांत कांहीं मला रहायचं नाहीं !"

सकाळींच नदीवरून स्नान करून ती घरीं आली, त्यावेळीं तिला दिसून आलें, कीं दादा घरीं नाहीं—कुठें तरी निघून गेला आहे. त्याची फेरीची पांटीही कुठें दिसत नव्हती. काल चांगली खबर घेतली म्हणून आज सकाळीं भल्या पहाटे उठून दादा गेला असावा असें कुसुमला वाटलें. कालची उणीव भरून काढण्यासाठीं तो सकाळींच उठून गेला होता हें खरें, पण एकंदरींत कुसुमचें

अनुमान चुकलें होतें. त्याचें कारण निराळेंच होतें. थोड्या वेळानें तें उघडकीस आलें.

भल्या पहांटे उठून कुसुम घरकामाला लागत असे. घरांत शेणानें सर्वत्र सारवून घेऊन नंतर सारें अंगणदेखील तसेंच सडासंमार्जन करून नीटनेटकें करीत असे. नदीवर स्नान करून पाणी भरून आणी आणि मग दादासाठीं सैंपाकाला लागत असे. जेवण उरकून कुंज फेरीसाठीं बाहेर निघाला म्हणजे नंतर ती आपल्या पूजेला बसत असे. ज्या दिवशीं कुंज जेवल्याशिवाय फेरीला जाई, त्या दिवशीं तो दुपारपर्यंत घरीं परत येई. त्याचप्रमाणें आजही त्याला यायला दुपार होईल अशी कल्पना करून ती फुलें तोडायला लागली. अंगणाच्या एका बाजूला कांहीं फुलझाडें होतीं. कांहीं मल्लिकेचीं होतीं—कांहीं जुईचीं होतीं. दररोजच्या पूजेपुरतीं फुलें तिथेंच मिळत असत. फुलें तोडून, बाकीची सर्व तयारी करून ती नुकतीच पूजेला बसली होती. इतक्यांत बाहेर कांहीं बैलगाड्या येऊन थांबल्या आणि लगेच एक प्रौढ बाई दरवाजा उघडून आंत येऊन उभी राहिली. क्षणभर एकमेकींनीं एकमेकींकडे पाहिलें. कुसुमनें तिला कधीं पाहिलें नव्हतें. पण कपाळाला तिलक, गळ्यांत माळ दिसली त्यावेळीं तिला वाटलें, कीं कुणीही असो, आपल्याच जातीची असावी.

ती बाई जवळ येऊन हंसतमुखानें म्हणाली, "तूं मला ओळखत नाहींस मुली—तुझा दादा ओळखतो. कुठं आहे कुंजनाथ ?"

कुसुमनें उत्तर दिलें, "आज भल्या पहांटे तो बाहेर गेलाय. परत यायला बराच उशीर होईल वाटतं."

आलेली बाई आश्चर्यचकीत होऊन म्हणाली, "उशीर होईल म्हणजे काय ग ? काल त्यानं आपला मेहुणा, आणखी चारपांच मुलं—आमच्यांतलींच आहेत तीं—भाचे होतात ते त्याचे—सर्वांना जेवायचं आमंत्रण दिलं. त्यानं आमंत्रण दिलं म्हणून मी आज सकाळीं म्हटलं, 'एक बैलगाडी ठरवून घेऊन ये बाबा वृंदावन. एकदां जाईन आणि सूनबाईला पाहून आशीर्वाद देऊन येईन म्हणतें!'"

तिचें भाषण ऐकून कुसुम स्तंभित झाली पण लगेच भानावर येऊन तिनें माथ्यावरचा पदर आणखी थोडा पुढें ओढला आणि घाईघाईनें पुढें होऊन

तिला एक प्रणाम केला. घरांतून एक आसन आणून बसायला घालून ती तशीच मुकाट्यानें तिथें उभी राहिली.

कुसुमला आतां कळलें, कीं ही आपली सासू.

खालीं बसल्यावर सासूबाई हंसत हंसत म्हणाली, "काल जेवणींखाणीं उरकलीं तेव्हां वृंदावन थट्टेथट्टेनें म्हणाला, 'कुंज माझ्या वडील भावासारखा पण मी एवढा दुर्भागी, कीं आजवर कधीं त्याला बोलावून गुळपाणीसुद्धां खायला दिलं नाहीं?' फारा दिवसांनीं हीं माझ्या नणंदेचीं मुलंही इथं आलीं आहेत—तेव्हां कुंजनाथनं हंसत हंसत त्या सर्वांनाच आमंत्रण दिलें. सारींच उद्यां जेवायला या म्हणून म्हणाला '—"

मान खालीं घालून कुसुम मुकाट्यानें उभी राहिली होती.

जातीनें वैष्णवीं असली तरी वृंदावनची आई अगदींच गांवढळ नव्हती. तिला रीतभात कळत होती—ती वेळ प्रसंग जाणत होती. कुसुमची मुद्रा पाहून तिच्या मनांत एकदम शंका आली, कीं कांहींतरी भानगड झाली आहे. संदिग्धपणें तिनें प्रश्न केला, "होय का ग सूनबाई, कुंजनाथनं तुला कांहीं सांगितलंच नाहीं वाटतं?"

बुरख्यांतून मान हालवीत कुसुमनें नकार दिला. पण तें तिचें मुकें उत्तर तिला चांगलेंसें कळलें नाहीं. उलट तिला वाटलें, कीं त्यानें तसें सांगितलें असावें. म्हणूनच ती खूप होऊन म्हणाली, "मग ठीक आहे!" त्यानंतर कुंजनाथची गोष्ट काढून ती मोठया वात्सल्यानें म्हणाली, "मला वाटतं तो घाबरला असेल. त्याला वाटलं असेल कीं माझ्या वेड्या मुलाच्या ध्यानांतच कांहीं राहिलं नसावं—तेव्हां मला वाटतं, तो कांहीं व्यायलाबियला गेला असेल. येईल वाटतं इतक्यांत?—अरे पण हे आलेच सगळे!"

'कुंजदादा' म्हणून हांक मारीत वृंदावन येऊन दारांत उभा राहिला. त्याच्याबरोबर आणखी तीन मुलगे होते. हेच ते त्याचे आतेभाऊ. वृंदावनची आई म्हणाली, "कुंजनाथ इतक्यांतच कुठंतरी गेलाय वाटतं. सूनबाई, घरांतून एक सतरंजी आणून इथं पसर पाहूं. बसू दे यांना."

घाईघाईनें एक घोंगडी ओढून घेऊन कुसुमनें ती दादाच्या खोलींत नेऊन पसरली आणि गुडगुडी हातीं घेऊन तंबाखू भरण्यासाठीं ती सैंपाकघराकडे वळली. तें पाहून वृंदावन हंसून म्हणाला, "राहुंदे. आम्ही कुणी गुडगुडी ओढीत नाहीं."

गुडगुडी तिथेंच ठेवून कुसुम तशीच सैंपाकघरांत गेली आणि एका खुंटीला धरून ताठरून उभी राहिली. काय केलें हें दादानें ? मागलापुढला कांहीं विचार न करतां अकस्मात आपल्याला असें अडचणींत पाहून कुठें निघून गेला हा ? तिला राग आला होता—चीड आली होती, तितकीच शरम वाटली होती. आतां सर्वांसमक्ष आपली फजिती होणार या भीतीनें तिचे दोन्ही डोळे आसवांनीं भरून आले.

कालपासून घरांतलीं सारीं हांडींमडकीं रिर्ती पडलीं होतीं. सकाळीं आंघोळीला जायच्यापूर्वी तिनें ठरवलें होतें, कीं दादा आला कीं त्याला बाजारांत पाठवून द्यायचें; पण ती परत आली त्यावेळीं दादाचाच पत्ता नव्हता. ती त्याची धाकटी बहीण होती खरी पण अशी कांहीं चूक झाली म्हणजे तो तिच्या समोर यायला भीत असे. कडक धन्याला एकादा गरीब नोकर सुद्धां इतका भीत नसेल ! मोठ्या माणसांना जेवणाचें आमंत्रण दिलें, एवढ्यासाठींच काहीं कुसुमला राग आला नव्हता. खोटी मिजास दाखवण्यासाठीं या मोठ्या माणसांना सहपरिवार निमंत्रण दिलें तें दिलें, पण केलेली ही चूक तोंड उघडून सांगण्याइतकें धैर्य ओढूनताणून आणणें सुद्धां कुंजनाथला साधलें नाहीं, याचाच तिला राग आला.

आणखी सर्वांपेक्षां तें एक मोठें संकट झालें होतें ! काय चार दोन पैसे जे शिल्लक होते ते त्या लाकडी पेटींत होते. तिची चावीसुद्धां आतां तिच्याकडे नव्हती—आणि हातीं तर एक पैसाही नव्हता.

निरुपाय होऊन ती चारपांच मिनिटेंपर्यंत तशीच उभी राहिली होती. आतां सारा राग तिनें वृंदावनवर काढला. त्याच्याचमुळें ही सारी भानगड झाली. आपल्या खुळ्याभोळ्या भावाला हात धरून ओढून त्यानें आपल्या घरीं नेलें कशाला ? कशाला ही निष्कारण थट्टा केली ? दादानें जेवायचें आमंत्रण द्यावें असा हा होता तरी कोण ?

गेलीं तीन वर्षें नाहीं नाहीं तीं ढोंगें करून कांहींतरी कारण काढून वृंदावन मुद्दाम या बाजूला येरझाऱ्या घालीत होता. परोपरीनें तिचें मन वळवायचा प्रयत्न करीत होता. कितीतरी दिवस कांहीं कारण नसतां सकाळ-संध्याकाळ घरासमोरून उगीच फेऱ्या घालीत होता. त्यांची गरिबीची परिस्थिति त्याला माहीत होती. मुद्दाम आपली फजिति करण्यासाठीं त्यानेंच हें कवटाळ रचून हा योगायोग जुळवून आणला असावा, असेंच तिच्या मनानें घेतलें.

दगडाच्या पुतळीसारखी ती ताठरून गेली होती. मधून मधून ती डोळे पुशीत होती. ती मोठी मानी होती. अशी एकटी पडलेली—काय करावें हेंच तिला सुचेना.

वृंदावनची आई आंत बसून मुलांबरोबर गप्पा गोष्टी करीत होती पण तिच्या मुलाची नजर मात्र खोलीबाहेर भिरभिरत होती. सहज त्याची नजर सैंपाकघरांत असलेल्या कुसुमकडे गेली. डोळयाला डोळे भिडले. त्याला वाटलें, ती आपल्याला खुणावून बोलावते आहे. एका क्षणांत त्याच्या हृदयांत कालवाकालव सुरू झाली. सारे प्राण उडून डोळयात आले. त्याला वाटलें, आपले डोळे आपल्याला फसवताहेत.

सहज योगायोगानें समोर दिसल्यावर जें माणूस तोंडावर पदर ओढून पळून जात असे, तेंच का हें ? कुंज त्याला वारंवार हेंच सांगत असे. आपल्याबद्दल जिला अत्यंत चीड आहे, ती आपल्याला खूण करून बोलावील कशी ? असें होणेंच शक्य नाहीं. वृंदावननें आपली नजर दुसरीकडे वळवली—पण त्याच्यानें रहावेना. जिकडून डोळयाला डोळा भिडला होता त्या बाजूकडे त्यानें पुन्हा पाहिलें. पुनः तेंच ! कुसुम त्याच्याकडेच पहात होती. हातानें खूण करून त्याला बोलावीत होती.

वृंदावन तसाच आंत गेला. सैंपाकघराच्या दरवाजाजवळ थांबून त्यानें हळूच विचारलें, " मला हाक मारलीस ? "

कुसुमनें तसेंच हळूच उत्तर दिलें, " हो. "

वृंदावन आणखी थोडा पुढें सरकला आणि म्हणाला, " कशाला ? "

कुसुम क्षणभर उगी राहिली—नंतर तोंडांतल्या तोंडांत पुटपुटली, " मी असं विचारतें तुम्हाला, आमच्यासारख्या दीनदुबळयांची अशी फजिती करण्यांत तुम्हां मोठ्या माणसांना कसली बहादुरी वाटते ? "

एकदम हा कसला आरोप ! वृंदावन कांहीं न बोलतां तसाच उभा राहिला.

कुसुम थोडी अधिकच चिडून म्हणाली, " आम्हीं कसे दिवस कंठतों आहोंत तें माहीत आहे ना तुम्हांला ? मग कां म्हणून तुम्हीं दादाशीं असली ही बनवाबनवी केलीत ? एवढीं माणसं गोळा करून घेऊन कां म्हणून इथं जेवायला आलां ? "

या प्रश्नाचें काय उत्तर द्यावें तें वृंदावनला पहिल्यानें सुचलें नाहीं. स्वभावत: तो अगदीं थंडा माणूस होता. कांहीं झालें तरी त्याला कधीं चीड येत नसे. कांहीं वेळ थांबून त्यानें आपलें मन आवरून घेतलें आणि नंतर अगदीं शांतपणें विचारलें, " कुंजदादा कुठं आहे ? "

" माहीत नाहीं. " कुसुम म्हणाली, " मला कांहींसुद्धां न सांगतां सकाळ सकाळींच उठून तो कुठं तरी निघून गेला. "

वृंदावन क्षणभर थांबून म्हणाला, " जाईना का ? तो नसला तर मी आहें. घरांत कांहीं शिल्लक नाहीं वाटतं ? "

" कांहींसुद्धा नाहीं. सारीं भांडीं मोकळीं आहेत अन् माझ्या हातांतही पैसा नाहीं. "

वृंदावन म्हणाला, " या गांवांत मला सारे ओळखतात. मी दुकानदाराकरवीं जिन्नस घेऊन पाठवून देतों. मला एक पंचा दे. तसाच येतांना स्नान करून येईन. विचारलं तर म्हणावं, मी स्नान करायला गेलोंय !—आतां उभी राहूं नकोस. जा पाहूं. "

आंत जाऊन कुसुमनें पंचा आणून त्याच्या हातीं दिला, तो डोक्यावर घेऊन वृंदावन हंसत हंसत म्हणाला, " बहीण होतीस म्हणून कुंजदादा असा हा पळून गेला—दुसरी कुणी असती तर असं तिला टाकून पळतां आलं नसतं त्याला. "

कुसुम तोंडांतल्या तोंडांत पुटपुटत म्हणाली, " साऱ्यांनाच कांहीं तें जमत नाहीं खरं—पण कुणाकुणाला तें सुद्धां चांगलं साधलंय ! "—असें म्हणून आपल्या भाषणाचा त्याच्यावर कसा काय परिणाम झाला हें पहाण्यासाठीं तिरप्या नजरेनें तिनें वृंदावनाच्या चेहऱ्याकडे पाहिलें.

वृंदावन जायला निघाला होता पण तें ऐकून थांबला, " केव्हांतरी एके दिवशीं तुझा हा भ्रम दूर होईल. तुझ्या बाळपणांत तुझ्या आईनं जी चूक केली त्याची जबाबदारी जशी तुझ्यावर नाहीं, तशीच माझ्या बाबांनीं जी चूक केली त्याबद्दल मीही जबाबदार नाहीं. जाऊं दे. झगडा करायची ही वेळ नव्हे. आतां सैंपाकाच्या तयारीला लाग. "

" सैंपाकाची कसली तयारी करूं तें सांगा ना ? हें माझं डोकं कापून रांधून वाढलं तर पोट भरणार असेल तुमचं, तर तसं सांगा मला ! "

वृंदावन चार पावलें पुढें झाला होता तो मागें फिरून आला. तिच्या प्रश्नाचें उत्तर त्यानें दिलें नाहीं. तरीपण आवाज अगदीं खालीं आणून तो हळूच म्हणाला, " मला काय बोलायचं असेल तें खुशाल बोल—तें ऐकून घ्यायला हवंच मला—पण रागाच्या भरांत आपल्या सासूला मात्र भलतंच कांहींतरी बोलून जाऊं नकोस. एवढीशी गोष्ट सुद्धां तिच्या मनाला फार लागून रहाते. "

कुसुमला चीड आली होती. ती धुसपुसून म्हणाली, " मी कांहीं अगदींच ही नाहीं. मला अक्कल आहे म्हटलं ! "

" तें मला माहीत आहे. " वृंदावन म्हणाला, " पण अकलेपेक्षां तुझा रागच फार मोठा आहे तेंही मला माहीत आहे. आणखी एक ऐक कुसुम—आई स्नान करून आली आहे पण तिची पूजा झाली नाहीं अजून. तिला एकदां विचारून घे आणि तिच्या पूजेची सारी तयारी करून दे. मी आलोंच तितक्यांत. "

" बर जा तर. पण कुठं तरी गप्पा मारीत बसूं नका म्हणजे झालं. "

वृंदावन अगदीं गोडगोड हंसत म्हणाला, " नाहीं बसत—पण एकदां मुद्दाम उशीर लावावा अन् तुझ्या तोंडचे चार करडे बोल ऐकावे असं फार वाटतंय मला. आज नसलं तरी आजकाल केव्हां तरी ते ऐकायची आशा आहे मला. आज आतां जरूर लौकर येतों. "

" तेव्हांचं तेव्हां पहातां येईल ! " असें म्हणून कुसूम सैंपाकघरांत जात होती तोंच वृंदावन एक लहानसा सुस्कारा सोडून मोठ्या प्रेमळपणानें म्हणाला, " आश्चर्य आहे ! आज तुझं माझं हें पहिलंच बोलीभाषण होतंय असं एकदां सुद्धां वाटलं नाहीं. असं वाटतंय कीं जन्मभर असेच तुझे करडे बोल ऐकत आलों आहें ! देवाघरच्या गांठी किती विलक्षण असतात या कुसुम ! "

कुसुमनें मुकाट्यानें ऐकून घेतलें पण उत्तर दिलें नाहीं.

वृंदावन निघून गेला. झाल्या गोष्टीची आठवण होऊन एकाएकीं तिच्या साऱ्या आंगावर कांटा उभा राहिला. सैंपाकघरांत जाऊन ती स्तब्ध होऊन बसली होती. स्वतःच्या सुशिक्षितपणाच्या अभिमानामुळें ज्या व्यक्तीला आजवर एक अशिक्षित कुणबट समजून ती हिशेबांतसुद्धां धरीत नव्हती, त्या व्यक्तीचें भाषण ऐकून आणि आचरण पाहून त्याच्याबद्दल एक वेगळाच आनंद—एक वेगळीच ओढ आतां तिला वाटूं लागली होती.

# ३

त्या दिवशीं संध्याकाळच्यापूर्वीं घरीं जायला निघाल्यावेळीं वृंदावनच्या आईनें कुसुमला जवळ बोलावलें आणि गहिंवरल्या आवाजांत म्हटलें, " आजचा सारा दिवस केवढया आनंदांत गेला सूनबाई, तें कांहीं मला तोंडानं बोलून दाखवतां येत नाहीं. सुखी हो मुली !—" असें म्हणून तिनें पदराची गांठ सोडून दोन सोन्याच्या बांगड्या काढून आपल्या हातानें तिच्या हातांत घातल्या.

आजची सारी व्यवस्था गुपचुप वृंदावनच्या मदतीनें तिनें केली होती तें आतां तिलाही कळून चुकलें होतें. विशेषतः त्यामुळें तिच्या हृदयांत आशेचा किरण उगवला होता. गळ्यांत पदर घेऊन कुसुमनें तिला प्रणाम केला आणि तिची पायधूळ घेतली. ती मुकाट्यानें उभी राहिली होती. त्या बावतींत सासुसूनेचें कांहींच भाषण झालें नाहीं. गाडींत बसतांना सुनेला उद्देशून ती म्हणाली, " शेवटीं कुंजनाथची कांहीं भेट झाली नाहीं. वेडा पोर सारा दिवस कुठं तरी तोंड लपवून राहिलाय वाटतं. असं कर मुली, उद्यां त्याला एकदां माझ्याकडे पाठवून दे."

नुसत्या मानेनेंच कुसुमनें संमती दिली.

वृंदावनच्या आजोबानें गौर निताईच्या मूर्ति आपल्या घरीं स्थापन केल्या होत्या. त्या देवघरांत बसून वृंदावनची आई रोज मध्यरात्रीपर्यंत माळ घेऊन जप करीत बसे. आज ती तशीच जपाला बसली होती. तिचा छोटा नातू तिच्या मांडीवर डोकें टेंकून झोंपी गेला होता. ती बसली होती त्याजागीं दिव्याची सावली पडलेली असल्यामुळें वृंदावन जेव्हां आंत आला त्यावेळीं ती त्याला दिसली नाहीं. तो देव्हाऱ्याजवळ आला आणि गुडघे टेकून बसला. कांहीं वेळपर्यंत त्यानें मनांतल्या मनांत प्रार्थना केली आणि नंतर साष्टांगनमस्कार घालून ज्यावेळीं तो उठला त्यावेळीं त्याची नजर आपल्या आईकडे गेली. मनच्यामनीं तो फार लाजला होता.

" अशी काळोखांत काय बसलीस आई ? " तो म्हणाला.

" असेना का काळोख ? " ती मोठ्या प्रेमानें म्हणाली, " ये—तूं इथं येऊन जरा माझ्याजवळ बैस."

वृंदावन तिच्याजवळ जाऊन बसला.

लाज वाटायला त्याला तसेंच कारण झालें होतें. त्यावेळीं प्रहर रात्र उलटून गेली होती. अशा अवेळीं कधींच तो देवाला नमस्कार करायला जात नसे. आजच तो आला. ध्यानींमनीं नसलेलें सौख्य लाभल्यामुळें आज त्याचें हृदय भरून आलें होतें. दिवस सार्थकीं लागला असें वाटल्यामुळें हृदयाच्या नम्र भावानें कुणाला नकळत आपलें अंतरंग देवाला कळवण्यासाठीं तो आला होता. आपल्या मनांतली गोष्ट आपली आई अंदाजानें ओळखील असें वाटून तो अत्यंत शरमिंदा झाला होता.

झोंपी गेलेल्या नातवाच्या माथ्यावर हात फिरवीत गहिंवरल्या आवाजानें त्याची आई म्हणाली, " माझा हा आईनसता एवढासा वंशाचा आधार टाकून मला एक पाऊलसुद्धां दूर जातां येत नव्हतं. पण आज मला वाटलं वृंदावन, माझ्या माथ्यावरचा मोठा बोजा उतरला. आतां तिला लौकर घरीं घेऊन ये बाबा. पोरीच्या हातीं संसाराचा सारा भर सोंपवून मी आतां रजा घेणार आहें—काशी वृंदावनच्या यात्रेला जाणार आहें. "

वृंदावनच्या अंतःकरणांतसुद्धां आज आशा उत्पन्न झाली होती. बराच भरंवसाही वाटला होता. तरीही तो लाजवटपणानें हंसून म्हणाला, " ती येईल का पण आई ? "

" येईल तर ! " आई निस्संदिग्धपणें म्हणाली, " ती येणार तेव्हांच ना मला मोकळीक मिळणार ! माझीच चूक झाली ती वृंदावन. आजवर गेलें नाहीं हीच चूक झाली. यायच्यावेळीं माझ्या हातानीं दोन बांगड्या तिच्या हातीं घालून आशीर्वाद देऊन आलें. मला प्रणाम करून सूनबाई मुकाट्यानं उभी राहिली होती—तेव्हांच मला वाटलं, कीं माझ्या माथ्यावरचा बोजा उतरला. तूं एकदां चौकशी कर—चांगलासा एकादा दिवस पहा नि घरची लक्ष्मी घरीं घेऊन ये. "

वृंदावन क्षणभर उगीच राहिला.

" पण ती आली तर तुझ्या या वंशाच्या आधाराची काळजी घेईल ना ? "

" घेईल म्हणजे ! " आई एकदम म्हणाली, " मला मुळींच शंका नाहीं."

" मला सोन्याची पारख आहे वृंदावन—" आई म्हणाली, " सोनं शंभर नंबरी आहे कीं नाहीं तें कांहीं आजच सांगत नाहीं मी—पण पितळ नव्हे,

गिलिट नव्हे, एवढं मात्र तुला मी बजावून सांगतें. तशी मला खात्री नसती तर 'तिला घेऊन ये' असं मी मुळींच म्हटलं नसतं.—काय रे वृंदावन, सूनबाई तुझ्याबरोबर यापूर्वी कधीं बोलली होती का ?"

"कधींच नाहीं आई. पण मला वाटतं आज प्रसंग आला तेव्हां—" असें म्हणून वृंदावन हंसला आणि उगीच राहिला.

"तेंच खरं बाबा." एक क्षणभर थांबून थोडीशी गंभीर होऊन आई म्हणाली, "तिची कांहीं चूक नाहीं. सारींच अशीं असतात. प्रसंग आला म्हणजेच माणूस आपलं कोण तें अचुक ओळखून काढतं अन् त्याच्याकडे धांव घेतं. किती झालं तरी मी बायकोमाणूस—म्हणूनच तिनं आपलं संकट मला सांगितलं नाहीं—तुला सांगितलं."

वृंदावन मुकाट्यानें ऐकत होता.

ती पुढें बोलत होती, "—आणखी एक माझं काम आहे—त्या कुंजनाथला एकदां संसारांत गुंतवला पाहिजे—" असें म्हणून ती आपली आपणच हसूं लागली. शेवटीं म्हणाली, "काय तरी माणूस? साऱ्या गांवाला आमंत्रण दिलं आणि घर टाकून पळून गेला—मग मागं काय होईल तें होवो !—"

वृंदावनदेखील हंसूं लागला.

आई पुढें म्हणाली, "—सूनबाईला तो फार भीतो म्हणे. तो वडील भाऊ—पण धाकट्या भावासारखा वागतो. एकेक माणसं अशींच भित्रट असतात वृंदावन. कुणाच्या तरी जरबेखालीं राहिल्याशिवाय त्यांना बरंच वाटत नाहीं—मग तीं वडील असोत कीं लहान असोत. माझी सूनबाईसुद्धां तशीच थोडी वेगळी आहे. शांत आहे—पण करडेपणा फार. मला असलंच माणूस हवंय. टाकलेला भार उचलायचं सामर्थ्य हवं. असंच माणूस मिळेल तेव्हां हा संसाराचा पाश तोडून निश्चिंतपणानं मला बाहेर जातां येईल."

क्षणभर उगीच राहून नंतर तिनें पुनः बोलायला सुरवात केली, "एकच दिवसाचा परिचय पण तिच्याबद्दल मला किती लोभ वाटूं लागला तें तुला सांगतां यायचं नाहीं. मला संध्याकाळपासून सारखं मनांत येतंय—केव्हां एकदां तिला घरीं घेऊन येईन !—पुनः केव्हां एकदां पाहीन !"

वृंदावन मनातल्या मनांत फार लाजला. विषयांतर करण्याच्या उद्देशानें तो म्हणाला, "कुंजदादाबद्दल काय सांगत होतीस आई ?"

आई म्हणाली, "अरे हो, तेंच सांगत होतें ना—सूनबाईला घेऊन यायच्या-पूर्वीं आधीं कुंजनाथला संसारी केलं पाहिजे. मलाच केलं पाहिजे तें काम. उद्यां दिवस उगवायच्या पूर्वीं गोपाळला म्हणावं, गाडी घेऊन ये. मी एकदां नळडांग्याला जाऊन येतें. तिथल्या गोकुळ बैराग्याची मुलगी आहे, ती पसंतीला उतरेल माझ्या. दिसायलाबिसायला देखील तशी कांहीं वाईट नाहीं. त्या शिवाय—" तिचें भाषण संपण्यापूर्वीच वृंदावन मोठ्यानें हंसून म्हणाला, "शिवाय ती एकुलती एक मुलगी आहे. बैराग्यानं देखील थोडीशी पुंजी करून ठेवलीय—होय ना आई?"

आई देखील हंसली. ती म्हणाली, "तुझं म्हणणं खरं आहे बाबा. कुंजच्या बाबतींत आधीं ती गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. नाहींतर नुसतं लग्न केलं म्हणजे कांहीं झालं नाहीं. अन्नवस्त्र तर पाहिजे घरांत. अन् मुलगीही तशी वाईट नाहीं वृंदावन. जरा सांवळी आहे—पण नाकींडोळीं चांगली आहे. कसं का असेना, पहातें उद्यां काय काय जमतं तें."

वृंदावन होकार देऊन म्हणाला, "मीही जरा तिथिनक्षत्र बघून घेतों. तूं स्वत: जातेयस तेव्हां अशीच कांहीं परत यायची नाहींस याची खात्री आहे मला."

कुंजनाथच्या लग्नाची बाब, देण्याघेण्याची बाब, खाण्याजेवण्याची बाब, सारें कांही जवळ जवळ निश्चित करून दुसऱ्या दिवशीं दुपारानंतर वृंदावनची आई आपल्या घरीं परत आली.

त्यावेळीं चंडीमंडपाच्या समोर रांगेत उभीं राहिलेलीं मुलें परवच्या म्हणत होतीं. वृंदावन एका बाजूला उभा राहून ऐकत होता. बैलगाडी येऊन समोर थांबतांच त्याचा मुलगा चरण गाडीखालीं उडी मारून आरडाओरडा करीत येऊन बापाला भिडला. 'मामी' ठरवण्यासाठीं तो सुद्धां आज आपल्या आजी बरोबर गेला होता. त्याला उचलून कडेवर घेऊन वृंदावन येऊन गाडीजवळ उभा राहिला. आई त्यावेळीं उतरत होती. तिच्या प्रसन्न मुद्रेकडे पाहून तो म्हणाला, "केव्हांचा मुहूर्त ठरवून आलीस आई?"

"या महिना अखेर दुसरा मुहुर्त नाहीं. तूं आधीं आंत ये. पुष्कळ सांगायचं आहे." असें म्हणून ती हंसतमुखानें घरांत गेली.

आतां सून घरीं येणार या कल्पनेनें आनंदानें तिचें हृदय भरून आलें होतें.

एकच दिवसाच्या अनुभवानें गृहिणीपणाच्या बाबतींत कुसुम किती कुशल आहे याची तिला खात्री झाली होती आणि म्हणूनच तिच्यावर तिचा लोभ जडला होता. स्वतः सुखी व्हावें, एकुलत्या एका मुलाला सुखाच्या मार्गाला लावावें, त्यांच्या हातीं घरसंसाराची सारी जबाबदारी सोंपवून तीर्थयात्रेसाठीं बाहेर पडावें—या साऱ्या सुख स्वप्नांच्या भरांत आतां तिच्या हातून सारीं कामें सहजासहजीं उरकलीं जात होतीं. म्हणूनच गोकुळ बैराग्याच्या विधवेच्या साऱ्या मागण्या तिनें कबूल केल्या होत्या आणि खर्चाची सारी जबाबदारी स्वतःवर घेऊन तीं लग्नकार्य निश्चित करून आली होती.

अजून तिचें जेवण झालें नव्हतें. बाहेर कुठें कुणाकडे तरी ती जेवीत नसे हें वृंदावनला माहीत होतें. शाळेला सुट्टी देऊन तो आंत आला तेव्हां कोणत्याच प्रकारच्या तयारीला न लागतां ती स्वस्थ बसून राहिली असल्याचें त्याला दिसून आलें.

वृंदावन म्हणाला, " उपासपोटीं विचार करीत बसलं तर घोटाळा उडतो सारा. दुसऱ्याची उठाठेव मग पहातां येईल. आधीं स्वतःच्या जेवणाचा विचार कर आई. "

" तें आतां संध्याकाळीं—" आई म्हणाली, " नाहीं रे, थट्टा नव्हे. आतां वेळ नाहीं. त्या वेड्याकडे नाहीं कांहीं पैसा अडका, नाहीं एवढं मनुष्यबळ, सारी जबाबदारी घेतली पाहिजे मला—मुलीची आई पाहिली ती चांगलीच जबरदस्त वाटली. सहजासहजीं होकार द्यायला तयार होईना. तशी मी तरी तिला बधणार होतें थोडीच !—अरे हा हाच आला कीं !—अगदीं तुला शंभर वर्षं आयुष्य बाबा. तुझ्याच गोष्टी चालल्या होत्या. ये बैस. यावेळीं कुठं आलास हा एकदम ? "

खरें पाहिलें तर दुसऱ्या कोणत्या गांवाहून परक्या माणसाच्या घरीं येण्याची ही वेळ नव्हती.

घरांत पाऊल टाकल्याबरोबर झालेलें हें स्वागत पाहून कुंजनाथ पहिल्यानें थोडासा बावरला. त्यानंतर घाबरत घाबरत येऊन त्यानें तिला प्रणाम केला.

थट्टेच्या स्वरांत वृंदावन म्हणाला, " काय कुंजदादा. तुला हा पत्ता लागला कसा ? एक रात्रसुद्धां वाट पहातां आली नाहीं वाटतं ? नाहींतर उद्यां सकाळीं आला असतास तरी कळलं असतं. "

आई नुसती हंसली आणि म्हणाली, " पण कुंज या बाजुला फिरकला सुद्धां नाहीं ! "

भुंवया वर चढवून कुंज म्हणाला, " बापरे ! बहीण नव्हे—प्रत्यक्ष फौजदार ! "

वृंदावनला हसूं येत होतें म्हणून त्यानें तोंड फिरवलें. येत असलेलें हसें दाबून आईनें विचारलें, " सुनबाईनं कांहीं निरोप पाठवलाय वाटतं ? "

कुंजनाथनें त्या प्रश्नाचेंही उत्तर दिलें नाहीं. तो अगदीं गंभीर होऊन म्हणाला, " असं पहा आई, अशी कशी विसराळू तूं ? समज, कुसुमच्या ऐवजीं दुसऱ्याच कुणाच्या तरी नजरेला आलं असतं तर केवढा घोटाळा उडाला असता ? "

तो काय बोलत होता याची चांगलीशी कल्पना न आल्यामुळें थोडीशी उद्विग्न होऊन ती नुसती पहात राहिली.

वृंदावननें विचारलें, " काय भानगड आहे कुंजदादा ? "

भानगड काय होती त्याची सहजासहजीं उकल करून मोकळें व्हायची कुंजनाथची तयारी नव्हती. अर्थात् वृंदावनचा प्रश्न त्यानें कानीं घेतला नाहीं. तो आईला उद्देशून म्हणाला, " आधीं काय जेवायला घालशील तें सांग—मग सांगतों. "

" तें काय सांगायला हवं ? " आई हंसून म्हणाली, " हें घर तुझंच आहे बाबा. काय हवंय तुला ? "

कुंज म्हणाला, " ठीक आहे, पुनः केव्हां तरी येईन जेवायला. आधीं असं सांग, तुझी कोणती वस्तु हरवली आहे ? "

वृंदावनची आई विचार करूं लागली. तिला कांहीं आठवेना. ती म्हणाली, " नाहीं बाबा. कांहीं हरवल्याचं नाहीं आठवत. "

तिचें उत्तर ऐकून कुंजनाथ मोठमोठ्यानें हो हो करीत हंसत सुटला. त्यानंतर उपरण्याची गांठ सोडून सोन्याच्या बांगड्यांची एक जोडी काढून पुढें करून म्हणाला, " तर मग या तुझ्या नव्हेत असं म्हणणं आहे का तुझं ? " असें म्हणून तो स्वतःवर खूष होऊन आपल्याशींच हसूं लागला.

काल याचवेळीं मोठ्या प्रेमानें आपल्या हातानें तिनें सुनेच्या हातांत ज्या बांगड्या चढवून आशीर्वाद दिला होता, त्याच त्या बांगड्या होत्या. आज

तोच अलंकार—तोच आशीर्वाद—या वेड्या कुंजच्या हातीं तिनें परत केला होता.

वृंदावननें एक क्षणभरच त्या दागिन्याकडे पाहिलें. आईच्या चेहऱ्याकडे त्याची नजर जातांच तो घाबरून मागें हटला. तिचा चेहरा एकदम पांढरा फटक पडला होता. रक्ताचा लवलेशसुद्धां तिथें दिसत नव्हता. संध्याकाळच्या अंधुक प्रकाशांत तिचा चेहरा प्रेताच्या चेहऱ्यासारखा निस्तेज दिसत होता. स्वतः वृंदावनच्या अंतःकरणांत कसलें काहूर माजलें होते तें एक त्या अंतर्यामी भगवंतालाच माहीत !—पण मोठ्या कष्टानें एका क्षणांत स्वतःचें मन आवरून तो आईजवळ आला आणि अगदीं सहज आणि शांतपणें म्हणाला, " आपलं भाग्य मोठं आहे आई. देवानं आपली वस्तु आपल्याकडे परत पाठवली. तुझ्या हातींच्या या बांगड्या—दुसऱ्या कुणाची छाती आहे का या आपल्या हातीं घालायची ? चल कुंजदादा, आपण बाहेर जाऊन बसूं. " असें म्हणून त्याचा हात धरून ओढीत तो त्याला बाहेर घेऊन गेला.

कुंज बिचारा सरळ माणूस—म्हणूनच अशा अवेळीं मोठ्या हौसेनें एवढा रस्ता तुडवीत आला होता. आज दुपारच्या वेळीं जेवणींखाणीं उरकल्यावर उतरल्या चेहऱ्यानें कुसुम हातांत बांगड्यांचा जोड घेऊन आली होती आणि अगदीं कोरड्या वाणीनें हळूच म्हणाली होती, " दादा, काल त्या इथं या चुकून विसरून गेल्या वाटतं. तुला एकदां जाऊन या जिनसा पोंचत्या केल्या पाहिजेत त्यांच्याकडे ! " त्या आनंदाच्या भरांत तिचा उतरलेला चेहरा पहायलाही त्याला अवसर मिळाला नव्हता.

बहिणीनें सांगितलेली हकिकत खरी नव्हती, माणूस माणसाला एवढे मोलवान जिन्नस केव्हां देईल, किंवा दिले तर कुणी ते न घेतां परत करील, ही असंभवनीय गोष्ट ध्यानांत येणें त्याच्या बुद्धीच्या पलीकडचें होतें. म्हणूनच हे डावपेंच त्याला कळले नाहींत. म्हणूनच येतांना वाटेंत तो एकच विचार करीत होता—हरवलेले जिन्नस अकस्मात पुनः मिळाले म्हणजे तीं माणसं कशीं खूष होतील—कसा आपल्याला आशीर्वाद देतील—हेंच पुनः पुनः त्याच्या मनांत येत होतें.

पण तसें कांहींच झालें नाहीं कसें ? जें कांहीं झालें तें बरें कीं वाईट याचासुद्धां त्याला अंदाज करतां आला नाहीं. एवढी मोठी कामगिरी बजा-

वल्याबद्दल आईनें चार गोड शब्द काढले नाहींत किंवा एकादा आशीर्वादही दिला नाहीं, हें पाहून त्याचें मन अगदीं उदासीन झालें. उलट वृंदावननें त्याला धरून ओढून तिच्यासमोरून बाहेर आणलें, तो प्रकारसुद्धां त्याला लज्जास्पद वाटला आणि त्यामुळें तो अगदीं खचल्यासारखा झाला.

एवढेंसें तोंड करून तो मुकाट्यानें बसला होता. वृंदावनसुद्धां त्याच्या जवळच बसला होता पण कांहीं बोलत नव्हता. कांहीं बोलण्याइतकी त्याची मनःस्थिति ताळ्यावर नव्हती. त्याच्या हृदयांत भडकलेली अपमानाची आग त्याला भाजून काढीत होती. तो अपमान त्याचा नव्हता—अपमान झाला होता तो त्याच्या आईचा.

स्वतःबद्दलच्या बऱ्यावाईटाची, मानअपमानाची त्याला पर्वा नव्हती. मरणाची यातना ज्याप्रमाणें इतर सर्व प्रकारच्या यातनांना दाबून टाकून एकटीच डांचत रहाते, त्याचप्रमाणें अपमानामुळें उतरलेला आईचा चेहरा आठवून त्याची सारी जाणीव सुन्न होऊन गेली होती आणि तेवढी एकच जाणीव धगधगत्या ज्योतीप्रमाणें सारखी पेटूं लागली होती.

संध्याकाळचा काळोख दाट होत चालला. कुंजनाथ हळूच त्याला म्हणाला, “ वृंदावन, तर मग आतां जातों बाबा. ”

वृंदावन केंविलवाण्या नजरेनें त्याच्याकडे पहात म्हणाला, “ जा आतां. पुनः केव्हांतरी ये. ”

कुंज निघून गेला. वृंदावन तिथेंच उपडा होऊन पडून राहिला होता. आईनें केवढीं मनोराज्यें बांधलीं होती, भविष्यकालच्या आशेचे केवढे मनोरे रचले होते, ते सारे कसे ढांसळून पडले याचा विचार तो करूं लागला. कोणत्या उपायानें तिला ताळ्यावर आणावें ! कोणत्या शब्दांनीं तिचें सांत्वन करावें !

अशा प्रकारें साऱ्या आशांचे पर्वत ढांसळून पाडून आपल्या उपाशीं असलेल्या शांत संन्यासिनी आईवर अशा रीतीनें जिनें फटका मारला ती त्याची पत्नी होती. तिच्यासाठीं तो वेडा झाला होता. नशिबाचें यापेक्षां आणखी भयंकर विडंबन तें काय असायचें ?

## ५

काल एका दिवसाच्या परिचयामुळें कुसुमनें आपली सासू आणि नवरा यांना ज्याप्रकारें ओळखलें होतें, त्याचप्रकारें त्यांनींही तिची ओळख पटवून घेतली होती, याबद्दल तिला एवढासुद्धां संशय नव्हता. ज्यांना ओळख पटवून घेण्याचें सामर्थ्य आहे त्यांच्या दृष्टीनें अशा प्रकारें आपण आहारीं गेलों, याची जाणीव झाल्यामुळें तिच्या हृदयांत आनंदाच्या फारशा लहरी कांहीं उठल्या नाहींत. स्वत:ला नकळत आपण एका न तुटणाऱ्या बंधनांत अडकून पडलों आहोंत असें तिला वाटलें.

ते बंधन स्वतःच्या हातानें तोडून टाकण्यासाठींच तिनें बांगड्यांचा जोड ज्यावेळीं परत केला, भोळा बिचारा कुंजनाथ मोठ्या आनंदानें जेव्हां तो घेऊन गेला, त्यावेळीं एक क्षणभरच त्या क्षताची वेदना असह्य झाल्यासारखें तिला वाटलें. आपल्या खोलींत जाऊन दार ओढून घेऊन ती रडूं लागली. आपल्या या कठोर आचरणामुळें त्यांच्या मनावर अचानक कसा भयंकर मर्मांतिक आघात होईल, त्यामुळें तिच्याबद्दल त्यांना कसें वाटूं लागेल, याची स्पष्ट कल्पना तिच्या डोळ्यासमोर उभी राहिली.

संध्याकाळ होऊन बरीच वेळा उलटून गेली होती. कुंज घरीं आला आणि घरांत सर्वत्र अंधार आहे असें पाहून बहिणीच्या खोलीसमोर येऊन म्हणाला, "कुशे, दिवा लावला नाहींस का ग ?"

कुसुम तेव्हांपर्यंत उगीच जमिनीवर बैठक मारून बसली होती. शरमिंदी होऊन ती एकदम धडपडत उठून उभी राहिली आणि म्हणाली, "आतां लावतें दादा. केव्हां आलास ?"

"हा आलों हाच !" असें म्हणून कुंज गुडगुडी शोधायला गेला आणि तंबाखू ओढायच्या तयारीला लागला.

दिव्यांत तेलवात करायला तिला वेळच झाला नव्हता. ती सारी तयारी करून दिवे लावीपर्यंत तिला बराच वेळ लागला. येऊन पहाते, तों गुडगुडी भरून घेऊन दादा निघून गेला होता.

'रोजच्याप्रमाणें आज रात्रीं सुद्धां भात वाढल्यानंतर कुसुम त्याच्या जवळच

बसली होती. एवढा लांब चेहरा करून तो मुकाट्यानें जेवीत होता. एक शब्द सुद्धां बोलत नव्हता. एकदां बोलायला सुरवात केली कीं ज्याचें बोलणें केव्हां थांबत नसे, तो हा माणूस आज असा मुकाट्यानें जेवीत असलेला पाहून कुसुमच्या मनांत भलभलत्या शंका येऊं लागल्या.

होऊं नये असें कांहीं झालें आहे याजबद्दल तिला कांहीं शंका नव्हती पण तें काय होतें आणि त्याची मजल कुठपर्यंत गेली होती, तें कळण्यासाठीं तिचा जीव खालीं वर होत होता. एकच शंका तिच्या मनांत येत होती—दादाचा त्यांनीं कांहीं तरी भयंकर अपमान केला असावा. कुणी कमीजास्त हेटाळणी केली तर त्याची तो खिजगणती धरीत नसे आणि धरलीच तरी ती फार वेळ त्याच्या मनांत रहात नसे, हें तिला पक्कें माहीत होतें.

जेवण उरकून कुंजनाथ आतां आंचवायला उठत होता. आतां कुसुमच्यानें स्वस्थ राहावेना. तिनें हळूच विचारलें, "तर मग कुणाच्या हातीं देऊन आलास दादा ?"

"आणखी कुणाच्या हातीं ?" आश्चर्यचकित होऊन कुंज म्हणाला, "आईच्या हातीं देऊन आलों."

"काय म्हणाल्या त्या ?"

"कांहीं नाहीं !" असें म्हणून तो एकदम उठून गेला.

दुसऱ्या दिवशीं फेरीसाठीं बाहेर निघायच्या वेळीं त्यानें कुसुमला आपण होऊनच हांक मारली आणि म्हटलें, "तुझी सासूबाई अगदींच बदलल्यासारखी मला वाटली कुसुम ! असल्या त्या वस्तु नेऊन हातीं दिल्या तर एक शब्दसुद्धां बोलली नाहीं ! त्यांतून वृंदावनच बरा म्हणायचा. तो तरी बिचारा खूष होऊन म्हणाला, 'वाटेल त्या माणसाला तुझ्या हातच्या बांगड्या हातीं घालायची काय छाती आहे आई ? देवानं आमचे जिन्नस आमच्याकडे पाठवून दिले हें आमचं मोठं भाग्य म्हणायचं ?' असं काय म्हणाला ग तो ?"

कुसुमचा सुंदर चेहरा एकदम काळवंडून गेला. मानेला एक हिसडा देऊन ती म्हणाली, "कांहीं नाहीं !—असं म्हटलं का त्यानीं ?"

"हो. अस्संच म्हटलं. आई मात्र एक शब्द सुद्धां बोलली नाहीं. सारा दिवस ती कुठं तरी गेली होती वाटतं. स्नान भोजनसुद्धां झालं नव्हतं तिचं.

गेला कसा, याचेंच त्याला आश्चर्य वाटलें. मुलाची खोड बाप चांगल्या प्रकारें जाणत होता.

इकडे चरणसुद्धां हतबुद्ध झाला होता ! आतांच बापानें त्याला धमकावणी दिली होती. इतक्यांत या अनोळख्या जागीं एकाएकीं कुटून तरी कुणीतरी आली आणि एकदम त्याला उचलून घेऊन गेली—हा अनुभव सुद्धां यापूर्वी त्याला आला नव्हता.

कुसुम घरांत गेली. त्याला बसवून घेऊन तिनें एक बतासा दिला. प्यायला पाणी दिलें. त्यानंतर कितीतरी वेळ ती सारखी त्याच्याकडे टक लावून पहात होती. पहातां पहातां एकाएकीं तिला काय वाटलें कोण जाणे, दोन्ही हात पसरून तिनें त्याला आपल्या हृदयाशीं धरून घट्ट कवटाळलें आणि डोळ्यां-वाटे आसवें गाळीत रडायला सुरवात केली.

तिच्या घट्ट मिठींतून सोडवून घेण्यासाठीं चरण धडपड करूं लागला त्या वेळीं आपल्या पदरानें त्याचें तोंड पुशीत ती म्हणाली, " हें काय बाळ, मी तुझी आई ना ? "

तिला मुलांचें फार प्रेम होतें. कुठलेंही मूल केव्हांही हाताशीं आलें तरी सहसा ती त्याला जाऊं देत नसे. पण आज ती तिची रोजची आवड भलतीकडे भडकली होती. त्या वात्सल्याच्या भुकेच्या भडक्यानें आज तिचें सारें हृदय जळून पिचून छिन्नविच्छिन्न झालें होतें. हें सुंदर गुटगुटित गोंडस बाळ आपल्याच वांट्याला आलें असतें ! पण कां तसें झालें नाहीं ? कुणी असा दावा साधला ? आईपासून मुलाची अशी ताटातूट करायचा एवढा मोठा गुन्हा कसा कुणी केला ?

पुनः पुनः त्याला धरून ती हृदयाशीं कवटाळूं लागली, तशतशी तिच्या मातृहृदयांतील वात्सल्याची उणीव अधिकाधिक जाणवत जाऊन तिच्या मनाचें समाधानच होईनासें झालें. हें आपल्या हक्काचें धन जबरदस्तीनें आपल्यापासून कुणी तरी छिनावून नेलें आहे असेंच तिला वाटूं लागलें.

तो तिचा मायेचा तडाखा चरणला असह्य झाला होता. असें कांहीं होणार असें आधीं कळलें असतें तर नदीवर जाईपर्यंत त्यानें आपली तहान मारली असती. या मायेच्या तडाख्यापेक्षां तहान मारणें फारच सोपें, असें त्याला वाटलें. तो म्हणाला, " सोड मला ! "

त्याच्या दोन्हीं गालांवर आपले हात ठेवून त्याच्या तोंडाकडे पहात कुसुम म्हणाली, " आधीं आई म्हण मला. तरच सोडीन तुला ? "

चरण म्हणाला, " नाहीं. "

" तर मग नाहीं सोडणार तुला. " असें म्हणून कुसुमनें पुनः त्याला हृदयाशीं धरून कवटाळलें. पुनः पुनः ती त्याचे मुके घेत होती आणखी सारखी धापा टाकीत म्हणत होती, " आई म्हण—आई म्हण—आई म्हटलं नाहींस तर मुळींच सोडायची नाहीं तुला. "

रडकुंडीला येऊन चरण म्हणाला, " आई ! "

आतां मात्र त्याला दूर करणें कुसुमला अशक्य होऊन उठलें. पुनः एकवार त्याला उराशीं कवटाळून धरून ती रडूं लागली.

जायला उशीर होत होता. बाहेरून वृंदावन म्हणाला, " तुझं पाणी पिऊन झालं कीं नाहीं रे चरण ? "

रडत रडत चरण म्हणाला, " मला सोडीत नाहीं ही. "

गहिंवरलेल्या आवाजानें कुसुम म्हणाली, " आजचा दिवस चरण राहुंदे माझ्याकडे. "

वृंदावन दाराजवळ आला आणि म्हणाला, " त्याला कसं इथं ठेवतां येईल ? शिवाय अजून तो जेवलासुद्धां नाहीं. आई तिकडे काळजी काढील. "

पुनः तशाच प्रकारें कुसुमनें उत्तर दिलें, " नाहीं—तो राहील इथं. आज माझं मन फार उद्विग्न झालंय. "

" काय झालंय मनाला ? "

कुसुमनें त्या प्रश्नाचें उत्तर दिलें नाहीं.

क्षणभर थांबून ती म्हणाली, " गाडी जाऊं दे परत. उशीर झालाय. मी नदीवर जाऊन चरणला आंघोळ घालून आणतें. " असें म्हणून त्याच्या उत्तराची अपेक्षा न करतां तिनें तेलाची वाटी आणि पंचा घेतला आणि चरणला कडेवर घेऊन ती नदीकिनारीं गेली.

घराच्या खालच्याच बाजूला एक नदी होती. तिचें पाणी स्वच्छ असलें तरी थोडेंसेंच होतें. नदीचें पाणी पहातांच चरण एकदम खुषींत आला. त्याच्या गांवीं नदी नव्हती, एक तलाव होता, पण त्यांत त्याला कुणी उतरूं देत नसे. नदीच्या पाण्यांत डुंबायला मिळायची ही संधी त्याला अपूर्व वाटली.

त्याला घाटावर बसवून घेऊन तिनें त्याच्या सर्वांगाला तेल माखलें. त्या घाटावरूनच त्यानें गुढघाभर पाण्यांत उडी मारली. बराच वेळपर्यंत तो पाण्यांत डुंबत होता. त्याला कडेवर घेऊन ज्या वेळीं ती परत आली त्या वेळीं मायलेकरांचें चांगलेंच सूत जमलें होतें.

मुलाला कडेवर घेऊन कुसुम बाहेर आली. तिचा चेहरा साफ उघडा होता. डोईवरचा पदर जेमतेम डोक्यावर होता. जायच्या वेळीं मन उद्विग्न झाल्याची गोष्ट ती बोलली होती खरी पण आतां यावेळीं तिच्या चेहऱ्यावर कोणत्याही प्रकारची दुःखाकष्टाची लवलेश छाया नव्हती. उलट तिचे ओंठ नुकत्याच फुललेल्या गुलाबाच्या पाकळीसारखे हसतांना फुलून आलेले दिसत होते. तिच्या वागणुकींत एवढासुद्धां संकोच किंवा कुंठितपणा दिसून येत नव्हता. अगदीं स्वभाविकपणें ती म्हणाली. "आतां तुम्हीं जा, अन् स्नान करून या."

"मग काय ?"

"जेवा."

"मग काय ?"

"जेवल्यानंतर थोडी झोंप घ्या."

"मग काय ?"

"चला ! मला नाहीं माहीत. हा घ्या पंचा—आतां उशिर करूं नका." असें म्हणून तिनें हंसत हंसत नवऱ्याच्या अंगावर पंचा फेंकला.

वृंदावननें तो पंचा झेलून घेतला, एकदां तोंड वळवून तिला नकळत एक मोठा सुस्कारा टाकला आणि म्हटलें, "आणि तूं सुद्धां उशिर लावूं नकोस. चरणला कसेबसे दोन घांस खायला घाल. मला घरीं गेलंच पाहिजे."

"कां गेलंच पाहिजे ? गाडी परत गेली कीं आईना कळेल आपोआप !"

"म्हणूनच गाडी परत पाठवली नाहीं. तिथं झाडाखालीं सांवलींत उभी केली आहे."

तें ऐकून कुसुमचा हंसरा चेहरा एकदम उतरला. कांहीं वेळ ती तशीच विचार करीत उभी होती. नंतर वर त्याच्याकडे पाहून तिनें म्हटलें, "तर मग मी म्हणतें, आईला नकळत तुम्ही इथं आलां तेंच बरोबर केलं नाहीं."

तिच्या रुसव्याचा हा सूर ध्यानांत आल्यामुळें वृंदावन हंसला खरा पण त्या हंसण्यांत आनंदाचें लक्षण नव्हतें. त्यानंतर तो अगदीं साहजिकपणें

म्हणाला, " पहिल्यापासून मी अशाच शिस्तींत वाढलोंय कुसुम. मी आईला न कळत या घरींच काय पण या गांवांतसुद्धां पाऊल टाकलं नसतं. जाऊं दे. तो विषय आतां संपला आहे. पुन: तो विषय काढण्यांत कांहीं हंशील नाहीं— तुलाही नाहीं, मलाही नाहीं. जा. उगीच उशीर लावूं नकोस. त्याला थोडं खायला घाल. " असें म्हणून वृंदावन जाऊन अंथरलेल्या बैठकीवर बसला.

डोळ्यांत येणारीं आसवें आवरण्याचा प्रयत्न करीत खालच्या मानेनें मुकाट्यानें मुलाला उचलून घेऊन ती आंत गेली.

घटकाभऱ्यानें पितापुत्र गाडींत बसून घरीं जायला निघाले. जातांना चरणनें बापाला विचारलें, " बाबा, आई एवढी रडत होती कां हो ? "

वृंदावन आश्चर्यचकित होऊन म्हणाला, " ती तुझी आई म्हणून कुणी सांगितलं रे तुला ? "

चरण जोराजोरानें म्हणाला, " हो. हो. माझी आईच आहे ती. आहे ना ?"

त्याच्या प्रश्नाचें उत्तर न देतां वृंदावननें त्याला विचारलें, " तूं राहशील आपल्या आईजवळ ? "

चरण खूष होऊन मान हालवीत म्हणाला, " राहिन तर बाबा. "

" ठीक आहे. " असें म्हणून वृंदावन तोंड फिरवून गाडीच्या एका बाजूला आडवा झाला. वर सूर्य तळपत होता. आकाश स्वच्छ होतें. तो तिकडे पहात होता.

दुसऱ्या दिवशीं दुपार उलटल्यानंतर दाराची कडी काढून कुसुम पाणी आणण्यासाठीं नदीवर जायला निघाली होती. एक बारा तेरा वर्षांचा मुलगा इकडे तिकडे पहात पुढें आला आणि म्हणाला, " कुंज बैराग्याचं घर दाखवाल का मला ? "

" हो. कुठून आलायस तूं ? "

" बाडल गांवांहून. पंडितमहाशयांनीं पत्र दिलंय. " असें म्हणून त्यानें अंगावरच्या मळक्या उपरण्यांतून काढून एक पत्र दिलें.

कुसुमच्या नसांनसांतलें रक्त सळसळून उठलें. पहाते तों त्या पत्रावर तिचेंच नांव होतें. उघडून पाहिल्यावर तिला असें दिसून आलें, कीं तें पत्र लांबलचक होतें—खुद्द वृंदावननें लिहिलेलें होतें.

पत्रांत काय लिहिलें आहे हें कळण्यासाठीं जरी तिचा जीव उतावीळ

झाला होता तरीही ती जिज्ञासा मोठ्या प्रयत्नानें आवरून तिनें त्या मुलाला आंत बोलावून घेतलें आणि विचारलें, " कोण हे तुझे पंडित महाशय ? हें पत्र कुणी दिलं तुझ्याकडे ?"

आश्चर्यचकित होऊन तो मुलगा म्हणाला, " पंडित महाशयांनीं दिलं. "

वृंदावनच्या शाळेचा इतिहास कुसुमला माहीत नव्हता, त्यामुळें त्याच्या उत्तरावरून तिला कांहींच बोध झाला नाहीं. तिनें पुनः विचारलें, " चरणच्या वडलांना ओळखतोस !"

" ओळखतों तर. तेच तर पंडित महाशय. "

" ते शिकवतात का तुला ?"

" मलाच कां, सारींच मुलं येतात कीं त्यांच्या शाळेंत शिकायला. "

कुसुमची उत्सुकता जागी झाली. त्या मुलाला प्रश्न करकरून तिनें सारी हकिकत समजावून घेतली. त्याच्याच घरांत ही शाळा होती. कुणाला फी द्यावी लागत नसे. पाटी पेन्सिल पुस्तकें पंडित महाशय पदर मोड करून विकत आणून साऱ्या मुलांना देत. गरीबाघरच्या ज्या मुलांना दिवसा शाळेंत येणें शक्य नव्हतें त्यांना संध्याकाळीं शिकवीत आणि देवाची आरती झाल्यानंतर प्रसाद घेऊन सारीं मुलें आरडाओरडा करीत घरीं निघून जात. दोघे चांगलेच प्रौढ असलेले विद्यार्थी याच शाळेंत इंग्रजी शिकत होते वगैरे वगैरे हकिकत त्या मुलानें सांगितली.

पोहे आणि बतासे देऊन कुसुमनें त्या मुलाला निरोप दिला आणि पत्र उघडून ती वाचायला बसली.

सुखाचें स्वप्न कुठल्या तरी जबरदस्त वादळाच्या झपाट्यासरशीं उधळून गेलें. तें पत्र तिलाच उद्देशून लिहिलें होतें खरें पण त्यांत तिला असें कांहींच लिहिलें नव्हतें. जिव्हाळ्याचा एक शब्द सुद्धां नव्हता—नुसता आशीर्वादसुद्धां नव्हता !

आणि हें तिचें पहिलें पत्र. यापूर्वी कुणाकडूनच तिला कधीं पत्र आलें नव्हतें. आपल्या मैत्रिणींना आलेलीं पत्रें तिनें वाचलीं होती. त्या पत्रांत आणि या पत्रांत केवढा भयंकर फरक होता ! आरंभापासून शेवटपर्यंत कामाच्या गोष्टी—कुंजनाथच्या लग्नाच्या गोष्टी. हेंच सांगण्यासाठीं तो काल आला होता. आईनें स्थळ ठरवलें आहे, खर्चाचा सारा भार तिनेंच घेतला

आहे, असें वृंदावननें लिहिलें होतें. सर्वदृष्ट्या हें लग्न होणें अवश्य होतें. त्यांत कुंजनाथचेंही कल्याण होतें आणि तिचेही सांसारिक कष्ट हलके झाले असते वगैरे वगैरे गोष्टी स्पष्ट करून त्या पत्रांत लिहिल्या होत्या. एकदां तें पत्र वाचून झाल्याबरोबर तिनें पुनः एकदां तें वाचायचा प्रयत्न केला. पण या वेळीं पत्रांतलीं सारीं अक्षरें तिच्या डोळ्यासमोर सारखीं नाचूं लागलीं. पत्र बंद करून ठेवून ती कशीबशी आपल्या खोलींत येऊन आडवी पडली. एवढी मोठी आनंदाची गोष्ट पण तिच्या मनांत त्यामुळें एवढासुद्धां आनंदाचा आभास उत्पन्न झाला नाहीं.

## ६

कुंजनाथचें लग्न होऊन सुमारें एक महीना झाला होता. पूर्वी उल्लेख केलेल्या दिवसानंतर वृंदावन पुनः या बाजूला आला नव्हता.

लग्नाच्या दिवशींही, ताप आला आहे असें सांगून तो गैरहजर राहिला होता. त्याची आई मात्र चरणला घेऊन तेवढ्या लग्नाच्या दिवसापुरती आली होती. घरचें देवस्थान टाकून यापेक्षां जास्त वेळ रहाणें तिला मुळींच शक्य नव्हतें. मात्र चरण तेवढा आणखी चार पांच दिवस तिथें राहिला होता. मनासारखी नवी आई मिळाल्यामुळें असो, किंवा नदींत स्नान करायला मिळतें या लालचीमुळें असो, तो परत घरीं जायला तयार नव्हता. त्याला जबरदस्तीनें घरीं न्यावें लागलें आणि तेव्हांपासून कुसुमचें जीवन असह्य होऊन उठलें.

हें लग्न होण्याच्या आधींपासून कुसुमच्या मनांत ज्या ज्या शंका उत्पन्न झाल्या होत्या, त्या अगदीं अक्षरशः प्रत्यक्षांत यायला सुरवात झाली होती. ती आपल्या दादाला चांगलीच ओळखत होती. सासूच्या नादीं लागून, हा दुःखाकष्टाचा संसार सोडून आपला दादा घरजांवई व्हायला फार उत्सुक झाला आहे असा तिचा अंदाज होता.

आणि शेवटीं अगदीं तेंच झालें. ज्या डोक्याला बाशिंग बांधून तो लग्नासाठीं उभा राहिला होता त्याच डोक्यावर आतां पांटी घेण्याची त्याची तयारी नव्हती. त्याला वाटे, नळडांग्याच्या आपल्या सग्यासोयऱ्यांना तें कळलें तर ते काय म्हणतील ?

लग्नाच्या वेळीं वृंदावनच्या आईनें मोठ्या युक्तीनें त्याला कांहीं रोख रक्कम दिली होती. त्या रकमेंतून माल खरेदी करून बाहेर रस्त्याच्या कडेला एक कच्ची पडवी काढून त्यानें किरकोळ सामानविक्रीचें दुकान उघडलें होतें.

एक पैशाचीसुद्धां विक्री होत नव्हती. इकडे कुंज मात्र नवे कपडे आणि नवे बूट पेहरून या एक महिन्याच्या अवधींत आपल्या सासुरवाडीला तीनचार वेळ जाऊन आला होता.

पूर्वी कुंज कुसुमला फार घाबरत असे पण आतां त्याची ती भीति गेली होती. घरांत डाळतांदूळ नाहींत असें तिनें सांगितलें तर तो एक शब्दसुद्धां न बोलतां केव्हां दुकानीं जाऊन बसे — तर केव्हां अशा कुठेंतरी जाई, कीं साऱ्या दिवसांत घरीं पत्ताच नसे.

कुसुमला चारी दिशा उघड्या पडल्यासारख्या वाटत होत्या. तिनें जे चार पैसे संग्रहीं टाकले होते तेही आतां जवळजवळ संपत आले होते पण कुंज कांहीं डोळे उघडून पहात नव्हता. नव्या दुकानीं बसून सारा दिवस हुक्का पीत पेंगत राहिला होता. कुणी माणसें आलीं तर त्यांच्याबरोबर सासुरवाडीच्या बढाया सांगे, किंवा नव्या घरसंसाराच्या जिनसांची यादी तयार करीत असे.

त्या दिवशीं सकाळींच उठून कुंज वार्निश केलेल्या नव्या बुटांना तेल लावून ते चकचकित करीत होता. सैंपाकघरांतून कुसुम बाहेर आली आणि क्षणभर त्याच्याकडे पहात राहून म्हणाली, "पुनः आजसुद्धां नळडांग्याला जाणार आहेस वाटतं ?"

नुसता हुंकार देऊन कुंज मुकाट्यानें आपलें हातचें काम उरकित होता.

थोड्या वेळानें कुसुम भीतभीत म्हणाली, "परवांच तर तिकडे गेला होतास दादा. आज एक वेळ माझ्या चरणला पाहून ये ना. फार दिवस त्याची कांहीं खबर कळली नाहीं—मन कसं हुरहुरतं आहे माझं."

तिरसटपणानें कुंज म्हणाला, "जेव्हां तेव्हां तुझं मन असं हुरहुरतं. कांहीं झालं नाहीं. चांगला खुशाल आहे तो."

कुसुमला राग आला. पण तो बाहेर न दाखवतां ती म्हणाली, "असो बिचारा खुशाल–पण एकदां जाऊन पाहून ये ना. सासुरवाडीला उद्यां जा."

कुंज एकदम गरम झाला आणि म्हणाला, "उद्यां जाऊन कसं चालेल ?

तिथं कुणीसुद्धां पुरुषमाणूस नाहीं, घरदार आहे, विषयआषय आहे— काय आहे, काय नाहीं—कसं चाललंय त्याचा सारा भार आहे माझ्यामाथीं. मी हा असा एकटा माणूस, किती बाजू संभाळायच्या मी एकट्यानं ?"

कुसुमला राग आला होता खरा पण त्याच्या भाषणाचें तें अवसान पाहून तिला हसूं आलें. ती हंसत हंसत म्हणाली, "संभाळशील रे दादा. तुझ्या पायां पडतें, आज जाच एक वेळ. कां कोण जाणे, खरोखरच आज मला त्या पोराची सारखी आठवण येतेय अन् कससंच होतंय."

बुटाचा जोड हातानें लोटून टाकून कुंज चिडून म्हणाला, "मी नाहीं जाणार तिकडे. माझ्या लग्नाच्या वेळीं वृंदावन आला नाहीं ! कां आला नाहीं ? एकदांसुद्धां माझ्या लग्नाला येऊं नये असा एवढा हा बडा माणूस आहे तरी कोण ? सांग ना !"

त्याचें हें वर्तन कुसुमला पदोपदीं असह्य होऊं लागलें होतें, तरीही ती अगदीं शांतपणें म्हणाली, "ताप आला होता त्यांना."

"कांहींसुद्धां झालं नव्हतं. बसल्या बसल्या माझ्या सासुबाईला नळडांग्यांतच सारं कांहीं कळलंय !—अगदीं खोटं ! नुसती लबाडी ! तिच्या डोळ्यांत धूळ टाकणं इतकं सोपं नाहीं बरं कुसुम. घरबसल्या ती साऱ्या जगाची खबर घेऊं शकते तें माहित आहे का तुला ? अगदीं खोटं. निमकहरामी याला म्हणायचं नाहीं तर म्हणायचं कशाला ? त्याचं तोंडसुद्धां बघायचा नाहीं मी."

गंभीरपणें उठून कुंज उभा राहिला आणि पायांत बूट घालूं लागला.

कुसुमला चांगलाच धक्का बसला. कांहीं वेळपर्यंत ती ताठरून स्तब्ध राहिली होती. नंतर अगदीं संथपणें म्हणाली, "ते निमकहराम का ? त्या दिवशीं त्यांना आमंत्रण दिलंस अन् स्वतः घाबरून पळून गेलास, त्यावेळीं कुठल्या मिठाला कितीसा जागला होतास ? तुझ्या बुद्धींत असा पालट होईल हें स्वप्नांतसुद्धां मला वाटलं नव्हतं दादा."

कुंजकडून या आरोपावर कांहींच उत्तर आलें नाहीं. जसें कांहीं आपण तिचें भाषणच ऐकलें नाहीं असा आव आणून तो उभा राहिला होता.

कुसुम पुढें म्हणाली, "—आतां त्यांच्या घरदाराची काळजी घ्यायच्या गोष्टी बोलतो आहेस. पण हा संबंध जोडला कुणी ? कुणी तुझं हें लग्न जमवून आणलं ?"

कुंज जातां जातां मागें वळला आणि थांबून म्हणाला, "कोण कुणाचं लग्न जुळवून जुळत नाहीं. सासूबाई म्हणतात, वेळ आली कीं कोण कुठं आड येत नाहीं. लग्न होऊन जातं आपोआप !"

"आपोआप होतं ?"

"होतं तर !"

यावर कुसुम कांहीं बोलली नाहीं. मुकाट्यानें आंत निघून गेली. तिला भावाचा तिटकारा आला होता. त्याची ती वृत्ति पाहून तिचें हृदय फाटून जात होतें. छे ! छे ! त्यांच्यापैकीं कुणी हें कांहीं ऐकलें तर ! भाऊबहीण दोघेंही एकाच मुशींतून ओतलेलीं, असं त्यांना नाहीं का वाटायचं ?

पंधरावीस मिनिटांनीं बुटांचा करकर आवाज ऐकूं आला त्यावेळीं कुसुमनें बाहेर येऊन विचारलें, "केव्हां येणार आहेस ?"

"उद्यां सकाळीं."

"मला घरीं एकटी टाकून जायला तुला कांहींच का वाटत नाहीं ? लाजसुद्धां वाटत नाहीं का ?"

"कां ? इथं असे कोण वाघलांडगे आहेत, कीं ते तुला खायला येणार आहेत ? सकाळींच तर येतोंय मी ?" असें म्हणून कुंज सासुरवाडीला निघून गेला.

कुसुम सैंपाकघरांत गेली आणि पेटलेल्या चुलींत पाणी ओतून जाऊन आपल्या बिछान्यावर आडवी पडली.

## ७

पश्चात्तापानें पोळलेला पापी माणूस निरुपाय होऊन ज्याप्रमाणें आपल्या चुकीची कबुली देतो, अगदीं त्याचप्रमाणें मुद्रा धारण करून वृंदावन आपल्या आईपाशीं आला आणि म्हणाला, "मला क्षमा कर आई. मला हुकूम कर, कीं कुठून तरी शोधून काढून तुझ्या हाताजवळ काम करायला एक माणूस आणून देतों. आतां यापुढं हा संसाराचा सारा बोजा सर्वस्वीं तुझ्या माथीं पडलेला माझ्यानं पहावत नाहीं."

देवघरांत बसून आई पूजेची तयारी करीत होती. वृंदावनकडे वर नजर करून ती म्हणाली, "काय करणार आहेस म्हटलंस ?"

" तुला एक माणूस आणून देतों. ती चरणचीही काळजी घेईल अन् तुझीही सेवा करील—जरूर पडली तर हें देवघरसुद्धां संभाळील. हुकूम देतेस ना आई ? "

हा प्रश्न टाकल्यानंतर वृंदावन उत्सुक आणि व्यथित दृष्टीनें आपल्या आईच्या तोंडाकडे पहात राहिला.

आतां आईच्या ध्यानांत आलें. स्वजातीची असल्याखेरीज इतर कुणाही स्त्रीला देवघरांत प्रवेश करतां आला नसता.

कांहीं वेळ विचार करून ती म्हणाली, " खरंच का तूं असं म्हणतो आहेस वृंदावन ? "

" खरं तर काय आई ! लहाणपणीं कदाचित तुझ्यासमोर खोटं बोललों असेन—तें तुझं तुलाच माहीत !—पण कळूं लागल्यापासून आजवर तुझ्यासमोर कधींच खोटं बोललों नाहीं आई. "

" ठीक आहे. पहातें विचार करून " असें म्हणून आई उगीच थोडीशी हंसली आणि आपल्या कामाला लागली.

वृंदावन येऊन तिच्यासमोर बसला आणि म्हणाला, " तें आतां चालायचं नाहीं आई. आतां तुला विचार करायला मी मुळींच संधी देणार नाहीं. होय असो कीं नाहीं असो, तुझा हुकूम घेतल्याशिवाय इथून जायचं नाहीं असा निश्चय करून आलों आहें. होकारच हवाय मला. "

" विचार करायला संधी कां देणार नाहींस ? "

" त्याचं कारण असं आहे आई, विचार करकरून तूं जें कांहीं सांगशील तें तुझं स्वतःचं सांगणं होईल. माझ्या आईचा हुकूम व्हायचा नाहीं तो. बऱ्यावाईटाची चर्चा मला नको आहे. नुसती तुझी संमती हवी आहे. "

आई त्याच्या तोंडाकडे पहात म्हणाली, " पण ज्यावेळीं मी संमती देत होतें, अगदीं काकुळतीला येत होतें, त्यावेळीं तर तूं माझं मुळींच ऐकलं नाहींस वृंदावन. "

" तें खरं आहे. त्या पापाचं प्रायश्चित्त करायचं आहे मला. त्याच पापाच्या जाणिवेनं चोंहींकडून घेरून टाकलंय मला. " असें म्हणून मान खालीं घालून तो स्वस्थ राहिला.

केवळ आपल्याला सुखी करण्यासाठींच तो हा प्रस्ताव करीत होता याची

तिला जाणीव होती. हा प्रस्ताव प्रत्यक्ष अंमलांत आणायच्या वेळीं त्याला किती जाणवलें असतें, याची पुरेपूर कल्पना असल्यामुळें तिला गहिंवर आला. डोळ्यांत पाणी आणून ती थोडक्यांत म्हणाली, " सध्यां राहुं दे वृंदावन. एकदोन दिवसांनीं आपण बोलूं. "

वृंदावन हट्टाला पेटला होता. तो म्हणाला, " तुझं मन कां मागंपुढं होतंय तें मला माहीत आहे. आणखी दोन दिवसांनीं त्यांत मुळींच बदल व्हायचा नाहीं. तिनं तुझा उपमर्द केला आहे. तुला वाटलं तर तूं तिला क्षमा कर पण मी क्षमा करणार नाहीं. आतां अगदीं अनावर झालंय मला. मला एकदां संमती दे, कीं माझा जीव खालीं पडेल. "

आईनें पुन: एकदां त्याच्या तोंडाकडे पाहिलें आणि क्षणभर विचार करून एक मोठा सुस्कारा टाकून म्हटलें, " ठीक आहे. माझी संमती आहे. "

त्या सुस्काऱ्याचें मर्म वृंदावनला कळून चुकलें होतें, तरीही तो विशेष कांहीं बोलला नाहीं. एक शब्दसुद्धां न बोलतां तिच्या पायावर डोकें ठेवून प्रणाम करून तो बाहेर येऊन उभा राहिला.

" पंडित महाशय, हें पत्र आलंय आपल्याला—" असें म्हणून पाटशाळेतल्या एका विद्यार्थ्यानें एक पत्र त्याच्या हातीं दिलें.

" कुणाचं पत्र रे वृंदावन ? " आईनें आंतून विचारलें.

" कुणाचं कोण जाणे. पहातों हं ! " असें म्हणून भ्रमिष्ठासारखा वृंदावन आपल्या खोलींत निघून गेला.

त्यानें पत्र उघडून पाहिलें. तें अक्षर बायकी होतें. अगदीं सुवाच्य लिहिलेलें होतें. कुठे एवढीसुद्धां खोडाखोड नव्हती. शुद्धलेखनाच्या चुका नव्हत्या. वर ठराविक मायना लिहिला होता पण खालीं कुणाची सही नव्हती. कुसुमचें अक्षर यापूर्वी जरी त्यानें पाहिलें नव्हतें तरीही त्याला तेव्हांच कळून चुकलें, कीं हें तिचेंच पत्र.

तिनें लिहिलें होतें—दादाला पाहिलें तर आतां तुम्हीं त्याला ओळखणार नाहीं. कां तें दुसऱ्या कुणाला सांगता यायचें नाहीं. तुम्हांला सांगतांना सुद्धां लाजेनें माझी मान खालीं होते आहे. तो आजसुद्धां पुन्हां सासुरवाडीला गेला आहे. कदाचित् उद्यां परत येईल, कदाचित् येणारही नाहीं. कारण जातांना तो म्हणाला, मी इथें एकटी असलें तर मला खाऊन टाकतील

म्हणायला इथें कांहीं वाघलांडगे नाहींत. तुम्हांला असें कांहीं वाटत नसेल तर चरणला माझ्याकडे ठेवून जा.

सकाळीं दादाच्या रागानें कुसुमनें चुलींत पाणी ओतलें होतें. त्यानंतर चूल पेटलीच नव्हती. सारा दिवस ती उपाशी होती. भीतीनें मन अस्वस्थ झालें होतें म्हणून हजार वेळ घराच्या आंत बाहेर करतां करतां जेव्हां संध्याकाळ झाली, कुणी येत नाहीं असे जेव्हां तिला वाटूं लागलें, तेव्हां भरल्या घरांत अहोरात्र आपल्याला एकटेंच रहावें लागणार अशी कल्पना मनांत येऊन तिच्या अंगावर कांटा उभा राहूं लागला. अगदीं याचवेळीं बाहेरून चरणच्या तोंडची ‘ आई ’ अशी हांक ज्यावेळीं तिच्या कानीं आली, त्यावेळीं भरल्या पाण्यांतून पोहतांना एकाएकीं पायाला जमीन लागल्यासारखें तिला वाटलें.

ती धांवत गेली आणि चरणला तिनें आपल्या हृदयाशीं कवटाळलें. आतां आपण एकटी नाहीं असें मनाला पटवण्यासाठीं तिनें चरणचा चेहरा आपल्या चेहऱ्याशीं भिडवला.

चरणबरोबर नोकर आला होता. रात्रीं जेवण झाल्यावर कुंजनाथच्या नव्या दुकानीं त्याला जागा करून देण्यांत आली. बिछान्यावर पडल्यावर तिनें चरणला आपल्या उराशीं घट्ट कवटाळून धरलें आणि हळूहळू एकेक प्रश्न विचारायला सुरवात केली. ती म्हणाली, “ काय रे चरण, तुझे बाबा काय करताहेत ? ”

चरण एकदम खडबडून उटला आणि काढून ठेवलेल्या कोटाच्या खिशांतील एक छोटीशी मोटली तिच्या हातीं देऊन म्हणाला, “ मी अगदींच विसरलों आई, बाबांनीं तुला दिलीय. ”

ती हातीं घेतांच आंत पैसे असल्याचें कुसुमला कळून चुकलें.

चरण म्हणाला, “ ही दिली नि बाबा निघून गेले. ”

कुसुम अस्वस्थ होऊन म्हणाली, “ कुठून निघून गेले रे ? ”

हातानें दाखवून चरण म्हणाला, “ या—इथून. ”

“ म्हणजे या इथपर्यंत आले होते ते ? ”

चरण होकार देत म्हणाला, “ हो. आले होते तर ! ”

कुसुमनें यानंतर त्याला कांहीं विचारलें नाहीं. रागारागानें ती स्तब्ध होऊन राहिली होती. मागें एकदां दुपारच्या वेळीं एक घोटभर पाणीसुद्धां न पीतां

चरणला घेऊन तो निघून गेला होता. चीड आल्यामुळें तिनेंही पुन्हां त्याला हांक मारली नव्हती. उलट चार करडे शब्द त्याला ऐकवले होते. तव्हांपासून त्यानें एकदांसुद्धां तिला तोंड दाखवलें नव्हतें. पूर्वी इकडे येण्यासाठीं त्याला नाहीं नाहीं ती कारणें सांपडत होतीं —आतां सारींच कारणें एकदम संपून गेलीं होतीं. त्याच्या दृष्टीनें सारें कांहीं संपलें होतें खरें, पण दिवसामागून दिवस त्याची वाट पहात सकाळपासून संध्याकाळपर्यंत रोज रोज ती कशी काळ कंठीत होती तें तिच्या अंतरात्म्यालाच माहित होतें. रस्त्यांत बैलगाडीचा शब्द ऐकूं आला तर तिच्या नसानसांतून रक्त कसें सळसळून उठे. आशाळभूतपणानें दाराआड उभी राहून सारखी टक लावून ती वाट पाही.

दादाच्या लग्नाच्या वेळीं तो आला नव्हता — आज दारापर्यंत येऊन सुद्धां न भेटतां परत गेला !

तिला त्या दिवसाची हकिकत आठवली. बांगड्या परत करण्यासाठीं तिचा दादा ज्या वेळीं गेला होता त्यावेळीं ती त्याला म्हणाली होती, कीं आपली वस्तू आपल्याकडे परत पाठवून देवानें आपल्याला जाग आणून दिली.

शेवटीं खरोखरच का तो असाच समज करून घेऊन राहणार ? आपण त्याचें मन दुखवायचें कांहीं ठेवलें नाहीं—वारंवार उलटून बोलून घेतलें — त्याच्या आईचा अपमान करायलाही कमी केलें नाहीं—त्या दिवशीं एवढी दुर्बुद्धि आपल्याला कां झाली हें तिचें तिलाच कळेना. ज्या बाबतींत आजवर जीव तोडून दूर रहायचा तिनें प्रयत्न केला होता, त्याच्या विरुद्ध आतां तिचें मन देहासकट भडकून उठलें. तिला अत्यंत चीड आली. ती आपल्याशींच युक्तिवाद करूं लागली, 'काय हें असें ? मी नाहीं म्हणतांच उडवून द्यायला हें नातें काय असेंतसें जुळलेलें होतें ? तसें नाहीं म्हणावें, खरोखरीच जर तो माझा नवरा नव्हे, तर मग माझ्या हृदयांतील सारी भक्ती, अंतरांतील सारी कामना, अशी एकाग्र होऊन कां एवढी ओढ घेते ? एकच दिवस त्याच्याजवळ दोन कौटुंबिक गोष्टी बोललें, एक घटकाभर कुठें एवढीशी त्याची सेवा केली, त्यांतूनच का एवढी ही प्रेमाची ओढ उत्पन्न झाली ?—' ती पुन्हां पुन्हां जोरजोरानें आपल्या मनाला पटवून द्यायचा प्रयत्न करीत म्हणाली, '—छे छे ! मुळींच नाहीं. एवढेंसुद्धां खरें नाहीं. मी वाटेल तेवढ्या वेळ वाटेल ती शपथ घेऊन सांगेन, कीं माझी जी बदनामी झालीय ती

अगदीं खोटी आहे. अपमानाची तिडिक आल्यामुळें एवढासुद्धां मागला पुढला विचार न करतां उगीच तो नसता कलंक माझ्या नांवाला चिकटवला गेला!'

ती कांहीं वेळ स्तब्ध राहिली आणि पुन्हां आपल्याशींच विचार करूं लागली, —आई तर मरून गेली. खरेंखोटें करायचा पुरावा मिळवायला आतां साधन नाहीं. मी कांहीं तरी बोलून गेलें असेन पण मी त्यांची धर्मपत्नी आहें हें त्यांना तर माहित आहे? मग मी भलतीच मिजास दाखवली तर ती त्यांनीं कां हिशेबांत घ्यावी? त्यांनीं कां मुद्दाम येऊं नये? माझा सारा गर्व पायाखालीं तुडवून चिरडून मला ओढून वाटेल तिथें कां ओढून घेऊन जाऊं नये? मी नाहीं म्हटलें—विरोध केला—तर तो त्यांनी कां हिशेबांत घ्यावा? सत्ता त्यांची आहे ना?'

सहसा तिचें सर्वांग थरारून उठलें त्यासरशीं उराशीं कवटाळलेल्या चरणची झांपड मोडली आणि तो म्हणाला, "काय झालं आई?"

त्याला हृदयाशीं आणखी घट्ट कवटाळीत कुसुम कुजबुजत म्हणाली, "सांग ना चरण, तुला कोण अधिक आवडतं? तुझे बाबा कीं मी?"

चरणनें चट्कन् उत्तर दिलें, "तूं—आई!"

"मोठा झालास म्हणजे माझी काळजी घेशील? मला जेवायखायला घालशील?"

"होय तर!"

"तुझ्या बाबानीं मला जर घालवून दिलं तर तुझ्या या आईला तूं आसरा देशील?"

"होय तर!"

कोणत्या परिस्थितींत काय केलें पाहिजे याची त्याला अटकळ नव्हती खरी. पण कोणत्याही परिस्थितींत आपल्या या नवीन आईला ती मागेल तें दिलें पाहिजे एवढें त्याला पटलें होतें.

कुसुमच्या डोळ्यांतून एकामागून एक करीत एकेक टीप पाझरूं लागलें. चरणला झोंप लागली तेव्हां डोळे पुसून त्याच्याकडे पाहून ती आपल्याशींच म्हणाली, 'आतां कसली काळजी? कुणीच मला आसरा दिला नाहीं तर हा माझा मुलगा आहे ना! तो तर मला जवळ करील!'

दुसऱ्या दिवशीं सूर्योदय झाल्यावर नदीवर स्नान करून मायलेक घरीं परत

आलीं, त्यावेळीं एक प्रौढ बाई अंगणांत उभी राहून कांहींतरी प्रश्न करीत होती आणि कुंजनाथ मोठ्या आदबीनें तिला यथायोग्य उत्तरें देत होता, असें तिला दिसून आलें. ती कुंजनाथची सासू होती. ती जी आली होती ती नुसतें कुंजनाथचें घर पाह्यला नव्हे—तर आपल्या एकुलत्या एक कन्या-रत्नाला अशा जागीं पाठवणें निर्घोर आहे कीं नाहीं, याची स्वतःच्या डोळ्यांनीं खात्री करून घेऊन पुढला बेत ठरवण्यासाठींच ती आली होती,

कुसुम आलेली पाहतांच ती थक्क झाली आणि तिच्याकडे टकमक पाहत राहिली. ओलेत्या वस्त्रांतून तिच्या तारुण्याचें वैभव उठावून दिसत होतें. बावनकशी सोन्यासारखी अंगकांति ओल्या वस्त्रांतूनदेखील फुटून बाहेर येत होती. माथ्यावरचे भिजलेले भरगच्च केंस सारी पाठभर पसरून गुडघ्या-पर्यंत रुळत होते. तिच्या डाव्या कमरेवर भरलेली कळशी होती आणि उजव्या हातानें तिनें चरणचा हात धरला होता—त्याच्याही हातांत पाण्यानें भरलेला एक छोटासा ताब्या होता.

असली मातृमूर्ति या जगांत क्वचितच नजरेला येते आणि नजरेला येते त्यावेळीं थक्क होऊन पाहत राहण्यापलीकडे दुसरा उपाय नसतो.

कुंजनाथदेखील आ वासून पहात राहिला आहे असें पाहून कुसुम शरमिंदी झाली. ती घाईघाईनें निघून जाते आहे असें पाहून कुंजनाथची सासू उद्गारली, " ही कुसुम वाटतं ? "

कुंजनाथ खुषींत येऊन म्हणाला, " होय सासूबाई, ही माझी बहीण. "

सारें आंगण शेणानें सारवलेलें होतें म्हणून पाण्याची घागर खालीं ठेवायला हरकत नव्हती. घागर खालीं ठेवून तिनें तिला नमस्कार केला. आईचें पाहून चरणनेंही तसाच नमस्कार केला.

सासू म्हणाली, " या मुलाला मी कुठं तरी पाहिलंय. "

चट्कन् आपली ओळख देऊन चरण म्हणाला, " आजीबरोबर आलों होतों मी—मामाबाबूसाठीं मुलगी पाह्यला. आजी गेली होती ना, तेव्हां. "

कुसुम तोंडभर हंसली आणि त्याला जवळ ओढून घेऊन म्हणाली, " छे, असं बोलायचं नाहीं बाळ. मामीला पाह्यला गेलों होतों असं म्हणायचं. "

कुंजनाथची सासू म्हणाली, " बिंदा वैष्णवाचा कारटा वाटतं ? एवढ्याशा पोराची भाषा तर ऐका ! "

कुसुम आश्चर्यचकित झाली. तिचा हांसरा चेहरा एकदम काळवंडून गेला. तिनें एकदां आपल्या दादाच्या तोंडाकडे पाहिलें, एकदां त्या अत्यंत अशिक्षित अशा कटुभाषणी बाईच्या तोंडाकडे पाहिलें आणि जमिनीवरची कळशी उचलून मुलाला हातीं धरून ती सैंपाकघराकडे वळली. एकाएकीं काय झालें हें!

कुंजनाथ खुळाभोळा होता खरा पण सासूबाईच्या तोंडचे ते करडे शब्द त्यालासुद्धां जाणवले. विशेषतः, तो आपल्या बहिणीचा स्वभाव चांगलाच ओळखत होता—त्यानें तिच्या तोंडाकडे पाहिलें तेव्हां ती मनांतल्या मनांत चिडली आहे असें त्याला उघड उघड कळून चुकलें.

आतां यापुढें कुसुमचें आणि तिचें पटणार नाहीं हेंही त्याला कळून चुकलें होतें त्याची सासूसुद्धां मनांतल्या मनांत ओशाळली होती. अगदीं असेंच कांहीं-तरी बोलावें असा तिचा उद्देश नव्हता. केवळ नित्याच्या सरावामुळें सहजा सहजीं ते शब्द तिच्या तोंडून निघून गेले होते.

सैंपाकघरांतून कुसुमनें गोकुळच्या विधवेला चांगलें नीट पाहून घेतलें. तिची चाळिशी उलटलेली नसावी. अंगावरचें लुगडें जरी विधवेला शोभण्या-जोगें होतें तरीही तिच्या गळ्यांतला सोन्याचा चंद्रहार, कानांतल्या बाळ्या बुगड्या, दंडातल्या वाक्या बाजुबंद पाहून स्वतःच्या सासूशीं तिची तुलना करून पाहतांना तिला तिटकारा आला.

दादाबरोबर ती बोलत होती. ती काय बोलत होती हें जरी तिला ऐकूं येत नव्हतें तरीही आपल्याच गोष्टी चालल्या असाव्या हें तिला कळून चुकलें होतें.

पान तंबाखू खाण्याची खोड तिला चांगलीच असावी. सकाळपासून जी सुरवात झाली होती, सारा दिवस ती सारखी पान तंबाखू चघळीत बसली होती.

स्नान झाल्याबरोबर वैष्णवाच्या धर्माला अनुसरून टिळेमुद्रा करण्यापासून अनुष्ठानापर्यंत सारें काम तिनें उरकून घेतलें. त्यासाठीं लागणारीं सारीं उपकरणीं येतांना तिनें बरोबर आणलीं होतीं. छोटासा आरसा आणायलासुद्धां ती विसरली नव्हती.

रोजची पूजा उरकून कुसुम जेव्हां सैंपाकाला लागली त्यावेळीं ती येऊन तिच्याजवळ बसली. इकडे तिकडे पाहून थोडेंसें हंसून ती म्हणाली, "हें ग काय? तुझ्या गळयांत माळ नाहीं? टिळेमुद्रा कांहीं करीत नाहींस! असली कसली तूं वैष्णवाची मुलगी बेटा?"

कुसुम थोडक्यांत म्हणाली, " तसलं कांहींच करीत नाहीं मी ! "

" करीत नाहीं म्हणून कसं चालेल ? लोक तुझ्या हातचं पाणी सुद्धां प्यायचे नाहींत ना ?— "

कुसुम मागें वळून म्हणाली, " तर मग तुमच्या जेवणाची व्यवस्था निराळी करूं का ? "

" अग आम्हीं नात्याचीं माणसं—तसं चालेल आम्हांला तुझ्या हातचं— पण इतरांना चालायचं नाहीं ना ? "

कुसुमनें उत्तर दिलें नाहीं.

कुंज आला त्यावेळीं त्यानें विचारलें, " चरण केव्हां आला कुसुम ? "

" काल संध्याकाळीं. "

कुंजनाथची सासू म्हणाली, " बिंदा वैष्णव हिला घेऊन जात नाहीं असं ऐकलं, पण मुलगा अन् नोकर पाठवून देतो वाटतं ? "

कुंज आश्चर्यचकित होऊन म्हणाला, " तुम्हांला कुठून कळलं ? "

ती गंभीरपणें म्हणाली, " मला आणखीही चार डोळे आणि चार कान आहेत. ते सारं खरं आहे बेटा. त्यांनीं एवढी ये-जा केली पण तुझी बहिण कांहीं राजी झाली नाहीं. मग चार लोक चार प्रकारें कसे बोलणार नाहींत ? गांवांत तरणे-ताठे चार लोक आहेत—तुझी बहिण ही अशी उफाड्याची—सोन्यासारखी पिवळी धमक कांति—कोण म्हणतात तें खोटें नाहीं !—मनीं असो कीं नसो, पाय घसरायला, मन चळायला, कितीसा वेळ लागतोय बेटा ? "

कुंजनाथला तें पटलें. तो म्हणाला, " तुमचं म्हणणं खरं आहे सासूबाई."

कुसुमनें एकदम वर भुवया चढवून त्याच्याकडे पाहिलें आणि म्हटलें, " तूं इथं काय करतो आहेस दादा ? जा पाहूं इथून. "

कुंज घाईघाईनें उठत होता पण त्याची सासू गरम होऊन म्हणाली, "दादाच्या डोळ्यांत धूळ टाकलीस म्हणजे लोकांचे डोळे कांहीं फुटायचे नाहींत बेटा ! ही जी तूं नदीवर स्नानाला जातेस, ओलेत्यानं पाठीवर केस सोडून येतेस तें पाहिलं, तर ऋषिमुनींचं मन देखील चळेल कीं नाहीं, तें सांगून दे ना तुझ्या दादाला छातीवर हात ठेवून ! "

कुसुम ओरडून म्हणाली, " तुझ्या पाया पडतें दादा, उभ्या उभ्या काय ऐकतोयस ?—चालता हो ना इथून. "

तिची ती आरडाओरड ऐकून आणि संतापानें चिडलेली मुद्रा पाहून कुंज घाबरला आणि तिथून पळून गेला. चुलीवर ठेवलेलें भाजीचें पातेलें दणूकन खालीं आपटून कुसुम देखील तिथून निघून गेली.

कुंजनाथची सासू एवढेंसें तोंड करून बसून राहिली. तंटा भांडण करण्यांत जगांत आपल्या तोडीचें कुणी नाहीं असा तिचा समज होता. एक दीन-दुबळी असहाय मुलगी अशा प्रकारें आपला पाणउतारा करील असें तिला स्वप्नांत देखील वाटलें नव्हतें.

## ८

कारण जरी कळलें नाहीं तरी दादाची सासू भांडण करण्याच्याच उद्देशानें इकडे आली होती अशी कुसुमची खात्री झाली होती. तिच्या बोलण्यांतली खोंच काय होती तें निश्चित कळलें नाहीं तरी कुसुमला वाटलें, कीं वृंदावन तिला घरीं घेऊन जायला तयार होता तरी देखील कुसुम गेली नाहीं याला तसेंच कांहीं कारण होतें—तें जें कांहीं कारण होतें तें आपल्याला कळलें आहे, स्वतः वृंदावनलाही कळलें आहे, म्हणून त्यानें आतां तिचें नांव टाकलें आहे—असा बोलण्यांत तिनें जो ध्वनी केला त्यामुळेंच कुसुम एवढी बेभान झाली. तरीसुद्धां अशा प्रकारें एकदम निघून जाण्यांत आपली कुठें तरी चूक झाली हें तिला जाणवल्यावांचून राहवलें नाहीं.

त्या दिवशीं कुंजनाथची सासू साऱ्या दिवसांत जेवली नाहीं. शेवटीं हाता-पाया पडून कशीबशी समज घालून रात्रीं ती एकदांची जेवली. तिचा मान राखण्यासाठीं कुंजनाथ सारा दिवस आपल्या बहिणीवर सारखें तोंड सोडीत होता. पण सारी रागारागी, रुसवारुसवी संपून गेली तरीही त्यानें एका शब्दानें तिला जेवून घ्यायला सांगितलें नाहीं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं कुंजनाथची सासू जायला निघाली तेव्हां कुसुमनें तिला प्रणाम केला तरीही ती बोलली नाहीं. उलट जांवयाला उद्देशून म्हणाली, " आतां हा सारा घरसंसार तुमचा तुम्हांलाच पाह्यला पाहिजे. सारं कांहीं बहिणीच्या हातीं सोंपवून चालायचं नाहीं ? "

यावर कुसुम तरी काय उत्तर देणार होती ? म्हणूनच खालच्या मानेनें तिनें

तें मुकाट्यानें ऐकून घेतलें. खरंच तर ! दादा इकडे आणि तिकडे दोन्ही बाजू कशा संभाळणार होता ?

यानंतर आणखी दोन महिने निघून गेले. या मुदतींत कुंजनाथच्या सासूनें ठाकून ठोकून त्याला चांगलाच बनवला होता. आतां बहुधा तो इकडे राहत नव्हता. ज्यावेळीं राही त्यावेळीं तिच्याशीं चांगलासा बोलतसुद्धां नसे. कुसुमला विचार पडे, हा भोळा माणूस इतका बदलून गेला कसा ? जगांत बहुधा असेंच होत असतें, असल्या भोळया माणसांतच असा चटकन बदल होतो, हें तिला जर कळलें असतें तर ती परिस्थिती तिला इतकी असह्य झाली नसती. आतां भाऊबहिणीचा पूर्वीसारखा लोभ राहिला नव्हता. पूर्वीसारखा झगडाही होत नव्हता. तसा झगडा करायची प्रवृत्ति आतां कुसुमच्यांतही राहिली नव्हती— तेवढें धाडसही होत नव्हतें. त्या दिवशीं घरांत एक रात्र एकटें राहायचा प्रसंग आला त्यावेळीं ती भीतीनें अर्धमेली झाली होती. पण आतां रात्रीच्या रात्री ती एकट्यानेंच काढूं लागली. तसाच प्रसंग येऊन ओढवल्यामुळें आता तिची ती भीतीही नाहींशी झाली होती.

तरीही या साऱ्या दुःखाची तिनें फिकिर केली नव्हती. तिला जें डाचत होतें तें हेंच, कीं आपण दादाच्या गळयांत एक लोढणें होऊन बसलें आहें. राहून राहून तिला वाटे, कीं आपण जर एकाएकीं मेलें तर दादा रडायचासुद्धां नाहीं—डोळयांतून एक टीपसुद्धां टाकायचा नाहीं. दादाच्या हातून घडणाऱ्या या अपेक्षित निर्दयपणाचें क्षालन करण्यासाठीं ती स्वतःच दार झाकून घेऊन टिपें गाळीत बसे आणि कांहीं केल्या दार उघडीत नसे. मन अगदीं भारावलेलें झालें तर तिला चरणची आठवण होई. तिला वाटे, जेव्हां तेव्हां तो ‘ आई आई ’ करीत धांवत येतो आहे आणि कांहीं केल्या निघून जात नाहीं.

मनांत येत असलेला सारा संकोच बाजूला सारून एके दिवशीं तिनें वृंदावनला स्वतः एक पत्र लिहिलें. त्या पत्रांत तिनें जी मागणी केली होती ती वृंदावननें पूर्णपणें नाकारली. तिची याचना फुकट गेली असें तिला वाटलें. कारण उत्तर येईल म्हणून ती वाट पहात बसली होती तें कांहीं आलें नाहीं, इतकेंच नव्हे, तर पत्राची नुसती दोन ओळी पांचसुद्धां आली नाहीं. आले काय तें थोडेबहुत पैसे. जरुरी होती, निरुपाय झाला होता, म्हणून कुसुमला ते पैसे घेणें भाग पडलें.

काल रात्रीं कुंजनाथ घरीं आला होता. सकाळींच निघून जायच्या तयारीनें तो बाहेर जातो आहे असें पाहून कुसुम येऊन समोर उभी राहिली. आजकाल कोणत्याही बाबतींत दादाला ती कांहीं सांगत नसे कीं त्याला विरोध करीत नसे. आज काय झालें कोण जाणे—अगदीं थंडपणें ती त्याला म्हणाली, " आतांच निघालास का दादा ? आतां सैंपाक करतें पहा—दोन घांस खाऊन मग जा ना. "

मागें पाहून कुंजनाथ तोंड वांकडें करून म्हणाला, " हें वाटलंच होतं मला ! शेवटीं असा अपशकून केलास. "

प्रसंगांत सांपडल्यामुळें काय वाटेल ते सहन करायला कुसुम शिकली होती. पण कांहीं सुद्धां कारण नसतांना त्यानें असें तोंड वांकडें केलेलें पाहून तिच्या आंगाचा भडका झाला. उलट तिनें तसेंच तोंड वेंगाडून दाखवलें नाहीं खरें पण कठोरपणानें ती म्हणाली, " कांहीं भिऊं नकोस दादा, तूं कांहीं मरत नाहींस ! इतक्या वेळां तुला मागें बोलावून अपशकून केले आहेत, कीं माणूस असतास तर यापूर्वींच मरून गेला असतास ! "

" मी माणूस नाहीं ? "

" नाहीं. कुत्रामांजरसुद्धां नाहीं. कुत्रींमांजरं तुझ्यापेक्षां फार बरीं. अशीं निमकहराम तरी नसतात ! " असें म्हणून तावातावानें ती आंत गेली आणि तिनें धाड्कन दार बंद करून घेतलें.

कुंजनाथ क्षणभर वेड्यासारखा पाहत राहिला होता. नंतर आस्ते आस्ते तसाच निघून गेला. बाहेरचा दरवाजा तसाच उघडा राहिला होता.

एक घटकेनंतर त्या उघड्या दारांतून वृंदावन आंत आला. आंत येतांच तो आश्चर्यचकित झाला. कुंजनाथच्या खोलीला बाहेरून कुलुप लावलेलें होतें. कुसुमच्या खोलीला आंतून खीळ दिलेली होती. सैंपाकघर उघडेंच होतें. त्यानें आंत डोकावून पाहतांच आंतील अन्न खात असलेलें कुत्रें घाबरुन केंकाटत बाहेर पळून गेलें.

अर्धा सैंपाक झाला होता—अर्धा व्हायचा होता. चूल निवून गेली होती. नोकराबरोबर चरण मागाहून येत होता म्हणून कांहींसा मागें राहिला होता. पांच दहा मिनिटांनीं ' आई, आई, ' म्हणून मोठ्यानें हांक मारीत शेजाऱ्या-पाजाऱ्यांना आपल्या येण्याची वर्दी देत तो घरांत आला.

मुलाची हांक एकाएकीं कानीं पडल्यामुळें ती दार उघडून घाईघाईनें बाहेर आली. आसवांनीं डंवरलेल्या तिच्या शांत आणि दुःखी नजरेला सर्वांआधीं दिसून आली, ती वृंदावनाची मूर्ति. तो आश्चर्यचकित होऊन पाहत होता—जणूं काय डोळ्यांनीं प्रश्न विचारीत होता.

तो असा अचानक येईल अशी कुसुमला आशाही नव्हती कीं तिनें तशी कल्पनाही केली नव्हती. ती एक पाऊल मागें हटली आणि माथ्यावरचा पदर पुढें ओढून पुन्हां आंत गेली. आंतून एक बैठक आणून बाहेर टाकून ती उभी रहाते आहे नोंच चरणनें येऊन तिला मिठी मारली. त्याला उचलून घेऊन तिनें त्याचा मुका घेतला आणि ती अदबीनें भिंतीआड उभी राहिली.

आईच्या चेहऱ्याकडे पाहतांच चरण रडकुंडीला आला आणि म्हणाला, " आई रडते आहे बाबा. "

वृंदावनाला तें आधींच दिसून आलें होतें. त्यानें विचारलें, " काय भानगड आहे ? कां मला बोलावलंस ? "

अजूनही कुसुमचें मन तिच्या ताब्यांत आलें नव्हतें. तिच्या तोंडून शब्द बाहेर येईना.

वृंदावननें पुन्हां विचारलें, " दादाला भेटा असं कां लिहिलं होतंस पत्रांत ? कुठं आहे तो ? "

भरल्या गळ्यानें कुसुम म्हणाली, " दादा मेला. "

" अरेरे ! मेला का ? काय झालं त्याला ? "

गंभीरपणें दिलेल्या या उत्तरांत जो खवचटपणा झाकला होता तो त्या तशा प्रसंगीं देखील कुसुमच्या मनाला डांचल्यावांचून राहिला नाहीं. स्वतःची परिस्थिती विसरून ती भडकून उठून म्हणाली, " ही थट्टा पुरे झाली. जाळून-पोळून निघालेंय मी—यावेळीं हें असल कांहीं रुचत नाहीं मला. तुम्हांला बोलवायला पाठवलं त्याचा असा का सूड उगवतांहां ? " असें म्हणून ती एकदम रडूं लागली.

तोंड दाबून ती रडत होती तरीही वृंदावनला तें स्पष्ट ऐकूं आलें. पण त्याच्या मनावर त्या रडण्याचा यत्किंचित परिणाम झाला नाहीं. कांहीं वेळानें त्यानें विचारलें, " कशाला बोलावलं होतंस मला ? "

डोळे पुसुन कुसुम रडक्या आवाजानें म्हणाली, " तुमच्याखेरीज कुणाला बोलावणार मी ? पूर्वी आपणहून कांहीं तरी काम काढून तुम्ही या बाजूला येत होतां—आतां चुकूनसुद्धां इकडे फिरकत नाहीं. "

वृंदावन म्हणाला, " चुकत नाहीं म्हणूनच फिरकत नाहीं. नाहीं तर केव्हांही आलों असतों. जाऊं दे तें !"

" असं एकदम तोडून टाकलं तर कसं बोलावं माणसानं ? "

वृंदावन हंसला—शांतपणें म्हणाला, " तोडून टाकलं नाहीं. सरळ सरळ विचारतोंय. तुला ज्या प्रकारें सांगायचं असेल—बरं आहे !—त्या प्रकारें सांगून टाक ना ! "

कुसुम म्हणाली, " एक गोष्ट विचारायची आहे तुम्हांला म्हणून इतके दिवस वाट पहात होतें—भिजले केस पाठीवर सोडून रस्तोरस्तीं माझ्या रूपाचें प्रदर्शन करीत मी हिंडत असतें, अशी बातमी कुणी पिकवली ? "

तिचा प्रश्न ऐकून वृंदावन क्षणभर स्तब्ध होऊन पाहत राहिला. नंतर म्हणाला, " मी ! बरं मग ? "

" तुम्ही बातमी पिकवलीत असं कांहीं मी म्हणत नाहीं—माझ्या मनांत-सुद्धां आलं नाहीं तसं—पण—"

तिचें भाषण पुरें होऊं न देतां वृंदावन म्हणाला, "त्या दिवशीं तसं म्हटलं होतंस—मनांतसुद्धां आणलं होतंस !—म्हणाली होतीस, स्वतः मोठीं माणसं असतांना आपला पाणउतारा करण्यासाठीं आईला घेऊन भावाच्या निमंत्रणाचं कारण करून जेवायला आलोंय म्हणून ! त्या दिवशीं तें तुला जमलं आणि आज नाहीं जमत ? त्या गुन्ह्याबद्दल माझ्या आईला सजा द्यायला देखील कमी केलं नाहींस ! "

कुसुम अत्यंत ओशाळी झाली. संकोचानें ती हळुच म्हणाली, " कोटि कोटि अपराध झाले आहेत माझे ! तेव्हां तुमची ओळख पटली नव्हती मला ! "

" आतां पटली ? "

कुसुम उगीच राहिली. थोडा वेळ थांबून वृंदावन म्हणाला, " बरं ते राहूं दे. एक कुत्रा शिरला होता तुझ्या सैंपाकघरांत, त्यानें सारीं भांडीं विटाळून टाकलीं ना ! "

एवढासुद्धां उद्वेग किंवा अस्वस्थपणा न दाखवतां कुसुम म्हणाली, " जाऊं द्या. मला कांहीं जेवायचं नव्हतं-आधीं कळतं तर हंडी चढवलीच नसती वर."

" आज एकादशी आहे वाटतं ? "

मान खालीं घालून कुसुम म्हणाली, " मला नाहीं माहित ! मी नाहीं करीत तसलं कांहीं ! "

" नाहीं करीत ? "

तशीच मान खालीं घालून कांहीं उत्तर दिल्याशिवाय कुसुम उगीच राहिली.

वृंदावन संकोचितपणें म्हणाला, " पूर्वी उपास करीत होतीस—आतां कां सोडलंस ? "

पुन्हां पुन्हां घेतलेल्या चिमट्यामुळें कुसुम अस्वस्थ झाली होती. ती उसळून उठून म्हणाली, " करीत नाहीं म्हणजे ? माझी मर्जी ! कळून सवरून कांहीं कुणी स्वतःचा गळा कापून घेत नाहीं म्हणून ! दादाची वागणूक मला असह्य झाली आहे खरी, पण खरं सांगतें, कीं तुमच्या या वागणुकीमुळं गळ्याला फांस लावून घ्यावा असं वाटूं लागलंय मला. "

वृंदावन म्हणाला, " मग घे ना फांस लावून !—माझ्या वागणुकीची चर्चा मागाहून करूं—नाहीं केली तरी हरकत नाहीं—पण असह्य होण्याजोगं दादानं काय केलं तें सांग ना आधीं. "

कुसुम भयंकर चिडली. तिरमिरीला येऊन ती म्हणाली, " तें एक महाभारत आहे. तुमच्यापुढं तो पाढा वाचण्याइतका धीर नाहीं मला. थोडक्यांत सांगायचं म्हणजे एवढंच, स्वतःच्या उठाठेवीपुढं त्याला माझ्याकडे नजर द्यायला आतां कठीण झालं आहे त्याच्या सासूचा हुकूम नाहीं. माझ्या अन्नवस्त्रासाठीं हवं ते द्यायचं देखील बंद केलं आहे त्यानं. या चरणनं आपल्या आईचा भार घेतला नसतां तर यापूर्वी केव्हांच तडफडून मेलें असतें ! आतां मी—" बोलतां बोलतां ती थांबली. बोलावें कीं न बोलावें याचा क्षणभर विचार करून ती म्हणाली, " आतां यापुढं तुमच्याखेरीज मला आधार नाहीं. आतां एक दिवससुद्धां—एक क्षणभरसुद्धां इथं राहायची माझी इच्छा नाहीं. "

वृंदावननें हंसत हंसत विचारलें, " खरंच ! इथं राहायची इच्छा नाहीं ? "

एक क्षणभरच वर नजर करून कुसुमनें त्याच्याकडे पाहिलें आणि पुन्हां मान खालीं घातली. अगदीं सहजासहजीं, अगदीं हंसत हंसत विचारलेल्या

या प्रश्नांत जी खोंच होती ती तिच्या मनाला तितकीच तीव्रतेनें जाणवल्या-वांचून राहिली नाहीं.

वृंदावन म्हणाला, "खरोखरच चरण आपल्या आईचा भार खुषीनं घेईल ! कुठं राहणार आहेस तूं ?"

तशीच खालच्या मानेनें कुसुम म्हणाली, "मी काय सांगू ? ज्यांचं त्यांनींच ठरवावं."

"ज्यांचे ते कोण ?—मी ?"

कुसुमनें न बोलतां संमति दर्शविली.

वृंदावन म्हणाला, "तें होणं नाहीं. तुझ्या कोणत्याही बाबतींत मला हात घालतां येत नाहीं. तें साध्य आहे एक आईलाच. तिच्याशीं तुझं वर्तन कसं का झालेलं असेना, चरणचा हात धरून तूं तिच्याकडे जाशील तर तीच यांतून उपाय काढील. पण तुझा दादा ?—"

कुसुमच्या डोळयांतून आसवांच्या धारा लागल्या होत्या. डोळे पुसून ती म्हणाली, "सांगितलंय ना, कीं माझा दादा मेला ! पण आधीं हें सांगा—भरल्या दिवसा पायपीट करीत भिकाऱ्यासारखी कशी गांवीं जाऊं ?"

वृंदावन म्हणाला, "तें मला माहीत नाहीं—पण आली असतीस तर बरं झालं असत. याखेरीज दुसरा सरळ मार्ग मला तरी दिसत नाहीं."

कुसुम थोडा वेळ थांबून म्हणाली, "मी येणार नाहीं !"

"मर्जी तुझी !"

अगदीं संक्षिप्त आणि सरळ उत्तर. त्यांत कांहीं आडपडदा नाहीं कीं अस्पष्टपणा नाहीं. आतां मात्र कुसुम खरोखरच घाबरली.

वृंदावन आणखी कांहीं बोलतो कीं नाहीं तें ऐकण्यासाठीं कांहीं वेळपर्यंत ती उत्सुक होऊन वाट पाहात राहिली. त्यानंतर अत्यंत नम्रपणें पण तितक्याच संकोचानें सावधानपणें म्हणाली, "पण इथं तरी मला डोकं टेकायला जागा आहे कुठं ? मी कांहीं दादाला दोष देत नाहीं. तो तसाच आहे. स्वतःच नाक कापून दुसऱ्याला अपशकून करतो त्याला कसला दोष द्यायचा ? पण तुम्हांला मात्र अशा रीतीनं मला वाऱ्यावर सोडून देतां यायचं नाहीं—खरं कीं नाहीं ?"

त्या तिच्या प्रश्नाचें उत्तर न देतां वृंदावन उठून उभा राहिला आणि

म्हणाला, " उशीर झाला. काय रे चरण, तूं इथं राहाणार कीं येणार ?— राहाणार ? बरं राहा.—तुला वाटलं तर ये. या मुलाचा हात धरून आईसमोर येऊन उभी राहिली असतीस तर कांहीं तुझी मान तुटून पडली नसती. जाऊं दे. मी निघालों—" असें म्हणून तो जायला निघाला तेव्हां चरणला खालीं ठेवून कुसुम उठून सरळ उभी राहिली आणि म्हणाली, " आज सारं कांहीं कळलं मला. माझ्या अंतरींची व्यथा तोंड उघडून तुम्हांला जीव तोडून सांगितली, तर तुम्हीं म्हणतां, ' उशीर झाला. निघालों.' मी सर्वस्वी निराधार झालेंय तें अगदीं सगळ सरळ दिसत असतां मला आसरा द्यावा असं ज्याअर्थी वाटत नाहीं तुम्हांला, त्याअर्थी आतां तुम्हांला अधिक काय सांगणार मी ! आशेला जागाच राहिली नाहीं मला !—तरीसुद्धां आणखी एक गोष्ट विचारायची आहे—मांगा, खरं उत्तर द्याल ? "

वृंदावन चिडल्यासारखा झाला. आश्चर्यानें तिच्याकडे पाहून म्हणाला, " देईन. आसरा देणार नाहीं असं मी म्हटलं नाहीं—उलट तूंच माझा आसरा धुडकावला आहेस. "

निश्चयाच्या बोलानें कुसुम म्हणाली, " साफ खोटं. काय माझ्या नशिबीं होतं कोण जाणे—कां मला दुर्बुद्धि झाली, कां मी तुमच्या आईचं मन दुखवलं—एवढा भयंकर अपराध कां माझ्या हातून घडला, तें त्या हृदयस्थ परमेश्वराला ठाऊक. ती मनाची टोंचणी मेलें तरी नाहींशी व्हायची नाहीं. तरीपण माझी सासू, माझा नवरा, माझा मुलगा, घरवाडी सारं कांहीं असतांना आज मी परक्याच्या गळ्यांत लोढणं होऊन बसलें आहें. निराधार होऊन बसलें आहें. आजवर त्या घरादाराचा उंबरठासुद्धां पाहिला नाहीं. माझ्या हातून झालेली चूक केवढीही मोठी असो, पण मी त्या घरची सून आहें. मग कां तुम्हीं भिकाऱ्यासारखं, भर दिवसा, साऱ्या लोकांच्या समोर पायपीट करीत–लोटांगणं घालीत मी यावं असं म्हणतां ? यापेक्षां दुसरा सीधा मार्ग तुम्हांला नाहींच का दिसत ? कां दिसत नाहीं माहीत आहे ? आम्हीं दुःखी माणसं —भीक मागून माझ्या आईनं आम्हा भाऊबहिणींना—दोघांनाही जगवून वाढवलं, दादा उनाडक्या करीत दिवस घालवतो म्हणून तुम्हांला वाटतंय, कीं भिकाऱ्याच्या पोरीनं भिकाऱ्यासारखं आपल्या घरीं यावं ! तसं तुम्हांला वाटलं तर काय आश्चर्य आहे ! तुम्हीं म्हणाल, मी मोठी चूक करतेंय—पण ही चूक नव्हे — मस्तवाल-

पणा आहे हा माझा !—न खातां न पितां मी इथं सुकून सुकून मरेन पण तुमच्यासमोर येऊन भिकेचा हात पसरून, माझी थट्टा करायला तुम्हांला मालमसाला पुरवायची नाहीं मी ! ”

वृंदावन थक्क होऊन ऐकत होता. तिचें बोलणें संपलें त्यावेळीं तो शांतपणें म्हणाला, “ मी चाललों. यापेक्षां मला कांहीं अधिक बोलायचं नाहीं. ”

कुसुमनें तेवढ्याच ताठ्यानें उत्तर दिलें “ जा ! पण जरा थांबा. आणखी एक सांगायचंय मला. कृपा करून खोटं बोलूं नका. मला एवढंच विचारायचंय, माझ्याबद्दल तुम्हांला कांहीं संशय तर आला नाहीं ना ? तसं असेल तर मी सांगतें—तुमच्या समोर उभी राहून शपथ करून सांगतें—”

वृंदावननें एकदोन पावलें टाकलीं होतीं. तो मागें वळून उभा राहिला आणि एकदम मधेंच म्हणाला, “ नाहीं, नाहीं, हें काय ? कशाला उगीच शपथ घेतेस ? तुझ्याबद्दल कुणी कांहीं सुद्धां सांगितलं नाहीं मला — ” अर्ध्या झांकलेल्या तिच्या चेहऱ्याकडे नजर लावून तो अत्यंत कोमलपणें पण तितक्याच दृढ निश्चयानें म्हणाला, “—शिवाय परक्याच्या चालचलणुकीवर नजर ठेवायची मला संवय नाहीं—तसं करणंही योग्य नव्हे. तुझी चालचलणूक कशी आहे याची चौकशी करण्याइतकी मला जिज्ञासाच नाहीं—अर्थात् त्या विषयाची मला चर्चाही करायची नाहीं. सर्वांकडे मी बऱ्या दृष्टीनं पाहतों तसाच तुझ्याकडेही पाहातों. तूं वाईट आहेस असं मुळींच वाटत नाहीं मला ! ” असें म्हणून तो संथपणें बाहेर निघून गेला.

वज्राघात झाल्याप्रमाणें कुसुम निस्तब्ध होऊन राहिली होती.

चरण म्हणाला, “ आई, नदीवर जायचं ना आंघोळीला ? ”

कुसुम कांहीं बोलली नाहीं. तिनें त्याला उचलून कडेवर घेतलें आणि एक एक पाऊल टाकीत ती आपल्या खोलींत येऊन बिछान्यावर पडली. चरणला हृदयाशीं घट्ट कवटाळून ती फुलून फुलून रडूं लागली.

## ९

बरेच दिवस झाले. माघ महिना संपून फाल्गून सुरू झाला. चरण जो एकदां गेला तो पुन्हां आला नाहीं. त्याला त्याच्या इच्छेविरुद्ध येऊं

देत नव्हते हें अगदीं उघड उघड होतें. अर्थात् तिच्याशीं कोणत्याही प्रकारचा संबंध ठेवण्याची त्यांची इच्छा नसावी. तिकडली कांहींच खबर कळत नव्हती. मुद्दाम पत्र पाठवून स्वतःला कमीपणा घ्यायचा नाहीं अशी तिनें प्रतिज्ञा केली होती. दादाची वृत्तीही तशीच होती. सर्वप्रकारें कुसुमचा अशा रीतीनें कोंडमारा होत असल्यामुळें तिचे प्राण कासावीस होत आले होते.

तेव्हांपासून उघडपणें घराबाहेर हिंडायचें किंवा पूर्वीप्रमाणें मैत्रिणींच्या गांठीभेटीला जायचें तिनें बंद केलें होतें. दिवस उजाडायच्या पूर्वी नदीवर जाऊन स्नान करून ती पाणी घेऊन येत असे. बाजारच्या दिवशीं जे कांहीं जिन्नस खरेदी करायचे तें सारें काम गोपाळची आई करीत असे. अशा प्रकारें जगाचा सर्व संबंध तोडून टाकून दुःखाकष्टानें ती आयुष्याचे दिवस कंठीत होती.

कशिद्याचें काम करण्यांत ती फार निष्णात होती. तें काम करण्याबद्दल जी कांहीं मजुरी कुणी देत तेवढीच हंसतमुखानें घेऊन ती स्वस्थ राही—कुणी द्यायला विसरला तर तीही विसरून जाई—हा सद्गुण तिच्या अंगीं आहे हें कळल्यामुळें गांवांतल्या पुष्कळशा लोकांच्या मच्छरदाण्या, उशीचे अभ्रे, बिछान्याची चादर वगैरे शिलाईचें काम तिच्याकडे येऊन पडे.

आज तिसऱ्या प्रहरीं आपल्या खोलीबाहेर चटई टाकून अर्धवट राहिलेलें मच्छरदाणी शिवण्याचें काम पुरें करीत ती बसली होती. हातांतली सुई सारखी चालू राहिली होती आणि त्याबरोबरच आजवर झालेल्या प्रत्येक गोष्टीचें सिंहावलोकन करीत ती आपल्या मनाशीं खेळ खेळत होती.

त्या दिवशीं पळपुट्या दादाच्या निमंत्रणावरून ती सारी मंडळी आपल्या घरीं आली होती आणि पेंचांत सांपडल्यामुळें सारी लाज भीड विसरून ती पहिल्यांदाच आपल्या नवऱ्याशीं बोलली होती, ती गोष्ट तिला आठवली. ज्यावेळीं तिला दुःख असह्य होई त्यावेळीं हातचें काम फेकून देऊन ही आठवण मनाशीं घोळवीत ती उगीच बसून राही. आई जशी आपल्या छोट्या बाळाला घेऊन नाना प्रकारें खेळवते नाचवते, लडिवाळपणा करते, त्याचप्रमाणें ही एकटी एक आठवण घेऊन ती लडिवाळ-पणानें खेळवीत बसत, मनांत येत असलेल्या आनंदाच्या लहरींवर तरंगत राही. तिचें सारें दुःख तेवढ्या वेळापुरतें धुऊन पुसून नाहींसें होई. उभयतांची झालेली ती बोलाचाली, तो गोडसा झगडा, बाकीच्या माणसांच्या

नकळत केलेली जेवणाची व्यवस्था, त्यानंतर स्वयंपाक तयार झाल्यावर नवऱ्याला आणि दीराला जेवूं घालणें, सासूच्या पूजा आन्हिकाची तयारी करणें, सर्वांच्या शेवटीं —दिवस मावळतां मावळतां शिल्लक राहिलेलें सुकलेंवाळलेलें, थंडगार झालेलें जें कांहीं होतें तेवढेंच खाऊन राहिल्याची ती आठवण !

तिच्या डोळयांतून टपटप आसवें गळूं लागलीं. बायकांच्या जन्माला येऊन यापेक्षां कसल्या जास्त सुखाची तिनें कल्पना केली नव्हती—कीं अपेक्षाही केली नव्हती. तिला वाटे, जें काम रोजच्या रोज करायला मिळतें तें तसें मिळालें, कीं या संसारांत मिळवायचें असें दुसरें कांहींच राहात नाहीं.

त्यानंतर तिला आठवली शेवटच्या दिवसाची हकिकत—सारा संबंध ताड्कन् तोडून टाकून तो निघून गेल्याची हकिकत. त्या दिवशीं तिनें तसें करायला अडथळा केला नाहीं – उलट संबंध तोडून टाकायला मदतच केली होती—पण त्यावेळीं तिनें चरणला हिशेबांत घेतलें नव्हतें. त्यांचा संबंध तुटला कीं चरणचाही संबंध तुटेल, हें अभिमानाच्या भरात तिच्या ध्यानांतच आलें नव्हतें. आतां यापुढें चरण येऊन भेटणार नाहीं ही कल्पना आल्यामुळें दिवसेंदिवस तिच्या काळजांतलें रक्त थेंबाथेंबानें आटून जात होतें.

खरोखरच तो नाहीं आला तर ? तो नाहीं आला तर एक क्षणभर हे प्राण राहतील का या देहांत ? सर्वांपेक्षां तिला दुःख वाटत होतें तें या गोष्टीचें, कीं जो संशय तिच्या मनांत यापूर्वी होता,—त्या प्रसंगाच्यावेळीं कदाचित् तो उघड करून सागतां आला असता,—आतां ती संधि गेली—एकजात धुऊन पुसून नाहींशी झाली ! तिच्या अंतरंगांत छपून राहिलेला विश्वास पुन्हा पुन्हा जागा होई—पुन्हा पुन्हा तिच्या कानांत गुणगुणून सागे,—तें सारें खोटें ! लहानपणीं लागलेला तो कलंक—ती बदनामी, एवढी सुद्धां खरी नव्हे. ती हिंदूची मुलगी होती. जें म्हणून कांहीं पापाचें लक्षण—जें जें कांहीं जगावेगळें, अस्वाभाविक, तें तिच्या अंतःकरणांत उत्पन्न होणें अशक्य आहे असें तिला वाटे. त्याची सेवा करायला मिळावी, त्याच्या कामाला हातभार लावायला मिळावा, यासाठीं तिचा देह, तिचें मन उन्मत्त होऊन उठलें. तो नवरा नसता तर ईश्वरानें खरोखरच त्याला योग्य मार्ग दाखवला असता.—अंतरंगांतल्या कुठल्या तरी एवढयाशा सांदी-कोपऱ्यांत तिळाएवढी लाज शरमेची कल्पना त्यानें शिल्लक ठेविली असती !

आज बाजाराचा दिवस. गोपाळची आई बाजार करायला जाऊन बराच वेळ झाला होता. ती यायची वेळ झाली होती म्हणून तिनें सदरेचा दरवाजा उघडा ठेवला होता. दार उघडून एकाएकीं कुंजनाथबाबू आला. विलायती बुटाचा खटखट आवाज करीत, गांवच्या लोकांना आश्चर्यचकित करीत, मत्सराची भावना निर्माण करीत बरोबर नोकर घेऊन घरांत आला. कुसुमला तें कळून आलें पण आसवांनीं डंवरलेले डोळे वर करून त्याच्याकडे पहायला तिला लाज वाटली.

बहिणीसमोर सरळ येऊन कुंजनाथ म्हणाला, " तुझ्या वृंदावननं पुन्हां लग्न केलं ग ! "

कुसुमच्या हृदयाचे ठोके एकदम बंद पडले. काष्ट होऊन ती खालीं मान घालून बसली.

थोडासा आवाज चढवून कुंज म्हणाला, " जळांत राहून माशाशीं वैर करायच ? कसं काय लग्न करतोय तें पाहायचंय मला एकदां. तो नंदा वैष्णव-बड्या वैष्णवाचा बडा बेटा वैष्णव !—माझ्या जमीदारींत राहून असा माझा अपमान करायची छाती कशी करतो तें पाहायचंय मला ! "

कुसुमला त्याचें भाषण चांगलेंसें कळलें नाहीं. समजून घेण्यासाठीं म्हणून तिनें मोठ्या कष्टानें प्रश्न केला, " नंदवैष्णव कोण ? "

" कोण ? माझी रयत. माझ्या तळ्याच्या पाळीवर घर बांधलंय त्यानं. आग लावून देईन बेट्याच्या घराला ! त्याच बेट्याची मुलगी. या फाल्गुनांत व्हायचंय लग्न. सारं कांहीं निश्चित झालंय—भुत्या, तंबाखू भर. "

कुसुमनें अजून डोळे उघडून पाहिलें नव्हतें त्यामुळें त्याच्याबरोबर नोकर आला आहे हें तिच्या ध्यानीं आलें नव्हतें. तिला थोडासा संकोच वाटला.

कुंजनें विचारलें, " नंदाची मुलगी दिसायला कशी काय आहे रे ? "

थोडा विचार करून भुत्या म्हणाला " तशी बरी आहे. "

कुंज उसळून उठून म्हणाला, " बरी आहे काय ? या माझ्या बहिणी-सारखी आहे का दिसायला ? बरी आहे म्हणे ! ह्यत् ! हिच्यासारखी कुणी दिसली होती का तुला ? "

भुत्याचें उत्तर यायच्या पूर्वीच कुसुम आंत निघून गेली.

थोड्या वेळानें गुडगुडी ओढीत ओढीत कुंज तिच्या खोलीसमोर आला आणि म्हणाला, " काय ग कुशे, बोलली नाहींस ? या बिंदावैराग्यासारखा निमकहराम आहे का कुणी दुसरा ! पटलं का नाहीं मी म्हणत होतों तें ? माझी सासू म्हणते, ' वेदवाक्य खोटं ठरेल पण आमच्या कुंजनाथचे बोल खोटे ठरायचे नाहींत.' काय रे भूतो, असं म्हणाली ना सासूबाई ? "

खोलींतून कांहींच उत्तर आलें नाहीं. आंतून कसला तरी अस्पष्ट आवाज ऐकूं येत होता.

कुंजनाथच्या मनांत काय आलें कोण जाणें, गुडगुडी खालीं ठेवून त्यानें दार उघडलें आणि तो आत येऊन उभा राहिला.

कुसुम बिचारी बिछान्यावर उपडी पडून राहिली होती. कांहीं वेळ त्यानें तिच्याकडे पाहिलें. कितीतरी दिवसांनीं आज एकदम त्याचे डोळे थरथरले आणि त्यांतून आसवें वाहूं लागलीं. हातानें डोळे पुसून हळुहळू तो बिछान्याच्या एका कोंपऱ्याला येऊन बसला. बहिणीच्या माथ्यावर हात ठेवून तो हळूच म्हणाला, " कांहीं भिऊं नकोस कुसुम, काय वाटेल तें करून मी हें लग्न मोडून घालीन. तेव्हांच तुला दिसून येईल कीं तुझा दादा बोलतो तें खरं करून दाखवतो कीं नाहीं ! पण तुझी देखील चूक झालीय. कां गेली नाहींस सासरीं ? इतकं आम्हीं सर्वांनीं तुला सांगून पाह्यलं पण कुणाचं सांगणं कांहीं कानीं घेतलं नाहींस. "

कुंजनाथचे शेवटचे शब्द आसवांनीं ओलावलेले होते.

मनाचा आवेग आवरणें आतां कुसुमला अशक्य झालें. तिला एकदम रडें कोसळलें. अजूनही दादाच्या मनांत आपल्याबद्दल एवढीतेवढी तरी माया आहे असें तिला वाटत नव्हतें—यापूर्वीच ती आशा सोडून ती बसली होती.

कुंजनाथच्या डोळयांतून सारख्या आसवांच्या धारा लागल्या होत्या. एक शब्दसुद्धां न बोलतां तिच्या माथ्यावरून हात फिरवीत तिचें समाधान करण्याचा तो प्रयत्न करीत होता.

संध्याकाळ झाली. कोटाच्या अस्तनीनें डोळे चांगले पुसून घेऊन कुंजनाथ म्हणाला, " तूं कांहीं काळजी करूं नकोस ताई. मी तुला सांगून ठेवतों, कीं कांहीं झालं तरी मी हें लग्न होऊं द्यायचा नाहीं. "

आतां कुसुमनें तोंड उघडलें. ती रडत रडत म्हणाली, " या प्रकरणांत तूं हात घालूं नको दादा ! "

अत्यंत आश्चर्यचकित होऊन कुंज म्हणाला, " हात घालूं नको ? माझ्या डोळ्यांदेखत लग्न लागणार अन् मी स्वस्थ राहून पाहूं ? काय म्हणतेस हें कुसुम ? "

" नाहीं दादा, तुला कांहीं करतां यायचं नाहीं. "

चिडून उठून कुंज म्हणाला, " कांहीं करतां यायचं नाहीं ? अलबत् येईल ! तुला अपमान वाटत असेल तर तूं स्वस्थ बैस. पण मी कांहीं हें सहन करणार नाहीं. प्रत्यक्ष माझी रयत !—तुला काय वाटतं ग ? लोकांनीं ऐकलं तर तोंडावर थुंकतील माझ्या ! "

उशींत तोंड खुपसून सारखी मान हालवीत कुसुम म्हणाली, " नाहीं दादा, नाहीं. मी म्हणतें, नको ! या प्रकरणांत तू हात घालूं नकोस. त्यांचा आमचा कांहींसुद्धां लागाबांधा नाहीं. भलती उठाठेव करून उगीच बदनामी वाढवूं नकोस. असेल व्हायचं त्याचं लग्न, तर होऊन जाईल. "

अतिशय संतापून कुंज म्हणाला " नाहीं ! "

" नाहीं ! कां ? एकदां मला टाकून त्यांनीं लग्न केलं होतं—आतां पुन्हा एकदां करतील. माझ्यालेखीं दोन्हीही सारखींच आहेत. तुझ्या पाया पडतें दादा, निष्कारण अडथळा आणून झगडा वाढेल. उगीच माझी अब्रू चव्हाट्यावर येईल. तेवढं तरी करूं नकोस. त्यांना त्यांत सुख आहे ना ? मग होऊन जाऊं द्या तसंच. "

हूं म्हणून कुंजनाथ कांहीं वेळ गाल फुगवून बसला. नंतर म्हणाला, " पहिल्यापासून पहातोंय, तूं ही अशीच ! एकदां नाहीं म्हटलंस, कीं कुणाच्या बापाची टाप लागली आहे कीं तो तुला होय म्हणायला लावील ? तूं कांहीं कुणाचं ऐकायची नाहींस—तुझंच काय तें सर्वांनीं ऐकायला पाहिजे. "

कुसुम उगीच राहिली.

कुंज बोलत होता, "—तसं पाहिलं तर तुझं म्हणणंही कांहीं खोटं नाहीं. सासरीं जायचं नाहीं म्हणून तूंच जर हट्ट घेऊन बसली आहेस तर त्यांचा तरी संसार कसा चालावा ? अजून त्याची आई आहे—पण ती कांहीं त्याच्या जन्माला पुरलेली नाहीं ! "

तरीही कुसुम कांहीं बोलली नाहीं. क्षणभर स्तब्ध राहून कुंज मधेंच एकदम म्हणाला, " बरं कुसुम, तो लग्न करो कीं न करो, तूं रडतेस कशाला ? "

याचा जबाब ती काय देणार होती ?

कुसुमच्या डोळ्यांतलीं आंसवें ओसरत येत होतीं तें काळोखामुळें कुंजला दिसलें नव्हतें—पण हा प्रश्न ऐकतांच तीं पुन्हां जोरजोरानें पाझरूं लागलीं.

कुंज निघून गेला. त्या दिवसाची सारी हकीकत आठवून कुसुम अधिकाधिक ओशाळत होती—स्वत:ला धिक्कारीत होती— तिला मेल्याहून मेल्यासारखें वाटत होतें. काय हें ! मेल्यावर सुद्धां सुटका नाहीं या अपमानांतून ? एवढ्यासाठींच का तो तसा वागत होता ? तिकडे आसरा देणें शक्य नव्हतें आणि इकडे तर तशी लालूच दाखवीत होता. तिकडे पुन्हां लग्न करायच्या तयारीला लागला होता, त्याचवेळीं आपल्याला ' घरची सून ' म्हणून अगदीं बेशरमपणानें उल्लेखित होता. जिथें एवढें सुद्धां प्रेमाचें लक्षण नव्हतें, तिथें पर्वताएवढा अभिमान बाळगला होता ! देवा, एवढें असह्य दुःख दिलेंस पण अशी ही ओंगळवाणीं लाचारी कां माथीं मारलीस ?

तिचें काळीज पिळून एक मोठा सुस्कारा बाहेर पडला. असें होतें तर ? एवढ्यासाठींच आपल्या चालचलणुकीबद्दल मला एवढीसुद्धां जिज्ञासा नाहीं असें म्हणाला तो ? आणि मी मात्र निर्लज्जपणानें त्यांच्यासमोर दिव्य करायला गेलें होतें !

## १०

कोणत्याही परिस्थितींत बुद्धीचा तोल बिघडवूं न देण्याची खबरदारी घेणारीं कांहीं माणसें असतात—माथें गरम झालें तर त्याना त्याची शरम वाटते—अशा प्रकारच्या माणसांत वृंदावनची गणना करतां आली असती. असलीं हीं माणसें कितीही राग आला तरी तो बाहेर न दाखवण्याची खबरदारी घेऊं शकतात. कोणत्याही कारणानें प्रतिपक्षी व्यक्ति चिडीला आली तरी स्वतः तसें चिडीला न येतां माथें थंड ठेवूं शकतात. त्या दिवशीं कुसुमनें पुन्हां पुन्हां जें कठोर वर्तन केलें, अकारण आरोप केले, त्यामुळें मनाचा तोल बिघडवून आपण उगीच कांहींतरी कठोर शब्द बोलून गेलों, असें

वाटून वृंदावनचें मन अस्वस्थ झालें होतें. म्हणूनच दुसऱ्या दिवशीं सकाळीं चरणला आणायचें निमित्त करून त्यानें एक मोलकरीण, एक नोकर आणि एक गाडी पाठवून दिलीं. उद्देश हा, कीं कुसुम बुद्धिमती असल्यामुळें तिनें आपलें मनोगत समजावें आणि वाटल्यास त्याच्याबरोबरच निघून यावें.

जर खरोखरच ती आली, तर त्यावेळीं काय करावें असा मोठा बिकट प्रश्न त्याच्यापुढें उभा राहिला होता. पण नंतर त्याला वाटलें, जर आलीच ती तर आई आहेच कीं ! आईच्या बुद्धिकौशल्यावर त्याची पूर्ण श्रद्धा होती. कोणत्याही परिस्थितींत, कोणत्याही संकटाच्या वेळीं, कांहींना कांहीं उपाय योजून, चारी बाजू संभाळून शेवट गोड कसा करावा हें तिला चांगलें साधत असे तें त्याला चांगलेंच माहीत होतें. म्हणूनच तिच्याजवळ एक शब्दसुद्धा न काढतां त्यानें गाडी पाठवून दिली होती. त्याला आशा वाटत होती—आनंद झाला होता—थोडीशी लाजही वाटत होती—तितकीच भीति वाटून तो वाट पाहात राहिला होता. त्याला वाटत होतें, कीं आईची क्षमा मागण्यापुरतें तरी तिनें यावें.

दुपारीं नुसत्या चरणलाच घेऊन गाडी परत आली. चंडीमंडपांतून वृंदावन आड नजरेनें पाहात होता तो ती आली नाहींशी पाहून स्तब्ध झाला.

कांहीं दिवसांपासून त्याच्या शाळेंत पूर्वीसारखा सुव्यवस्थितपणा राहिला नव्हता. पंडित महाशयांच्या वारंवार होणाऱ्या गैरहजेरीमुळें येणाऱ्या मुलांची संख्या कमी होऊं लागली होती. जे येत असत ते देखील तळयावर जाऊन तालपत्रें धुवून आणण्यांत वेळ काढीत असत. सुव्यवस्थितपणा फक्त एकच बाबतींत होता—आरती झाल्यानंतर प्रसादाला मात्र सारे हजर असत. पण तें देखील विद्यार्थीवर्गाच्या देवावर असणाऱ्या अकृत्रिम भक्तीमुळें असावें. प्रसादाला हजर राहिलें नाहीं तर देवाघरीं पाप केल्यासारखें होईल असेंही त्यांना वाटत असावें !

एक दिवस अकस्मात वृंदावन पुन्हा पूर्वीप्रमाणें शाळेच्या कामाकडे तीव्रतेनें लक्ष देऊं लागला. तालपत्रें धुवून आणायच्या वेळेची मर्यादा जी पूर्वी सहा तासांवर गेली होती ती हटवून पंधरा मिनिटांवर आली. सारा दिवस गैरहजर राहून केवळ ईश्वरभक्तीच्या ओढ्यानें फक्त आरतीच्याच वेळीं हजर राहाणाऱ्या मुलांना इतर वेळींही हजर राहाण्याबद्दल कडक ताकिद देण्यांत येऊं लागली.

आठ दहा दिवसांनीं एके दिवशीं तिसऱ्या प्रहरीं वृंदावनचा गणिताचा

वर्ग सुरू असतांना एक गृहस्थ अचानक येऊन उपस्थित झाला. वृंदावननें मोठ्या आदरानें त्याचें स्वागत केलें, त्याला बसायला आसन दिलें—पण त्याला ओळखलें नाहीं.

येणारी व्यक्ति वृंदावनच्या वयाचीच होती. बैठक मारल्यावर तो हंसून म्हणाला, " काय भय्या, ओळखलं नाहींस वाटतं ? "

वृंदावन ओशाळून म्हणाला, " हो —नाहीं. "

तो म्हणाला, " माझ्या कामाबद्दल नंतर बोलेन. माझ्या मामाच्या पत्रांतून वारंवार तुझी तारीफ कळल्यामुळं परमुलखांत जायच्यापूर्वी एकदां तुला भेटायला आलोंय. मी केशव. "

वृंदावननें ताड्कन् उठून आपल्या बालमित्राला कडकडून मिठी मारली. ज्या दुर्गादासबाबूंनीं त्याला इंग्रजी शिकवलें होतें त्यांचा हा भाचा. पंधरा-सोळा वर्षांपूर्वी तो पांचसहा महिने इकडे होता. त्यावेळीं दोघांची मोठी दोस्ती जमली होती. दुर्गादासबाबूंची पत्नी मृत्यु पावली, त्यावेळीं केशव जो निघून गेला तो आतापर्यंत इकडे आला नव्हता. तथापि दोघेही एकमेकांना विसरले नव्हते. दुर्गादासबाबूंकडून केशवची हकिकत वृंदावनला वेळोवेळीं कळत असे.

पांच सहा वर्षांपूर्वी केशव एम. ए. होऊन कॉलेजांत प्रोफेसरी करीत होता. सध्यां सरकारी नोकरी मिळाल्यामुळें परमुलखांत जाणार होता.

मामुली कुशल प्रश्न झाल्यावर तो म्हणाला, " माझ्या मामांना, खोटं तर दूरच राहो, पण कोणतीही गोष्ट एवढीमुद्धां अधिक वाढवून सांगायची संवय नाहीं. त्यांनीं आपल्या गेल्या पत्रात लिहिलं होतं—आजवर पुष्कळच शिष्य माझ्याकडे शिकले पण तुझ्याखेरीज दुसरा कुणी कर्तबगार निघाल्याचं कांहीं आपल्याला दिसून आलं नाहीं. खरी माणुसकी कुठं असेल तर ती वृंदावनच्या ठायीं. म्हणूनच आपला मुलूख सोडण्यापूर्वी हा ' खरा माणूस ' पाहायला आलोंय. "

हे उद्गार काढणारा त्याचा बालमित्र होता, तरीही वृंदावन इतका ओशाळला, कीं त्याला काय बोलावें हेंच सुचेना. या जगांत कुणीही माणूस आपली इतकी बेफाट स्तुति करील अशी कल्पना त्याला स्वप्नांतसुद्धां झाली नसती. विशेषतः अत्यंत आदरणीय वाटत असलेल्या आपल्या गुरूकडून हा स्तुतिपाठ आल्यामुळें तो हतबुद्ध होऊन स्वस्थ राहिला.

केशवच्या तें ध्यानीं आलें. तो म्हणाला, "जाऊं दे. तुला ओशाळगत वाटते तर आतां तो विषयच नको. तुझ्याविषयीं मामाचं मत काय आहे एवढंच मी सांगितलं तुला. आतां कामाची गोष्ट बोलूं. शाळा उघडली आहेस, —मी ऐकलं कीं पगारसुद्धां घेत नाहींस—उलट पाटीपेन्सिल पुस्तकंसुद्धां मुलांना फुकट पुरवतोस—मी सुद्धां तें करून पाहिलं होतं पण शिकणारेच मिळाले नाहींत मला. म्हणूनच विचारतों भय्या, कीं हे एवढे विद्यार्थी गोळा केलेस कसे?"

वृंदावनला त्याच्या भाषणाचा रोख कळला नाहीं. प्रश्नार्थी मुद्रेनें तो नुसता पाहात राहिला.

केशव हंसून म्हणाला, "आतां उघड उघड सांगतों—एरवीं तुला कळायचं नाहीं. अलिकडे सर्वांना वाटूं लागलंय, कीं ज्याला कुणाला देशसेवा करायची असेल त्याचं पहिलं काम म्हणजे अशिक्षित कुणब्यामाळ्यांना सुशिक्षित करणं. शिक्षणाखेरीज दुसरं कोणतंही काम करणं म्हणजे निष्कारण शक्तीचा अपव्यय करणं. एकदां त्यांना लिहायला वाचायला शिकवलं कीं आपल्या प्रश्नांची आपणच उकल करायला ते समर्थ होतील. एंजिनमधें वाफ उत्पन्न केली कीं गाडी चालूं लागते, नाहीं तर एवढे मोठेमोठे बोजे भरलेली गाडी ओढायला वाटेल तेवढीं माणसं लागलीं तरी ती एक तसूभर-सुद्धां हलायची नाहीं.—जाऊं दे. तुला तें माहीतच आहे. नाहींतर गांवचे पैसे खर्च करून ही शाळा कशाला उघडली असतीस? एवढ्यासाठींच मी अजून लग्नसुद्धां केलं नाहीं. या गावांप्रमाणेंच माझ्या गांवांत देखील शिक्षणाची कांहीं सोय नाहीं, म्हणून पहिल्यानं एक लहानशी शाळा काढली—शेवटीं तिचं मोठ्या हायस्कूलांत रूपांतर व्हावं अशी माझी इच्छा होती. पण या प्राथमिक शाळेंतच कुणी विद्यार्थी येईना. आमच्या गांवचे शूद्र लोक असे भयंकर सैतान आहेत, कीं मुलांना शिकवायची त्यांची तयारीच नाहीं. मानापमानाचा प्रश्न बाजूला ठेऊन या साऱ्या लोकांच्या दारांघरांतून खेटे घालून पाहिले पण नाहीं—कांहींच जमलं नाहीं."

वृंदावनचा चेहरा गोरामोरा झाला. तो शांतपणें म्हणाला; "त्या शूद्र लोकांचं भाग्य मोठं, कीं सभ्य माणसांच्या शाळेंत त्यांनीं आपलीं मुलं पाठवलीं नाहींत. आणखी असं पहा भय्या, आमच्यासारख्या हलक्या

लोकांच्या दारांतून हिंडून तूं जो स्वतःला कमीपणा घेतलास तें सुद्धां बरं केलं नाहींस. "

वृंदावनच्या या उद्गारांतील चिमटा केशवला चांगलाच जाणवला. अतिशय ओशाळून तो म्हणाला, " नाहीं रे, नाहीं—तसं नाहीं. तुला—तुझी गोष्ट बोलत नाहीं !—छे छे ! मीं तसं म्हणत नव्हतों—तसं नव्हे रे— असं पहा—"

वृंदावन हंसत सुटला. तो म्हणाला, " तसं मला म्हटलं नाहींस तें मला माहीत आहे. पण तू ज्यांचा उल्लेख केलास ते माझेच भाईबंद. आम्ही सारे तेलीतांबोळी, कुमारचांभार, गवळीकुणबी, शिंपीकोष्टी—आम्ही माग चालवतों, नांगर हांकतों, गुरं बाळगतों—कोटबूट आमच्या ओळखीचे नाहींत—सरकारी कचेरीच्या दाराची भेट आम्हां लोकांना होणं दुर्मिळ, म्हणूनच तुम्हीं लोक आम्हांला हलके समजता.—शुभ कार्यालासुद्धां आमच्या घरांत पाऊल टाकणं म्हणजे तुमच्यासारख्या उच्च दर्जाचं शिक्षण घेतलेल्या लोकांची इज्जत खराब होते.—"

केशव मान खालीं घालून म्हणाला, " वृंदावन, खरं सांगतों भय्या, मी तुला शूद्रलोकापेक्षां अगदीं वेगळ्या दृष्टीनं पाहतों म्हणूनच मी तसं बोललों. स्वतःलाच त्या लोकांपैकीं एक समजून तूं रागाला येशील असं मला कळतं, तर केव्हांही मी तसला शब्दसुद्धां काढला नसता. "

वृंदावन म्हणाला, " तें मला माहित आहे. त्या लोकांपासून मला वगळायचं तूं ठरवलंस तरी मी वेगळा होत नाहीं भय्या. सात पिढ्यांपासून ह्या हलक्या लोकांबरोबरच आम्ही मिळलों मिसळलों आहोंत. मी कुणबटच आहे—शेतकरी आहें—मीसुद्धां स्वतःच्या हातात नांगर धरतोंय. तुझ्या शाळेंत मुलं आलीं नाहींत केशव, त्याचं कारण हेंच !—माझ्या शाळेंत सहज आलीं.—मी मोठा असलों तरी देखील त्यांच्यातलाच एक —त्यांच्या बाहेर जाऊन मोठा झालेला नाहीं—म्हणूनच माझ्याकडे यायला त्यांना संकोच वाटत नाहीं. तुम्हां लोकांकडे जायला खात्री वाटत नाहीं त्यांना. आम्ही अशिक्षित, दरिद्री, स्वतःच्या तोंडानं स्वतःचा मोठेपणा बोलून दाखवायची छाती होत नाहीं आम्हाला. तुम्ही आम्हाला हलके लोक म्हणून नांवं ठेवतां, आम्ही मुकाट्यानं तें कबूल करतों,—पण अंतःकरणापासून नसते ती कबुली. म्हणूनच तुम्ही बऱ्या बोलानं हांक मारली तरी 'ओ' म्हणवत नाहीं आमच्यानं. "

केशव अत्यंत शरमिंदा झाला होता. खालीं मान घालून मुकाट्यानें त्याचें भाषण तो ऐकत होता.

वृंदावन म्हणाला, " यांत जास्त नुकसान होतं तें आमचंच, हें मी जाणतों. तरी पण आम्ही एक तुमचेच आहोंत, तुमच्यासाठीं राबणारे आहोंत, तुमचं हित पाहणारे आहोंत असें धरून तुम्ही चाललांत तर कांहीं भीति नाहीं तुम्हाला. पाहतोयस ना भय्या, आमच्यामधें कुणबट वैद्य आहेत, कुणबट पंडित आहेत, कुणबट ज्योतिषी आहेत, त्यांचा चांगला नांवलौकिक आहे चोहींकडे—आतां हा माझा लौकिक आहे ना, तसा. पण तुम्हांसारख्या बड्या डॉक्टरांची आणि प्रोफेसरांची या लोकांकडे मात्रा चालायची नाहीं. आमच्या हृदयांतसुद्धा देव आहे. तुम्ही आमची कींव करतां—दया करतां, उंचावर बसून आम्हाला खालीं हात करून भीक घालतां, तेंच जाणवतं आमच्या जिवाला. अश्रद्धेनं दाखवलेली ही दया टोंचते आम्हाला. म्हणूनच तोंड फिरवून आम्ही बाजूला सरतों. "

आतां मात्र केशवनें उत्तर द्यायला सुरवात केली. तो म्हणाला, " हें तोंड फिरवणं म्हणजे चूक नाहीं का ? खरोखरच आम्हाला वाटतं, कीं तुमचं कल्याण व्हावं. म्हणूनच तुम्हीं लोकांनीं थोडा विश्वास टाकला पाहिजे आमच्यावर. आम्हाला शिक्षण मिळालं आहे, म्हणून बरं काय अन् वाईट काय तें आम्हाला चांगलं कळतं. प्रत्येक बाबतींत आम्ही वरचढ आहोंत—जाणक आहोंत—तें तुम्ही आपल्या डोळयांनीं पाहतांहां, म्हणूनच आमचं ऐकणं हें कर्तव्य आहे तुमचं. "

वृंदावन म्हणाला, " असं पहा केशव, देवता कां तोंड फिरवतात तें त्या देवतांनाच माहित. ती बाब राहूं दे. मला सांगायचं आहे तें हें, कीं तुम्ही आम्हाला ज्या कल्याणाच्या गोष्टी सांगतां त्या आमच्यांतले एक म्हणून नव्हे–वरिष्ठाच्या भावनेनं तुम्ही बोलतां ! तुमच्यापैकीं पंधरा आणे लोकांना वाटतं, कीं ज्या गोष्टींत वरच्या वर्गाच्या मुलाचं कल्याण आहे त्या गोष्टानं नांगऱ्या कुणब्याच्या पोरांचा अधःपात होईल. तुमच्या संगतींत राहून कुणब्याचा पोर लिहायला वाचायला शिकला तर तो बाबू बनेल,—आपल्या अशिक्षित आई-बापांना मग ओळखायचा नाहीं तो—मान द्यायचा नाहीं—आदरानं पाहायचा नाहीं. तुम्हां लोकांत शिक्षणाचे जे परिणाम झाले आहेत, त्यामुळं तुम्हीं लोक

जसे वागतां तें पाहून आम्हींही तसेच वागतों. म्हणूनच केशव, आधीं या आम्हां लोकांत ये. आपल्या देशांतल्या या हलक्या लोकांतला एक व्हायला शिक नि मग त्यांच्या कल्याणाच्या गोष्टी बोलायला, त्यांच्या पोरांबाळांना ल्याहायला वाचायला शिकवायच्या गोष्टी बोलायला सुरवात कर. तुम्ही सुशिक्षित झालेले लोक आम्हा नांगऱ्यांना हलके मानीत नाहीं, आपुलकीनं पाहता, असं जेव्हां तुम्ही स्वतःच्या आचरणानं आम्हाला पटवून द्याल तेव्हांच आमची ही भीति नाहींशी होईल. सुशिक्षित झालेलीं आमचीं मुलं आपल्या अशिक्षित असलेल्या वडील माणसांची हेटाळणी करायचीं नाहींत, आपली जमात सोडायचीं नाहींत, वाडवडलांचा आपला धंदाउदीम कारागिरी सोडून आमच्यापासून वेगळे व्हायचा प्रयत्न करणार नाहींत, असं तुम्हीं आधीं पटवून दिलं पाहिजे आम्हाला. जोंपर्यंत तुम्ही असं कांहीं केलं नाहीं तोंपर्यंत जन्मोजन्मीं अविवाहित राहिलास, हजारों व्रतं घेतलींस, वाटेल तो त्याग केलास तरी तुझ्या शाळेंत आम्हां लोकांची पोरं यायचीं नाहींत. आम्ही हलके लोक सुशिक्षित सभ्य माणसांना भीतों. त्यांना मोठे मानतों, त्यांची सेवा करतों पण विश्वास ठेवीत नाहीं त्यांच्यावर. त्यांचं सांगणं ऐकणार नाहीं आम्हीं. तुमचं कल्याण नि त्यांचं कल्याण एक नव्हे, त्यांत तफावत आहे, हा संशय आम्हां लोकांच्या मनांतून कांहीं केल्या नाहींसा व्हायचा नाहीं."

केशव कांहीं वेळपर्यंत स्तब्ध बसला होता. नंतर तो म्हणाला, "वृंदावन, तूं म्हणतोस तें खरं आहे. पण मी असं विचारतों, दोघांच्याहीमधें उभय पक्षीं विश्वासाचा लागाबांधा नसला तर आम्ही हजार आपुलकी दाखवली तर काय उपयोग होणार आहे त्याचा? आम्ही आपले आहोंत कीं परके आहोंत, तें कळायला विश्वास नको का उत्पन्न व्हायला? त्याला काय उपाय?"

वृंदावन म्हणाला, "आतां मी सांगितलं ना, वागणुकींत दिसलं पाहिजे तें. आमच्यांतले शंभर टक्के आचारव्यवहार तुम्हा सुशिक्षितांच्या दृष्टीनं जर कुसंस्कार दिसत असले, टाकाऊ ठरूं लागले,—आमचीं घरंदारं आमच्या संसाराच्या चालीरीति, आमच्या पोटापाण्याचा धंदाउद्योग, जर तुमच्या पासून सर्वस्वी निराळा असला, तर तुम्ही काय वाटेल तें केलं तरी आम्हाला तें पटायचं नाहीं, कीं तुम्ही दाखवलेल्या कल्याणाच्या मार्गांतच आमचं कल्याण

आहे म्हणून. ठीक,—मला असं सांग केशव, मुंज झाल्यापासून संध्यापूजा करतोस ?

" नाहीं. "

" पायांत वहाणा घालून पाणी पितोस ? "

" पीतों. "

" मुसलमानांच्या हातचं खातोस ? "

" प्रेज्युडिस नाहीं. वेळ आला तर खाईन. "

" तर मग मी तुला सांगतों. शूद्रांत शिरून त्यांना शिकवण्यासाठीं शाळा उघडायच्या गोष्टी तूं बोलणं म्हणजे थट्टा आहे. यापेक्षां कडक शब्द बोललों असतों पण तुला राग येईल—"

" वेडेपणा ? धाडस ? "

" हो अगदीं तेंच. केशव, नुसती इच्छा असली, नुसती अंतःकरणाची कळकळ असली तरी परक्याचं कल्याण करतां येत नाहीं—देशकार्य करतां येत नाहीं. ज्यांचं कल्याण करायचं त्यांच्यांत मिसळलं पाहिजे—त्यांच्यांतला एक झालं पाहिजे, कष्ट सहन करायची ताकद पाहिजे. बुद्धिवादाला बळी पडून धर्मकर्मांच्या मर्यादा उलटून गेलं तर तुम्हांला स्वतःलाही कांहीं फायदा व्हायचा नाहीं, कीं त्यांचा फायदा करण्याचीही ताकद तुम्हाला यायची नाहीं. —पुरे झालं आतां. संध्याकाळ होत आली. आतां थोडं शाळेचं काम करतों."

" चालू दे तुझं काम. उद्यां सकाळीं येतों आतां. " असें म्हणून केशव उभा राहिला तेव्हां वृंदावननें त्याच्या पायावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार घातला.

मूळचा खेड्यांतला असला तरी केशव शहरांत वाढला होता. आपल्या मित्राजवळ आपल्याच मित्रानें असें कांहीं तरी करावें हें पाहून त्याला अत्यंत संकोच वाटला. दोघेही खालीं आंगणांत आले तेव्हां शाळेंतील साऱ्या विद्यार्थ्यांनीं जमिनीवर डोकें टेकून त्याला प्रणाम केला.

आपल्या बाळमित्राला बाहेरच्या फाटकापर्यंत पोचवून परत निघतांना वृंदावन म्हणाला, " तूं माझा दोस्त असलास तरी ब्राह्मण आहेस, म्हणूनच तुला मी नमस्कार केला—माझ्या विद्यार्थ्यांनाही तुला नमस्कार करायला लावलं. कळलं ना ? "

" कळलं ! " असें म्हणतांना केशव ओशाळला होता. त्याचा निरोप घेऊन तो निघून गेला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं कबूल केल्या प्रमाणें केशव हजर झाला. आल्या-बरोबर तो म्हणाला, " माणुसकी म्हणजे काय तें मला आतां कळलं. खरोखरच तूं माणूस आहेस. आतां मुळींच शंका राहिली नाहीं मला. "

वृंदावन हंसून म्हणाला, " अन् मलाही नाहीं. बरं पुढं ? "

केशव म्हणाला, " तुला उपदेश करायचा नाहीं मला—तो माझा सारा अहंकार कालच कोसळलाय. मित्राच्या नात्यानं मी तुला विचारतों,—स्वतःचा पैसा नि वेळ खर्ची घालून या गांवांत तूं मुलांना शिकवतोयस, पण नुसतं ' क ख ' शिकवायची सोय नाहीं अशीं जीं आणखी हजारों गांवं आहेत त्या गांवांत हें काम सरकारनं केलं पाहिजे असं नाहीं तुला वाटत ? "

वृंदावन हसू लागला. तो म्हणाला, " अगदीं शाळेंतल्या पोरासारखा प्रश्न केलास हा. चूक केली म्हणून मी जर राघूला मारायला गेलों तर दोन्ही हात वर उचलून तो म्हणेल,—पंडित महाशय, माधूनंही तीच चूक केलीय. अर्थात माधूची चूक दाखवून दिली कीं राघूच्या दोषाचं निराकरण झालं असं वाटतं त्याला. देशभर पसरलेल्या या मूर्खपणाचं प्रायश्चित्त आधीं स्वतः तर करूं भय्या.—मग सरकार आपलं कर्तव्य करतं कीं नाहीं तें पुढं पाहूं. स्वतःचं कर्तव्य पार पाडायच्या पूर्वी दुसऱ्याच्या कर्तव्याची चर्चा करणं माझ्या दृष्टीनं पाप आहे. "

" पण तुझ्या माझ्यासारखा एकदोघांची ताकद ती केवढी असणार ? एक लहानशी शाळा काढली, मूठभर पोरांना शिकवलं म्हणजे कसं होणार हें प्रायश्चित्त ? "

वृंदावन आश्चर्यचकित होऊन क्षणभर त्याच्याकडे पाहात राहिला आणि म्हणाला, " हें बोलणं कांहीं ठीक नाहीं भय्या. माझ्या शाळेंतला एक विद्यार्थी जरी माणसासारखी माणुसकी शिकला तर या आमच्या तीस कोटी लोकांचा सहज उद्धार होऊन जाईल. न्यूटन, फॅराडे, राममोहन, विद्यासागरसारखीं माणसं कांहीं रोज तयार होत नाहींत केशव. या छोट्याशा पाठशाळेंतला एक तरी विद्यार्थी माणसासारखा माणूस झाल्याचं भाग्य मरायच्यापूर्वी मला लाभो एवढाच मला आशीर्वाद दे केशव. आणखी एक सांगायचं आहे—

माझ्या शाळेंत येणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्यानं एक अट पाळायची असते. काल संध्याकाळीं शाळा सुटेपर्यंत तूं थांबला असतास तर तुला दिसलं असतं, कीं रोज घरीं जायच्यापूर्वी इथला प्रत्येक विद्यार्थी एक प्रतिज्ञा करीत असतो, मोठा झालों म्हणजे कमीत कमी दोघांना तरी आपण लिहायला वाचायला शिकवीन. माझ्याकडच्या प्रत्येक पांच विद्यार्थ्यांतल्या एक विद्यार्थ्यानं जरी मोठेपणीं ही प्रतिज्ञा पुरी केली, तर मी हिशेब करून पाहिलं, कीं वीस वर्षांत ह्या बंगाल्यांत एकसुद्धां निरक्षर माणूस राहायचा नाहीं !"

एक सुस्कारा सोडून केशव म्हणाला, "अं: ! केवढा भयंकर आशावाद हा !"

वृंदावन म्हणाला, "तसं म्हण हवं तर. केव्हां केव्हां दुबळेपणानं मलासुद्धां वाटतं, कीं ही दुराशा आहे. पण बलवंताच्या नजरेनं जेव्हा मी पाहतों तेव्हां मला वाटतं, कीं देवाची कृपा असली तर असं व्हायला किती उशीर ?"

केशव म्हणाला, "वृंदावन, आज रात्रीं मुलूख सोडून मला जायचं आहे. पुन्हां केव्हां भेट होईल देव जाणे ! पत्र लिहिलं तर येशील ना ?"

"यांत विशेष तें काय आहे केशव ?"

"विशेष देखील आहे. सांगतों — ऐक. कधीं मित्राची जरूर लागली तर माझी आठवण करशील ? मला हांक मारशील ?"

"होय—हांक मारीन !" असें म्हणून वृंदावननें खालीं वांकून केशवला नमस्कार केला.

## ११

वृंदावनची आई श्रीकृष्णाचा दोलोत्सव दरवर्षी मोठ्या थाटामाटानें करीत असे. काल तो उत्सव संपला होता. अतिशय थकल्यामुळें आज सकाळीं वृंदावन अजून बिछान्यांतून उठला नव्हता. त्याच्या खोलीबाहेरून आईनें हाक मारली, "वृंदावन, जरा उठून ये ना बाबा."

आईच्या हांकेंतला केविलवाणा स्वर ऐकून वृंदावन धडपडून उठून बसलें. त्यानें विचारलें, "काय आहे आई ?"

दार उघडून आई आंत आली आणि म्हणाली, "माझा कांहीं ओळखीचा

नाहीं तो—तुझ्या शाळेंतला एका मुलगा बाहेर बसून रडतोय. त्याच्या बापाला उलटीजुलाब सुरू झालेयत नि अगदीं थकलाय तो. ”

वृंदावन तसाच उठून बाहेर आला. पाहातो तों शिबू गवळ्याचा मुलगा बाहेर उभा राहून रडत होता. तो रडत रडत म्हणाला, “ पंडित महाशय, बाबा अगदीं कससंच करताहेत. डोळे उघडे आहेत तरी पाहात नाहींत. बोलतसुद्धां नाहींत ! ”

मोठ्या प्रेमानें त्याचे डोळे पुसून त्याचा हात धरून तो त्याच्या घरीं गेला.

शिबूची शेवटची घटका आली होती.

दरवर्षी याचवेळीं गांवांत पटकीची साथ सुरू होत असे. आजही सुरवात झाली होती. काल संध्याकाळीं शिबूचा आजार सुरू झाला. हा वेळपर्यंत कुणी कसलाच उपाय केला नव्हता तरीही अजून तो जीव धरून राहिला होता. वृंदावन आल्यानंतर एक घटकाभऱ्यानें त्यानें देह ठेवला.

बंगाल्यांत बहुधा प्रत्येक गावांत कुलपरंपरागत चालत आलेला असा एकाद दुसरा डॉक्टर असतो. तसाच या गावांतही गोपाल डॉक्टर होता. काल रात्रीं त्याला बोलवायला कुणी गेले होते. कॉलऱ्याचें नांव ऐकतांच त्यानें व्हिजिटचे दोन रुपये रोख मागितले. आजवरच्या अनुभवामुळें त्याला कळून चुकलें होतें, कीं या साथींत औषध घेणारे गरीबगुरीब लोक उधारीच्या लायखीचे नाहींत—व्हिजिट फी देईपर्यंत जगायची त्यांना संवय नाहीं. शिबूच्या बायकोला एवढ्या रात्रीं रोख रक्कम मिळवणें अशक्य झालें. निरुपाय झाल्यामुळें नवऱ्याला मिठाचें पाणी पाजून आपल्या मतें तिनें उपायांची पराकाष्ठा केली. सारी रात्र ती त्याच्या उशाशींबसून शीतलादेवीची प्रार्थना करीत होती. त्यानंतर सकाळीं हें असें झालें.

जातीचा प्रपंच मनांत न आणतां वृंदावननें आपल्या आयुष्यांत आजवर पुष्कळांना खांदा दिला होता. शिबूचें उत्तरकार्य करून तिसऱ्या प्रहरीं तो घरीं परत आला.

संध्याकाळ झाली होती. ओटीवर चटई टाकून वृंदावन डोळे झांकून पडला होता. कुणाची तरी चाहूल लागल्यामुळें त्यानें डोळे उघडून पाहिलें, तों सकाळींच वारलेल्या शिबूचा तोच मुलगा येऊन उभा राहिला होता.

“ ये. बैस षष्ठीचरण. ” असें म्हणून वृंदावन उठून बसला.

एकदोन वेळ त्या मुलानें ओंठ फुलवून बोलायचा प्रयत्न केला. शेवटीं ' पंडित महाशय ' म्हणून एकदम हंबरडा फोडून तो रडूं लागला.

नुकत्याच पोरक्या झालेल्या त्या मुलाला वृंदावननें ओढून जवळ घेतलें. तो रडत रडत म्हणाला, " आतां कृष्णाला वांत्या होताहेत. "

कृष्णा त्याचा धाकटा भाऊ. तो देखील मधून मधून आपल्या दादाबरोबर शाळेंत शिकायला येत असे.

व्हिजिटचे पैसे मिळाले नाहींत तरीही आज रात्रीं गोपाळ डॉक्टर वृंदावन बरोबर कृष्णाला पाहायला आला. त्यानें त्याची नाडी पाहिली, जीभ पाहिली, औषध दिलें—पण आईनें काळीज फोडून काढलेल्या हंबरड्याकडे सुद्धां बिचाऱ्या कृष्णानें लक्ष पुरवलें नाहीं. वैद्याच्या अब्रूचीही पर्वा केली नाहीं. रात्र संपायच्या पूर्वीच हातगुणाबद्दल प्रख्यात असणाऱ्या गोपाळ डॉक्टरची अब्रू घेण्यासाठीं तो आपल्या बापाला भेटायला निघून गेला.

नुकत्याच विधवा झालेल्या आईचें पुत्रशोकाचें भयंकर दुःख पाहून वृंदावनचें काळीज फाटून गेलें. त्याला स्वतःला एक मुलगा होता म्हणूनच तिचा तो हंबरडा त्याच्यानें ऐकवेना. तो धांवतच घरीं आला आणि जिवाच्या उमाळ्यानें चरणला हृदयाशीं कवटाळून रडूं लागला.

अंतर्मुख दृष्टि करून त्यानें हजार वेळां आपलें अंतरंग शोधून म्हटलं, ' माणसाच्या दोषाबद्दल त्याला वाटेल ती शिक्षा दे देवा—पण ही असली शिक्षा देऊं नकोस !—'

देवानें त्याची ही करुणवाणी ऐकली कीं नाहीं कोण जाणे, पण त्याला मात्र अगदीं निःसंशय वाटलें, हा आघात सहन करण्याची ताकद—कुणाला असेल ती असो—आपल्याला नाहीं.

यानंतर आणखी दोनतीन दिवस बिनबोभाट गेले—पण तिसऱ्या दिवशीं त्याचा शेजारी रसिक मयरा याची बायको कॉलऱ्यानें पछाडल्याचें त्याला कळलें.

त्याची आई तिला पाहायला गेली होती. दहा वाजायच्या सुमाराला डोळे पुशीत पुशीत ती परत आली आणि लगेच घटकाभऱ्यानें रडारडीचा आवाज कानीं आला. चारपांच लहान मुलांना मागें ठेवून रसिकची बायको इहलोक सोडून निघून गेली.

यानंतर गांवांत महामारीचा फैलाव जोरानें सुरू झाला. ज्यांना पळून जायची सोय होती ते दुसऱ्या गांवीं निघून गेले. पुष्कळांची तशी कांहीं सोय नव्हती. ते घाबरून अर्धमेले झाले होते. कसाबसा जिवाचा धडा करून म्हणत होते, "अन्नपाण्याचा संबंध तुटला कीं जावं हें लागणारच. पळून काय करणार ?"

वृंदावनच्या घराच्या समोरच गांवांतला मुख्य रस्ता होता. त्यामुळें रस्त्या-वरून जाणाऱ्या प्रत्येक प्रेतयात्रेचा भयानक 'हरिबोल' त्याला सारखा ऐकूं येत होता. प्रत्येकाचा अन्नपाण्याचा संबंध अशा रीतीनें संपत येत होता.

आसपासच्या गांवांतून एकादी दुसरी लागण झाल्याचें ऐकूं येत होतें खरें, पण बाडलगांवची परिस्थिति मात्र प्रत्येक घटकेला अधिकाधिक भयंकर होत चालली होती. याला कारण एकच होतें —गांवांत इतर सगळ्या सोयी असल्या तरी प्यायच्या पाण्याचे मात्र अत्यंत हाल होते.

गांवांत नदी नव्हती. ज्या चार दोन तळ्या होत्या त्यांतलें पाणी पूर्वी चांगलें असलें तरी वेळोवेळीं उपसा न झाल्यामुळें दिवसेंदिवस खराब होत चाललें होतें. या महत्वाच्या गोष्टीकडे आजवर कुणी लक्ष दिलें नव्हतें. गांवचे लोक बेफिकीर होते. त्यांना वाटे, तहान भागवायचें आणि अन्न शिजवायचें काम करायला पाण्याचा पातळपणा जोपर्यंत आड येत नाहीं, तोंपर्यंत तें कसें आहे हें पारखून पाहायची कांहीं जरूरी नाहीं.

इकडे गोपाळ डॉक्टरखेरीज दुसरा कुणी औषध देणारा माणूस गांवांत नव्हता. आणि गोपाळला गरीबाच्या घरीं जायला फुरसत होत नसे. तिकडे सांथीचा जोर दिवसेंदिवस सारखा वाढत होता. औषध पाण्याची गोष्ट तर दूरच राहो पण मेल्या माणसाच्या प्रेताला अग्नि देणें देखील दिवसेंदिवस कठीण होऊं लागलें होतें.

अजूनपर्यंत वृंदावनच्या घराच्या बाजूचा भाग सांथीच्या तडाक्यांत सांपडला नव्हता. रसिकची बायको मेल्यानंतर वृंदावनच्या घराच्या आस-पासच्या त्या पांचसात घरांत मृत्यूचा प्रवेश झाला नव्हता.

वृंदावनच्या बापानें स्वतःच्या उपयोगाकरतां म्हणून जी तळी खोदली होती तिचें पाणी अजूनही बिघडलें नव्हतें. शेजारची माणसें या तळीचें पाणी वापरासाठीं नेत होतीं म्हणूनच सांथ या बाजूला आली नव्हती.

पण दिवसेंदिवस वृंदावन घाबरून जाऊं लागला. मुलाच्या तोंडाकडे पाहिलें कीं त्याच्या नसांनसांतलें रक्त गारठून जाई. आपल्याला नकळत अचानक पितापुत्रांच्यामधें प्रत्येक क्षणाला दुरावा उत्पन्न होतो आहे असें त्याला वाटूं लागे. तसा तो धीराचा माणूस नव्हता. रोगाचें आणि मरणाचें नांव घेतलें, कीं त्याचा थरकांप होई.

मुलाला हांक मारली म्हणजे तो मुलगा त्याच्याकडे येत असे खरा पण तें त्याचें येणें न्यायाधिशासमोर येणाऱ्या गुन्हेगारासारखें दिसे. आजवरच्या संवयीमुळें तो खेंचून ओढल्यासारखा येत होता एवढेंच.

कुणाच्या तरी प्रेताला अग्नि देऊन तो घरीं आला आणि नंतर त्यानें चरणला हांक मारली—चरण जवळ आला तर त्याला हात लावल्याबरोबर त्याच्या सर्वांगावर कांटा उभा राही. त्याला सारखें वाटे, त्याला स्पर्श करतांना आपण नकळत सांथीचें बीज आपल्या या एकुलत्या एक वारसाच्या आंगांत रोवून टाकतों आहों ! बाहेरच्या सर्व प्रकारच्या संबंधापासून, रोगापासून, मरणाच्या भीतीपासून त्या मुलाला कसें दूर राखावें, ही एकच चिंता त्याला लागून राहिली होती.

शाळा आपोआप बंद झाली. चरणच्या तोंडाकडे पाहिलें म्हणजे त्याला वाटे, झालें तें बरें झालें. अलिकडे कांहीं दिवस त्याचा सारा भार त्यानें स्वत: पत्करला होता. त्याला जेवायला घालणें, त्याचे कपडे चढवणें, त्याची झोपायची व्यवस्था करणें वगैरे गोष्टी तो स्वत: करीत असे. या बाबतींत प्रत्यक्ष आपल्या आईवर सुद्धां बिनतक्रार विश्वास टाकायची त्याची तयारी नव्हती. एके दिवशीं आईच्या तोंडून त्याला कळलें, कीं त्याच्या शेजारच्या तारिणी मुखर्जींच्या धाकट्या मुलाला कॉलऱ्यानें पछाडलें. ती बातमी ऐकतांच त्याचा चेहरा एकदम काळा ठिक्कर पडला असें पाहून त्याची आई म्हणाली, "आतां पुरे झालं बाबा. आतां चरणला घेऊन तूं कुठं तरी बाहेर जा."

ओलावलेल्या डोळ्यानें वृंदावन म्हणाला, "तूंही चल आई."

चकित होऊन आई म्हणाली, "हे माझे घरचे देव टाकून ?"

"भटजींना सांगून देवपूजेची व्यवस्था करूं. तूं चल."

अधिकच आश्चर्यचकित होऊन आई म्हणाली, "माझ्या घरच्या देवाचा भार परक्यांनीं घ्यायचा ?—अन् मी पळून जायचं ?"

वृंदावन ओशाळून म्हणाला, " तसं नव्हे आई, तुझा भार कांहीं कुणी काढून घेत नाहीं. दोन दिवसांपुरतं जायच—तेवढ्यापुरतं—"

आई निश्चयपूर्वक म्हणाली, " तें होणं नाहीं वृंदावन. माझ्या सासूनं हें काम माझ्याकडं सोपवलं आहे. मी हें केव्हां कुणाकडे देईन तर तिनं दिलं तसंच. नाहींतर हें माझं काम मीच केलं पाहिजे. पण आतां तुम्हीं जा दोघे. "

उद्विग्नपणानें वृंदावन म्हणाला, " या दिवसांत तुला इथं एकटी टाकून का मी जाऊं आई ? समज, जर—"

आई हंसली आणि म्हणाली, " तर तें माझं भाग्य बाबा. तसं कांहीं झालं तर मी म्हणेन, माझं इथलं काम संपलं. देवाच्या मनात हा भार आतां दुसऱ्यावर टाकायचा आहे. तें कसं का असेना वृंदावन, माझा आशीर्वाद घेऊन तुम्ही दोघं अगदीं निर्घोरपणें जा. मी माझं देवदेवतार्चन घेऊन इथं सुखानं राहीन. "

आईच्या तोंडची ती निश्चयाची वाणी ऐकून गांव सोडून जाण्याची वृंदावनची आशा तिथल्या तिथेंच राहिली. कांहीं वेळ विचार करून तो सुद्धां तितक्याच निश्चयानें म्हणाला, " तर मग माझंसुद्धां जाणं व्हायचं नाहीं. तुझे देव आहेत तशी माझी आई आहे. स्वतः मी मुळींच भीत नाहीं. जावं असं मला वाटतंय तें चरणकडे पाहिलं म्हणजे. पण आतां त्याअर्थी जाणं शक्यच नाहींसं झालय, त्याअर्थी चरणचा सारा भार देवावर टाकून मी निश्चितपणानं राहीन. यापुढं कधींसुद्धां माझं तोंड उतरलेलं तुला दिसायचं नाहीं आई. "

तारिणी मुखर्जींचा धाकटा मुलगा इहलोक सोडून गेला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं कांहीं तरी कामानिमित्त वृंदावन त्या बाजूनें जात होता. त्याच्या तळीच्या पाणवठ्यावर एक बाई कसले तरी कपडे धुते आहे असें त्याला दिसून आलें. कांहीं धुतले होते तर कांहीं धुवायचे होते. त्या कपड्यांकडे पाहातांच वृंदावनच्या अंगावर शहारे आले. तो जवळ आला आणि रागारागानें म्हणाला, " प्रेताचे कपडे आणून इथं धुतांहां याचा अर्थ काय ? "

बुरख्याआडून त्या बाईनें काय उत्तर दिलें तें त्याला चांगलेंसें कळलें नाहीं.

वृंदावन म्हणाला, "झालं तें होऊन गेलं. आतां त्याला उपाय नाहीं! पण आता इथं धुवूं नका. हे कपडे घेऊन निघून जा इथून."

ते धुतलेले आणि न धुतलेले कपडे घेऊन ती निघून गेली.

त्या पाण्याकडे पाहात वृंदावन कांहीं वेळ स्तब्धपणें उभा राहिला होता. तितक्यांत तारिणी तावातावानें तिथें आला. आधींच पुत्रशोकाचा धक्का बसलेला—त्यात हा अपमान झालेला त्याला सहन झाला नाहीं. वेड्यासारखे डोळे गरगर फिरवीत तो म्हणाला, "माझ्या घरच्या माणसांना तूं तळीवर यायची मनाई केलीस?"

वृंदावन म्हणाला, "मुळींच नाहीं. मळके कपडे धुऊं नको एवढंच मी सांगितलं."

आरडत ओरडत तारिणी म्हणाला, "मग कुठं धुवायचे ते? राहायचं या बाडलगांवांत अन् धुवायला जायचं काय महारवाड्यात? सत्यानाश होईल तुझा वृंदावन—सत्यानाश होईल!—हलकटाची जात, पैशाच्या जोरावर ब्राह्मणाचा असा छळ केलास तर निर्वंश होईल तुझा."

वृन्दावनच्या काळजांत एकदम धडकी भरली. भांडायची किंवा आरडाओरडा करायची त्याला संवय नव्हती. मन ताब्यांत ठेवून तो शांतपणें म्हणाला, "माझा एकट्याचाच सत्यानाश झाला तरी चालेल पण आपण या साऱ्या वाडीचा सत्यानाश करायला उठलांहां. सारा गांव उजाड झाला आहे, एवढी वाडीच काय ती सुरक्षित आहे, तेवढी सुद्धां तशीच राखूं द्यायची नाहीं का आपल्याला?"

तो ब्राह्मण उर्मटपणानें म्हणाला, "तळीवर कपडे धुवायचे नाहींत तर काय तुझ्या टाळक्यावर धुवायचे?"

वृंदावन निश्चयपूर्वक म्हणाला, "ही तळी माझी आहे. माझं ऐकायचं नसेल तर यापुढं मी बंदी करीन तुम्हाला इथ यायची."

"इथं बंदी केलीस तर आम्हीं जायचं कुठं तें सांग ना?"

वृंदावन म्हणाला, "इथलं पाणी न्यायचं तें नुसतं घरखर्चासाठीं. कपडेलत्ते धुवायचे असले तर ते शेतातल्या डबऱ्यात नेऊन धुवा जा."

तोंड वेंगाडून तारिणी म्हणाला, "जातीचा शूद्र—पण हलकटाची मिजास तर पहा! ब्राह्मणाघरच्या बायकांना शेतावर जाऊन कपडे धुवायला

सांगतोस का ? माझ्याच घरावर नाहीं कांहीं ही आपत्ती—तुझ्याही घरावर कोसळेल. "

तितक्याच शांतपणें पण निश्चयाच्या स्वरानें वृंदावन म्हणाला, " घरच्या बायकांनीं जावं असं मी कांहीं म्हणत नाहीं. आपल्या घरीं कुणी गडी मोलकरीण नसेल—आणि कांहीं माणुसकी असेल तुमच्या ठायीं, तर तुम्हीं स्वत: जाऊन धुऊन आणा कपडे. आपण दु:खीसुखी लोक—आपल्याला तोडून बोलणं मला बरं वाटत नाहीं—पण हजार शाप जरी मला तुम्हीं दिले तरी या तळीचं पाणी मी कुणाला बिघडवूं द्यायचा नाहीं." असें म्हणून जास्त वादविवाद टाळण्यासाठीं तो आपल्या घरीं निघून गेला.

दहा पंधरा मिनिटांनीं घोषाल महाशयानीं त्याच्या सदर दरवाजावर येऊन हांक मारायला सुरवात केली. तो तारिणीचा नातेवाईक होता. वृंदावन बाहेर येतांच तो म्हणाला, " अरे वृंदावन, काय हें ? तूं चांगला समंजस माणूस म्हणून म्हणत होतों आम्ही. ही काय तुझी रीत ! बिचारा ब्राह्मण—आधींच पुत्रशोकानं खचलेला—त्याचं तळीचं पाणी बंद केलंस म्हणजे काय ? "

वृन्दावन म्हणाला, " पाणी बंद केलं नाहीं. घाणेरडे कपडे तळीवर धुऊं नका म्हणून मी सांगितलं. "

" हें बरं केलं नाहींस बाबा. बरं बरं. तुझा मान राखण्यासाठीं मी त्याला सागतों, कीं तळ्याच्या पाळीवर कपडे धुऊ नकोस—जरा दूर जाऊन धू. "

वृन्दावन म्हणाला, " साऱ्या गांवाला एवढाच काय तो पाण्याचा आधार आहे. या सांथीच्या दिवसांत मी तें पाणी खराब होऊ देणार नाहीं. "

बुड्ढक घोषाल महाशय रागाला येऊन म्हणाले, " हा तुझा हट्ट बरा नव्हे वृंदावन. शास्त्रोक्त रीतीनं प्रतिष्ठा केलेल्या पुष्करणीचं पाणी केव्हांही अपवित्र किंवा कष्टषित व्हायचं नाहीं. इंग्रजी पुस्तकाचीं चारदोन पानं उलटून शास्त्रावर अविश्वास दाखवून असं कसं चालेल बाबा ? "

तीच तीच गोष्ट पुन्हां पुन्हां सांगतां सांगतां वृंदावन थकून गेला होता. तो चिरडीला येऊन म्हणाला, " मी सारीं शास्त्रं मानतों पण आपलीं जीं हीं शास्त्रं जगावेगळीं आहेत तीं मी मानीत नाहीं. माझं ऐकलं पाहिजे तुम्हीं. त्या पाण्यांत मी कपडे धुऊं द्यायचा नाहीं. खरं पाहिलं तर सांथीच्या रोग्याचे कपडे जाळून टाकायला हवेत—पण ज्याअर्थी या कपड्याचा मोह तुम्हांला सोडतां येत नाहीं

त्याअर्थी शेतांतल्या विहिरीवर जाऊन कपडे धुऊन आणा. इथं धुवायला बंदी आहे !" असें म्हणून तो एकदम आंत निघून गेला.

सर्वशास्त्रज्ञ घोषाळ महाशय 'वृंदावनचा सत्यानाश होवो' असें म्हणत म्हणत निघून गेले.

पण हें प्रकरण एवढ्यावरच संपणार नाहीं याची वृंदावनला जाणीव होती म्हणून त्यानें तळीवर पहारा ठेवण्यासाठीं एका माणसाची योजना केली. तारिणी मुखर्जी त्याच पाण्यांत कपडे धुतो आहे, नको म्हटलें तरी ऐकत नाहीं, असें रात्रीं नऊ वाजण्याच्या सुमाराला त्या माणसानें येऊन सांगितलें.

वृंदावन धांवतच तिकडे गेला. पाहातो तों, तारिणीची विधवा मुलगी बिछान्यावरच्या चादरी, उशीचे अभ्रे वगैरे लहान मोठे कपडे पाण्यांत बुचकळून वर आणून धूत आहे आणि तारिणी स्वतः तिथे उभा आहे.

# १२

दुसऱ्या दिवशीं सकाळीं आईच्या सांगण्यावरून वृंदावननें चरणला जवळ बोलावलें आणि म्हटलें, " आपल्या आईकडे जातोस का रे चरण ?"

चरण नाचूं लागला आणि म्हणाला, " जातों बाबा."

वृंदावनला मनांतल्या मनांत थोडेंसें वाईट वाटलें. तो म्हणाला, " पण तिथं तुला फार दिवस रहावं लागेल. राहशील का एकटा माझ्याशिवाय ?"

चरण एकदम म्हणाला, " हो. राहीन तर."

खरें पाहिलें तर इकडे त्याला जें बंधन झालें होतें त्यामुळें त्याच्या बाल-मनाला इथें राहणें कठीण होऊन बसलें होतें. त्याला बाहेर कुठें धावपळ करतां येत नसे, शाळा बंद होती, सवंगड्यांचें तोंडसुद्धां दिसत नव्हतें, रात्रं-दिवस बहुतेक सारा वेळ घरांत कोंडून पडावें लागे. चोहोंबाजूंनीं अशा प्रकारें भीतीचें वातावरण कां निर्माण झालें आहे याचें प्रत्यक्ष कारण जरी त्याला कळत नव्हतें, तरीही तो आंतल्या आंत चुरडून मेल्यासारखा झाला होता.

इकडे आईकडे सारा लडिवाळपणा, सारा मोकळेपणा, स्नान भोजन खेळणें वगैरे बाबतींत कुठेंच बंधन नाहीं—हजार चुका केल्या तरी हंसतमुखानें

होणाऱ्या प्रेमळ दटावणीपेक्षां शिक्षा नाहीं, कुणाचाही रागरोष नाहीं, असें असल्यामुळें तो एकदम तिकडे जायला उतावीळ झाला.

" तर मग जा. " असें म्हणून वृंदावननें स्वतःच्या हातांनीं एका टिनच्या पेटींत त्याचे कपडे भरले आणि त्यांतच थोडेसे पैसे ठेवून देऊन त्याला गाडींत बसवलें. आसवांनीं भरलेल्या डोळयांनीं मुलाचा मुका घेऊन त्यानें ज्यावेळीं त्याच्या आईकडे त्याची पाठवणी केली त्यावेळीं एवढ्या सर्व संकटांत असतांनासुद्धां एक प्रकारें जीव खालीं पडल्यासारखें त्याला वाटलें. बरोबर पाठवलेल्या नोकराला मुलावर चांगली नजर ठेवण्याबद्दल ताकीद देऊन, रोज जरी नाहीं तरी एक दिवसाआड, त्याची खबर कळवायला सांगितलें. मनांतल्या मनांत तो म्हणत होता, पुन्हां भेट झाली नाहीं तरी पत्करलें पण यापुढें या सांथीच्या पंचक्रोशींतून दूर गेलेला बरा.

गाडी दिसत होती तोंपर्यंत तो सारखा पाहात राहिला होता. आंत येतांच त्याचें मन अस्वस्थ झालें. त्या दिवसाची हकिकत आठवून त्याला वाटलें,—कुसुमनें पुन्हा तसें कांहीं केलें तर ! तो आपल्याशींच म्हणाला, ' छे छे ! हें कांहीं बरोबर झाल नाहीं. असल्या हट्टी एककल्ली माणसाचा विश्वास देतां यायचा नाहीं. स्वत: मी बरोबर गेलों नाहीं तर उलटा समज करून घेऊन ती एकदम चिडीला जाईल. '

एक उपरणें अंगावर टाकून तो घाईघाईनें बाहेर निघाला आणि चालू झालेली गाडी गाठून आंत मुलाच्या शेजारीं येऊन बसला.

कुंजनाथच्या घरासमोर येऊन पोहोंचल्यावर घराची कळा पाहून वृंदावन आश्चर्यचकित झाला. घराभोंवतीं चोहींकडे कचरा सांठला होता–जसें कांहीं घरांत कित्येक दिवस कुणाची वस्ती नसावी. दार उघडेंच होतें. मुलाला घेऊन त्यानें आंत प्रवेश केला तेव्हां त्याला दिसून आलें, कीं आंत सुद्धां तशीच अवकळा होती.

बाहेरची हांक ऐकूं आल्यामुळें ' दादा ' म्हणून कुसुम बाहेर आली पण हे लोक आलेले पाहातांच रागानें तिचें मस्तक भणाणून उठलें आणि तशीच मागल्या पावलीं हटून ती आपल्या खोलींत गेली. पूर्वींप्रमाणें चरण मोठ्या उल्हासानें आरडाओरडा करीत जाऊन तिला बिलगला. त्याला कडेवर घेऊन रीतसर माथ्यावरचा पदर पुढें ओढून चारपांच मिनिटांनीं ती बाहेर येऊन उभी राहिली.

वृंदावननें विचारलें, " कुंजदादा कुठं आहे ? "

" कुठं गेला आहे कुणाला ठाऊक ? असेल कुठंतरी भटकत ! "

वृंदावन म्हणाला, " घर पाह्यलं तेव्हां वाटलं, कीं जशी कांहीं आग लागली असावी ! तुम्हीं कुणी नव्हतां का इथं ? "

" नाहीं. "

" कुठं गेलां होतां ? "

महिन्याभऱ्यापूर्वी दादाच्या सासूबरोबर कुसुम पश्चिमेकडे तीर्थयात्रेला गेली होती. कालच संध्याकाळीं ती परत आली होती.

ती हकिकत न सांगतां नुसत्या खवचटपणानें ती म्हणाली, " गेलें होतें अशीच इकडे तिकडे हजार ठिकाणीं. "

आजपर्यंत तो आला म्हणजे कुसुम आधीं त्याला बसायला आसन देत असे. यावेळीं तें दिलें नाहीं म्हणून वृंदावन म्हणाला, " उभा राहिलोंय— बसायला दे ना कांहींतरी ! "

तितक्याच बेमुर्वतपणें कुसुम म्हणाली, " चटया आसनं कुठं पडलींयत कोण जाणे ! " असें म्हणून ती तशीच उभी राहिली. एक पाऊलसुद्धां हाललो नाहीं.

असें काहीं तरी होईल असा अंदाज होता तरीही तिचें हें बेमुर्वतखोर वर्तन त्याच्या अंतरंगाला जाणवलें. त्या दिवशीं मनावरचा ताबा सुटल्यामुळें भांडणाचा प्रसंग आला होता—त्यामुळें आपल्याला एक प्रकारचा कमीपणा आला होता याची त्याला आठवण होती. म्हणून कांहीं वेळ थांबून नंतर त्यानें अत्यंत शांतपणें विचारलें, " मी फार वेळ त्रास देत नाहीं तुला. ज्यासाठीं आलों आहें तें एकदां सांगून टाकतों. आमच्या तिकडे आजार सुरू झाला आहे तेव्हां चरणला तुझ्याकडे ठेवून जावं म्हणतों. "

बरेच दिवसपर्यंत कुसुम या भागांत नव्हती त्यामुळें ' आजार ' शब्दाचा अर्थ तिला कळला नाहीं. एकदम रागाला येऊन ती तिडकून म्हणाली, " अस्सं ! म्हणून ही दया झाली वाटतं ? पण हे आजार नाहींत कुठं ? परक्याच्या मुलाचं जोखीम कुणाच्या जोरावर घेऊं मी ? "

वृंदावन शांतपणें म्हणाला, " मी ज्या जोरावर घेईन त्याच जोरावर ! शिवाय असं पहा, सर्वांपेक्षां त्याला तुझा लळा जास्त आहे. "

कुसुम कांहीं तरी उत्तर देणार होती, तोंच चरणनें तिचें तोंड ओढून आपल्या तोंडाशीं घेतलें आणि म्हटलें, " बाबांनीं सांगितलंय मला इथं तुझ्याकडे राह्यला—आतां आंघोळीला जायचं ना आई ? "

वृंदावनला सुनावण्यासाठीं कुसुमनें उत्तर दिलें, " आतां माझ्याकडे राह्यचं नाहीं चरण. तुझी नवी आई आली कीं रहा तिच्याकडे. "

वृंदावनचा चेहरा उतरला. तरीही उगीच थोडेंसें हंसून तो म्हणाला, " तें सुद्धां कळलं वाटतं ! मग ऐक तर ! घरीं आई एकटी—आतां घरकाम झेपत नाहीं तिला—तेव्हां तें बोलणं निघालं होतं. आतां तें थांबलंय. "

" कां थांबलं ? "

" तसंच कांहीं कारण आहे त्याला—पण कशाला हव्या त्या गोष्टी ? चल रे चरण, आपण जाऊं—उशीर होतोय. "

काकुळतीला येऊन चरण म्हणाला, " मी उद्यां येईन बाबा. "

वृंदावन उगीच राहिला. कांहीं न बोलतां कुसुमनें चरणला कडेवरून खालीं उतरलें. एक दोन मिनिटें वाट पाहून गंभीरपणें मुलाला हांक मारून तो म्हणाला, " चल रे, आतां वेळ लावूं नकोस. ये चल ! " असें म्हणून तो हळूहळू बाहेर गेला.

चरण सर्वांचा लाडका होता तरीही त्याला वडील माणसांचा हुकूम पाळायची संवय होती—तरीसुद्धां तो आपल्या आईच्या तोंडाकडे केविलवाण्या नजरेनें कांहीं वेळ पाहत राहिला होता. ती कांहींच बोलत नाहीं असें पाहून ओशाळल्या मुद्रेनें बापाच्या मागोमाग तो बाहेर जाऊन उभा राहिला.

गाडीचे बैल घेऊन गाडीवाला पाण्यावर गेला होता, त्याची वाट पाहत बापलेक रस्त्यावर उभे राहिले होते. तें पाहून कुसुम बाहेर आली आणि बंद असलेल्या सदर दरवाजाच्या फटींतून नवऱ्याकडे पाहूं लागली तेव्हां तिला एकदम धक्का बसला. तो त्याचा पूर्वीचा रुबाब आतां राहिला नव्हता. डोळे खोल गेले होते, गाल बसले होते, चेहरा फिक्कट झाला होता. मन अनावर झाल्यामुळें तशीच आडोशाला राहून ती म्हणाली, " थोडं सांगायचं आहे. "

वृंदावन जवळ आला आणि म्हणाला, " काय ? "

" आजारी होतां का अलीकडे ? "

" नाहीं. "

" मग असे वाळलेले कां दिसतां ? "

" तें कसं सांगूं मी ? काळजीमुळं वाळल्यासारखा दिसतोंय वाटतं. "

काळजीमुळें वाळलेल्या नवऱ्याच्या चेहऱ्याकडे पाहिल्याबरोबर कुसुमच्या रागाचा जोर ओसरला होता. पण या शेवटच्या उद्गारामुळें तिला पुन्हां चीड आली. खवचटपणानें ती म्हणाली, " सोळा आणे सुखाचा संसार तुमचा—काळजी कसली आली आहे ?—सांगा ना. "

वृंदावननें त्या प्रश्नाचें उत्तर दिलें नाहीं. गाडी आल्याबरोबर चरण गाडींत चढणार होता असें पाहून वृंदावन म्हणाला, " आपल्या आईला नमस्कार करून नाहीं आलास का रे ? "

तो गाडींतून खालीं उतरला. रस्त्यांत तिथेंच खालीं मान वांकवून त्यानें नमस्कार केला. त्याला धरण्यासाठीं कुसुम घाईघाईनें हात पुढें करायला गेली तोंच तो पळून गेला. झालेल्या साऱ्या प्रकाराचा अंदाज जरी पूर्णपणें आला नाहीं तरी त्याला एवढें कळून चुकलें, कीं पूर्वीप्रमाणें आपल्या आईनें आपलें कौतुक केलें नाहीं—राहायला आला असतांही राहून घेतलें नाहीं.

वृंदावन आणखी थोडा जवळ सरकला आणि अगदीं हलक्या आवाजानें म्हणाला, " कोण जाणे पुन्हा बोलायचा योग येईल कीं नाहीं तें—म्हणून आजच बोलून टाकतोंय ! संतापाच्या भरांत आज तूं आपल्या चरणला आसरा दिला नाहींस—माझ्या पाठीमागें तरी दे म्हणजे झालं. "

अस्वस्थ होऊन कुसुम म्हणाली, " असलं कांहीं बोलूं नका माझ्यासमोर. "

" तर मग ऐक—आज त्याला तुझ्या हातीं सोंपवून द्यायला आलों होतों—"

" तेवढा विश्वास आहे का माझ्यावर ? "

वृंदावनचे डोळे भरून आले. तो म्हणाला, " रागाच्या भरांत बोलतेयस ! मी समजत होतों कुसुम, कीं तूं चांगली शिकली सवरली आहेस—पण बायकोच्या जन्माला येऊन जें शिकायचं—दुसऱ्याचे अपराध पोटीं घालायला शिकायचं—तेंच शिकली नाहींस. तूं चरणची आई असं मी समजत होतों. मुलाला आपल्या आईबापांच्या हातीं सोपवायचा नाहीं तर दुसऱ्या कुणाच्या ? "

या प्रश्नाचें उत्तर कुसुमला सुचेना.

गाडीचे बैल घरीं जायला उतावीळ झाले होते. चरणनें हांक मारली, " या ना लवकर बाबा. "

कुसुमच्या तोंडचें उत्तर यायच्या पूर्वी ' येतों ' असें म्हणून तो जाऊन गाडींत बसला.

कुसुम तिथेंच मट्कन खालीं बसली. रागानें तिचा जीव सळसळत होता. आपल्या परलोकवासी आईला उद्देशून ती उद्गारली, ' आई असून सुद्धां पोटच्या पोरीचं काय हें भयंकर वैर साधलंस आई ! माझ्या अजाणपणीं खरोखरच जर मला चिखलांत लोटून दिलं होतंस—स्वतःच्या खोट्या अभिमानाच्या पायीं खरोखरच जर मला बळी दिलं होतंस—तर तसं मला उघड उघड कां सांगून गेली नाहींस ? त्या साऱ्या प्रकाराचा मागमूस कुणाच्या भीतीनं असा पुसून टाकलास ? माझा हृदयांतला ईश्वर सांगतोय, हा माझा नवरा, हा माझा मुलगा—पण साऱ्या जगाच्या समोर ही गोष्ट सप्रमाण शाबीत करायचा तिळभरसुद्धां पुरावा कां ठेवून गेली नाहींस ? तसं असतं, तर काय त्याची छाती होती मला टाकून द्यायची ? कुठल्या निर्लज्ज नवऱ्यानं आपल्या लग्नाच्या बायकोला लोटांगणं घालीत भिकाऱ्यासारखं दारीं यायला सांगायचं धाडस केलं असतं ? पण खरोखरच जर मी विधवा झालें होतें तर निश्चितपणें तसं कां कुणी सांगितलं नाहीं ? तसं असतं, तर रूपाच्या लोभानं विधवेच्या समोर विधवाविवाहाची गोष्ट काढायचं साहस कसं कुणाला झालं असतं ? "

एकाच जागीं एकाच भावनेनें बसून ती किती तरी वेळ रडत होती. शेवटीं आकाशाकडे पाहून हात जोडून ती म्हणाली, " देवा, कुठला का असेना, पण मला कांहीं तरी मार्ग दाखीव. एक चांगली वर मान करून छाती पुढं काढून मला नवऱ्याघरीं जाऊं दे, नाहीं तर बाळपणच्या त्या निश्चित आणि निर्विघ्न अशा अज्ञानावस्थेंत तरी जाऊं दे,—म्हणजे माझा जीव एकदांचा खालीं पडेल ! "

## १३

त्या दिवशीं दादाच्या तोंडून जेव्हां तिला कळलें, कीं आपला नवरा पुनः लग्न करतो आहे, त्या वेळीं कुठें जाऊं, काय करूं, असें तिला झालें होतें.

अशा वेळीं दादाच्या सासूनें तीर्थयात्रेला जायची गोष्ट काढतांच ती बिन-तक्रार जायला तयार झाली. कुंजनाथच्या सासूनें कुसुमला बरोबर नेलें तें एकाद्या दासी मोलकरणीच्या नात्यानें—आणि नेल्यावर तिनें वागवलेंही तसेंच. पण असल्या क्षुल्लक बाबतींकडे लक्ष द्यायचें सामर्थ्य कुसुमला नव्हतें.

तीर्थयात्रा करून नळडांग्याला परत आल्यावर ज्यावेळीं तिनें घरीं जाण्याची इच्छा प्रदर्शित केली त्यावेळीं सापासारखा फूत्कार करून ती म्हणाली, " वेड्यासारखं कांहीं बोलूं नकोस बेटा. आमच्यासारख्या मोठ्या माणसांना पदोपदीं शत्रू फार. तूं . ही अशी वाढाळ मुलगी, तिथं एकटी राहणार,—जातींत तोंड दाखवायला जागा राहायची नाहीं आम्हाला—"

त्यावेळींही कुसुमनें कांहीं विरोध दर्शवला नाहीं.

थोड्या वेळानें ती म्हणाली, "—वाटलं तर दादाबरोबर जा. घरादारावर एकदां नजर टाकून त्याच्याच बरोबर परत ये. तिथं तुला एकटं राहतां यायचं नाहीं—सागून ठेवतेंय ! "

या तिच्या प्रस्तावाला संमति देऊन काल संध्याकाळीं घरादारावर नजर टाकण्यासाठीं कुसुम आली होती. आज चरण वगैरे निघून गेल्यानंतर एक दोन घटकांनीं कुंजनाथ जमीदाराच्या रुबाबांत सारा गांव पालथा घालून आला. स्नान भोजन करून झोंप काढली आणि दिवस मावळायला आला तेव्हां बहिणीला घेऊन सासुरवाडीला निघायच्या तयारीला लागला.

घरादाराला कड्याकुलपें लावून कुसुम मुकाट्यानें येऊन गाडींत बसली. त्या लोकांबद्दल दादाचें मन चांगलेंसें नव्हतें हें माहित असल्यामुळें सकाळीं घडलेली हकिकत तिनें त्याला सांगितली नाहीं.

कुंजनाथच्या बायकोचें नांव व्रजेश्वरी असें होतें. ती जितकी तोंडाळ होती तितकीच भांडकुदळ होती. अजून तिला पुरतीं पंधरा वर्षेंसुद्धां झालीं नव्हतीं तरीही भाषेच्या कडवटपणांत आणि शब्दांच्या मारफेकींत तिनें आपल्या आईलासुद्धां हार घेऊन दोन टिपें गाळायला लावलें असतें.

कां कोण जाणे, असल्या या व्रजेश्वरीला देखील पहिल्या भेटीपासून कुसुम-बद्दल लोभ वाटूं लागला होता. तिच्या आईला कांहीं तें पटत नव्हतें. म्हणूनच ती कुसुमला वेळीं अवेळीं चार करडे बोल सुनावीत असे ते मुलीच्या नजरेआड.

घराच्या समोरच तलाव होता. तीनचार दिवसांनंतर एके दिवशीं सकाळीं कुसुम कांहीं कपडे घेऊन तिकडे धुवायला जायला निघाली होती. व्रजेश्वरी आंतून बाहेर आली आणि तिला खडसावून म्हणाली, " काय हो वन्सं, आईनं किती पगार ठरवून इथं आणलंय तुम्हाला हो ? "

कोठीच्या समोर बसून तिची आई कांहीं काम करीत होती. मुलीनें केलेला हा कुजकट प्रश्न ऐकून ती आश्चर्यचकित झाली आणि रागारागानें ओरडून म्हणाली, " हें तुझं काय बोलणं ग ? आपल्या माणसांना कोण काय पगार ठरवून घरीं आणतात ? "

मुलीनें उत्तर दिलं, " ती आपली असली तर माझी—माझी नणंद ! तुझी ही कोण ? दुःखी माणसाला घरीं बोलावून मोलकरणीचं काम करायला लावायचं अन् पगार द्यायचा नाहीं ? "

उत्तर द्यायच्या ऐवजीं आई रागारागानें उठली आणि कुसुमच्या हातचे कपडे काढून घेऊन स्वतःच तळ्याकडे जायला निघाली.

कुसुम बिचारी टकमक पहात राहिली. तिच्याकडे पाहून व्रजेश्वरी गालांतल्या गालांत हंसून म्हणाली, " जाऊं दे तिला ! " असें म्हणून ती घरांत निघून गेली,

यानंतर दोन तीन दिवसांनीं कुसुमला उद्देशून तिनें बरीच आरडाओरड केली—पण एके दिवशीं अकस्मात् तिच्या वर्तनांत अचानक बदल झालेला पाहून व्रजेश्वरी आश्चर्यचकित झाली.

प्रकृति बरी नाहीं म्हणून काल रात्रीं कुसुम जेवली नव्हती. आज सकाळींच स्नान पूजा आटोपल्यावर सासुबाई कुसुमला कांहीं तरी खाऊन घेण्याचा सारखा आग्रह करूं लागली.

व्रजेश्वरी तिच्याजवळ येऊन हळूच म्हणाली, " आईचा असा हा मोर्चा कां बदलला हाच मला प्रश्न पडलाय वन्सं ! "

कुसुम कांहींच बोलली नाहीं. मुलगी आपल्या आईला चांगली ओळखत होती—म्हणूनच दोन दिवसांत तिच्या वृत्तींत झालेला हा अचानक फरक पाहून ती मनांतल्या मनांत भडकून उठली.

कुंजनाथच्या सासूचा गोवर्धन नांवाचा एक भाचा होता. गांजा माजूम आणि ताडी पिण्यांत तो निष्णात होता. या त्याच्या व्यसनांमुळें त्याचा चेहरा

असा बनून गेला होता ,कीं त्याचें वय पस्तीस आहे कीं पासष्ट आहे हें कुणालाही सांगतां आलें नसतें. त्याला आपली मुलगी द्यायला कुणीच तयार होत नव्हता म्हणूनच तो अजून अविवाहित होता. पूर्वी तो या बाजूला क्वचितच येत असे पण सध्यां काय कारण झालें होतें कोण जाणे, त्याचा मावशीचा प्रेमाचा उमाळा एकदम वाढला होता. जेव्हां तेव्हां तो 'मावशी मावशी' म्हणत तिच्याभोंवतीं हिंडत असे. तासाचे तास बसून तिच्याबरोबर गोष्टी करीत असे आणि तिच्या तोंडचे चार बोधाचे शब्दही ऐकून घेत असे.

आज दुपारीं कुसुमला घेऊन व्रजेश्वरी आंग धुण्यासाठीं तळयावर गेली होती. पाण्यांत उतरल्यावेळीं तिची नजर घाटावर असलेल्या एक कळंबाच्या झाडाकडे गेली. त्या झाडाआड उभा राहून गोवर्धन सारखा टक लावून पहात होता.

त्यावेळीं ती कांहीं बोलली नाहीं. कसेंबसें आंगधुणें उरकून ती घरीं आली. पहाते तों, ओटीवर उभा राहून तो मावशीबरोबर कानगोष्टी करीत होता. कुसुमनें डोक्यावरून आंगभर लपेटून पदर घेतला आणि त्याची नजर चुकवून घाईघाईनें ती आंत निघून गेली. व्रजेश्वरी मात्र त्याच्याजवळ जाऊन म्हणाली, "कसं काय गोवर्धनदादा, या पूर्वी तुम्ही इकडे मुळींसुद्धां फिरकत नव्हतां. आजकाल एकदम कां हा प्रेमाचा उमाळा आलाय तुम्हाला ? या घरीं येणं जाणं जरा कमी केलंत तरी चालेल."

झाडाआड असलेल्या गोवर्धनला तिनें पाहिल्याची त्याला जाणीव नव्हती, म्हणूनच तिच्या या प्रश्नामुळें तो बराच अस्वस्थ झाला—पण तिच्या प्रश्नाचें त्यानें उत्तर दिलें नाहीं.

पण तिची आई मात्र एकदम भडकून उठली आणि डोळे गरगर फिरवीत म्हणाली, "या पूर्वी त्याला नव्हतं वाटत यावंसं—म्हणून नव्हता येत, आतां वाटूं लागलंय म्हणून येतोय—त्याचं तुला काय होय ?"

मुलगी रागावली नाहीं. अगदीं स्वाभाविकपणें म्हणाली, "हें वाटणंच पसंत नाहीं मला. माझ्यापुरतं बोलत नाहीं मी आई, पण इथं माझी नणंद आहे, ती परक्याची मुलगी आहे, तें तर ध्यानांत आहे ना तुझ्या ?"

सत्समांत आवाज चढवून आई म्हणाली, "परक्याच्या पोरीसाठीं काय मी माझ्या पुतण्याभाच्यांना दूर करूं ?—घरीं येणंजाणं बंद करूं ? अन् ही परक्याची

मुलगी तरी अगदीं पडद्यांतली बिबीच आहे कीं नाहीं! कधीं कुणासमोर आली नव्हती वाटतं ? काय सांगू ग, हिचा हिंडण्याफिरण्याचा डौल बघितला, कीं माझ्यासारख्या म्हाताऱ्या बाईलासुद्धां मान खालीं घालावीशी वाटेल. ”

आईच्या बोलण्यांतलें इंगित काय होतें त्याची कल्पना आल्यामुळें व्रजेश्वरीनें माघार घेऊन बोलणें थाबवलें. दोन दिवसांपूर्वी कुसुमबद्दलच्या ज्या गोष्टी ज्या प्रकारें, ज्या उद्देशानें, ज्या अर्थानें झाल्या होत्या त्याची तिला आठवण आली. त्यावेळीं तिचें बोलणें वेगळें होतें. यावेळीं त्या बोलण्याचें स्वरूप पूर्णपणें बदलून गेलें होतें. त्यावेळीं कुसुमवर तिचा राग होता, आतां तिला मायेचा उमाळा आला होता. देवाची तशीच दया झाल्याशिवाय असला प्रेमाचा उमाळा सहजासहजीं येणें कांहीं सोपें नव्हतें.

व्रजेश्वरी आंत जायला निघाली. जातांना गोवर्धनकडे करडी नजर फेकून ती म्हणाली, “ मोठी शरमेची गोष्ट आहे गोवर्धनदादा,—तोंड उघडून बोलतां येत नाहीं—पण मी पाहिलं बरं तुला ! दादाच्या नात्यानं यायचं असलं तर ये—नाहीं तर तुझ्या कपाळीं भयंकर संकट आहे बरं !—त्या संकटांतून तुला सोडवायला आईलासुद्धां कठीण जाईल, हें सांगून ठेवतेंय तुला ! ” असें म्हणून ती आंत निघून गेली.

आई म्हणाली, “ काय झालं रे गोवर्धन ? ”

तोंड वांकडें करून गोवर्धन म्हणाला, “ तुझी शपथ मावशी, मला कांहीं सुद्धां माहित नाहीं !—कोण साला होता झुडपांत—तुझी शपथ—दातवणासाठीं काड्या काढायला—हवं तर विचार त्या वाण्याला—माझ्याबरोबर ये म्हणावं तिकडे—मी पुरावा करीन ”—वगैरे वगैरे बोलत बोलत गोवर्धन तिथून सटकला.

कपडे बदलून व्रजेश्वरी कुसुमच्या खोलींत गेली. पाहते तों कुसुम तशीच ओलेत्यानें खिडकींत उभी राहून स्तब्धपणें बाहेर पाहत राहिली होती. तिची चाहूल लागतांच एकदम वळून ती भरल्या गळ्यानें म्हणाली, “ हें काय वहिनी ? कशाला उगीच माझी गोष्ट काढायला गेलीस ? इथं देखील मला टिकूं द्यायचं नाहीं का तुला ? ”

“ आधीं कपडे बदल. मग बोलतें. ” असें म्हणून तिनें बळेंबळेंच तिला कपडे बदलायला लावले आणि म्हटलें, “ असल्या गोष्टी मला अगदीं सहन

होत नाहींत वन्सं—मग त्या तुमच्याबद्दल असोत वा माझ्याबद्दल असोत—त्या दळभद्र्याला मी कांहीं या घरांत पाऊल टाकूं द्यायची नाहीं. त्याचा मतलब मला कळून चुकलाय—" आईचें भाषण काय झालें तें सांगायचें तिच्या जिवावर आलें.

रडकुंडीला येऊन कुसुम म्हणाली, " कुणाचा मतलब कांहींही असो वन्सं, तुझ्या पाया पडतें, माझी गोष्ट काढून मला उगीच संकटांत पाडूं नकोस."

" मी इथं उभी आहें तोंवर कुठलं संकट कसं येतं तें मी पहातें ! "

जोरजोरानें मान हलवीत कुसुम म्हणाली, " येईल ग बाई येईल ! अगदीं सरळ सरळ दिसतंय मला ! "—आपल्या कपाळावर हात मारून ती म्हणाली, " हें दळभद्रं कपाळ जिथं घेऊन जाईन तिथं संकट हें यायचच त्याच्याबरोबर. प्रत्यक्ष देवालासुद्धां संभाळतां यायचं नाहीं मला, असं वाटतंय मला ! " असें म्हणून ती रडूं लागली.

मोठ्या मायाळूपणानें व्रजेश्वरीनें तिला जवळ घेतलें आणि तिचे डोळे पुसून म्हटलें, " तूं म्हणतेस तें अगदींच कांहीं खोटं नाहीं. रागावूं नकोस—पण नुसता नशिबाला दोष देऊन काय होणार ? तुझा स्वतःचा दोष कांहीं कमी नाहीं वन्सं."

तिच्या तोंडाकडे निरखून पाहून कुसुमनें विचारलें, " कसला माझा स्वतःचा दोष ? माझ्या बाळपणची हकीकत ऐकली आहेस ना तूं ? "

" ऐकलीय—पण इथूनतिथून ती खोटी आहे अगदीं. तुला सारं कांहीं माहित आहे—अहेव बायको तूं—कुंकू लावीत नाहींस—हातीं बांगड्या घालीत नाहींस—नवऱ्या घरीं जात नाहींस—हा दोष नशिबाचा कीं तुझा स्वतःचा ? तेव्हां कांहीं कळत नव्हतं—आतां तरी कळतंय ना ? तूंच सांग, कुठली सवाष्ण कधीं रागारागानं मुद्दाम विधवेसारखी राहिल का ? "

" सारं कांहीं माहित आहे मला वैनी. नुसतं कुंकू बांगड्या घातल्या म्हणजे कांहीं लोकाची खात्री पटायची नाहीं ! कोण माझा नवरा ? कोण आहे साक्ष त्याला ? त्यानं तरी मला उगीचच्या उगीच कां घ्यावं आपल्या घरीं ? "

व्रजेश्वरी आश्चर्यानें थक्क होऊन म्हणाली, " हें काय बोलतेस वन्सं ? या गोष्टीला आणखी कांहीं पुरावे कशाला द्यायला हवेत ? तुला नाहीं का

कळलंय—या बाबतींत नन्द काकाच्या बरोबर केवढं भांडण झालंय या घरीं ?—" थोडा वेळ थांबून ती म्हणाली, "तुझ्या दादाला सारं कांहीं माहीत आहे. त्यानं सांगितलं नाहीं का तुला ? मला वाटलं, कीं सारं कांहीं कळून सवरून तूं आलीयस इथं. तुला राग येईल, वाईट वाटेल उगीच. म्हणून आजवर कांहीं बोलले नव्हतें—तोंड बंद करून राहिलें होतें. तसं पाहिलं, तर तूं आलीस त्यावेळीं उलट मला रागच आला होता."

उद्वेगानें अधीर होऊन कुसुम म्हणाली, "मी कांहीं सुद्धां ऐकलं नाहीं वैनी. काय झालंय सांग ना !"

एक मुस्कारा सोडून व्रजेश्वरी म्हणाली, "छान ! जसा भाऊ तशी बहीण. नन्द काकाच्या मुलीबरोबर लग्नाचं जेव्हां घाटत होतं त्यावेळीं तुम्हीं गेलां होतां यात्रेला. त्यावेळीं तुझ्या दादानं केवढं अकांडतांडव केलं—अन् शेवटीं तोच तोंड मिटून स्वस्थ बसला ! माझ्या सासूबद्दल, तुझ्याबद्दल, त्याच्याबद्दल साऱ्या काहीं गोष्टी निघाल्या होत्या. ती सोयरीक मोडेल म्हणून नंद काकानीं सारं कांहीं नाकबूल केलं. त्यानंतर ठाकुरवाडीच्या बड्या बाबाजींना बोलावून आणलं. त्यांनीं निकाल दिला, कीं सारं कांहीं खोटं ! त्यांना कळवल्याशिवाय, त्यांची संमति घेतल्याशिवाय, आपल्या जातींत कुणालाही कुठलं कार्य करतां येत नाहीं. म्हणूनच त्यांनीं नंद काकाला बजावलं, कीं कुणी कुठं तें लग्न लावलं होतं त्याला आणून हजर करा म्हणून. शेवटीं त्यातून निघालं तें एवढंच, कीं कंठीबदल करायची गोष्ट नुसती निघाली होती -- तसं कांहीं झालं नव्हतं."

शंकेचा निश्वास आवरून धरून कुसुम म्हणाली, "झालं नाहीं ? मला ती खात्री होती वहिनी—मग माझ्याबद्दल एवढ्या कंड्या कां पिकवल्या ?"

व्रजेश्वरी हंसून म्हणाली, "तुझ्या दादाचं डोकं थोडं हलकं आहे कीं नाहीं —दुसरा कुणी असता तर त्यानं लोकलाज म्हणून तरी असा आरडा ओरडा होऊं दिला नसता—पण त्याला त्याचं कांहींच नाहीं म्हणूनच चहुंबाजुनीं तो उठाठेव करूं लागला. म्हणूं लागला, माझ्या बहिणीचा त्यांत कांहीं दोष नाहीं. आईनं ज्या अर्थी खरोखरच कंठीबदल करायला लावली नाहीं, तर मग जांवईबुवानीं तरी तिला घरीं का नांदवूं नये ? कां पुन्हां लग्न करावें ? अन् नंदकाकानीं तरी त्याला कां आपली मुलगी द्यायला तयार व्हावं ?"

शरमेनें शहारून कुसुम म्हणाली, " छे छे ! पुढं काय झालं ? "

व्रजेश्वरी म्हणाली. " पुढं विशेष कांहीं झालं नाहीं. माझी सासू आणि नंदकाकाची आजी या एकाच गांवच्या. रागानं म्हण कीं लाजेनं म्हण, दुःख झालं होतं तरी अभिमानानं तुला घेऊन ती घरीं राहिली होती. तिला-सुद्धां त्या मुलाबरोबर ही चर्चा करतां आली असती—पण तसं कांहीं झालं नाहीं. बरं वन्सं, जांवईबुवांना ही सारी हकीकत कळलीय ना ? मग त्यांनीं कांहींतरी करून तुला नाहीं का कांहीं सुचवलं ? मी ऐकलं होतं पूर्वी, कीं ते त्यावेळीं तुझ्यासाठीं—"

कुसुम मान वळवून म्हणाली, " वहिनी, कदाचित तेवढ्या साठींच त्या दिवशीं ते आले असतील ! "

व्रजेश्वरी आश्चर्यचकित होऊन म्हणाली, " कोणत्या दिवशीं ? अलिकडे आले होते ? "

" हो. ज्या दिवशीं आम्हीं इथं आलों त्याच दिवशीं सकाळीं. "

" मग काय झालं ? "

" माझीच चूक झाली. ते न बोलतां परत गेले. "

व्रजेश्वरी गालांतल्या गालांत हंसून म्हणाली, " काय असं केलंस ? घरांतच येऊं दिलं नाहींस कीं ते आले तेव्हां बोलली नाहींस ? "

कुसुमनें उत्तर दिलें नाहीं. एक मोठा सुस्कारा सोडून ती खालीं मान घालून बसून राहिली.

व्रजेश्वरीनें यावर तिला कांहीं विचारलें नाहीं.

काळोख दाट होत येत होता. चोहीकडून शंखाचा शब्द ऐकूं येतांच ती दचकून उभी राहिली आणि म्हणाली, " तूं जरा इथंच बैस. मी देवाजवळ दिवा लावून येतें. " असें म्हणून ती निघून गेली.

कांहीं वेळानें ती परत आली त्यावेळीं कुसुम तिथेंच जमिनीवर पडून फुलून फुलून रडत होती. कोनाड्यांत दिवा ठेवून ती कुसुमजवळ येऊन बसली आणि तिच्या माथ्यावर हात ठेवून कांहीं वेळ विचार करून म्हणाली, " खरोखरच हें बरं केलं नाहींस वन्सं ! काय केलंस तें मला नक्की माहित नाहीं खरं—पण तो कोण, तूं कोण, हें ज्याअर्थीं तुझ्या मनाला पटलं होतं, त्याअर्थीं त्याची संमति घेतल्याशिवाय इकडे आलीस हें कांहीं बरं केलं नाहींस ! "

कुसुमनें तर पाहिलें नाहीं. ती मुकाट्यानें ऐकत राहिली.

व्रजेश्वरी म्हणाली, " ही तुझी हकीकत मी तुझ्याच तोंडून ऐकलीय तेवढीच मला माहित आहे. तुझ्या परिस्थितींत मी असतें तर नुसती पायपीट करीतच कां—त्यांचा हुकूम झाला असता तर सारा रस्ताभर नाक घाशीत सुद्धां गेलें असतें. "

तशीच आडवी पडून कुसुम तोंडांतल्या तोंडांत पुटपुटली, " बोलणं सोपं आहे वहिनी, पण प्रसंगीं वागणं मोठं कठीण असतं. "

" मुळींच नाहीं. गेली असतीस तर नवरा लाभला असता, मुलगा लाभला असता, अन्नवस्त्र मिळालं असतं.—एवढं संभाळणं देखील बायकांच्या जातीला कठीण आहे का वन्सं ? तें मुद्धां कांहीं मिळालं नसतं तरी मी तिथून हाललें नसतें—मारून घालवलं असतं तरीसुद्धा आलें नसतें. तसं कोण कधीं उगीच कुणाच्या अंगावर हात कशाला टाकील ? मग भ्यायचं कशाला ? फार फार तर त्यांनीं म्हटलं असतं, चालती हो ! मीही म्हटलं असतं, तुम्हीच व्हा चालते ! बैठकच मारली तिथं मग काय करणार होतं कोण ? "

तिचें तें भाषण ऐकून त्या तसल्या मनस्थितीं सुद्धां कुसुमला हसूं आलें पण व्रजेश्वरी हंसली नाहीं. तिनें आपल्या मनांतली गोष्ट सांगून टाकली होती ती हंसवण्यासाठीं नव्हे, कीं सांत्वन करण्यासाठींही नव्हे.

थोडीशी गंभीर होऊन ती म्हणाली, " खरं सांगतें वन्सं, कुणी नको का म्हणेना— कुणाचं ऐकूं नका. तुम्ही सरळ त्याच्याकडे जा. असल्या संकटाच्या वेळीं मुलाला अन् नवऱ्याला एकटे राहूं देऊं नका. "

व्रजेश्वरीच्या भाषणांत एकदम असा फरक झालेला पाहून, सारें कांहीं विसरून कुसुम धडपडत उठून बसली आणि म्हणाली, " संकटं कसलीं ? "

व्रजेश्वरी म्हणाली, " संकटंच तर काय ! तशीं तीं सारीं खुशाल आहेत. पण बाडलगांवीं पटकीची साथ सुरू झाली आहे. आतांच तुझा दादा सांगत होता, साथ फार भयंकर वाढतेय. रोज दहा बारा माणसं मरताहेत — छे छे ! हें काय ? माझ्या पायला हात कां लावलेत वन्सं ? "

तिचे दोन्ही पाय घट्ट धरून कुसुम रडत रडत म्हणाली, " काय सांगूं वहिनी, ते चरणला घेऊन माझ्याकडे आले होते. मी त्याला ठेवून घेतलं नाहीं—मी त्यांचं ऐकून सुद्धां घेतलं नाहीं वहिनी—"

व्रजेश्वरी मधेंच म्हणाली, " आतां कळलं ना ? आतां अशीच जाऊन त्याला घेऊन ये. "

" कशी जाऊं ?—कोणत्या तोंडानं जाऊं ? "

व्रजेश्वरी यावर कांहीं बोलणार होती—तितक्यांत मागें कुणाची चाहुल लागली म्हणून तिनें वळून पाहिलें. दार उघडून तिची आई उंबरठ्याबाहेर उभी राहिली होती. नजरानजर होतांच ती खवचटपणानें म्हणाली, " नणंदा-भावजयांचं कसलं रहस्य चाललं होतं ? "

व्रजेश्वरी अगदीं स्वाभाविकपणें म्हणाली, " बरं झालं आलीस ती आई. आंत ये ना ! काहीं भ्यायला नको बरं. आपल्या माणसाला कधीं कुणी बदसल्ला देत नसतं —मीही द्यायची नाहीं. "

आधींपासूनच तिची आई आंतल्या आंत धुमसत होती, ती एकदम भडकून उठून म्हणाली, " म्हणजे मी लोकांना बदसल्ला देतें वाटतं ? ही काळतोंडी घरात शिरली तेव्हांच मला कळून चुकलंय, कीं ही हें घर कोसळून घालणार. कुंजनाथला ही डोळ्यांसमोर दिसायला देखील नकोशी झालीय ती या अशाच स्वभावामुळ ! "

मुलगी आईला तसेंच तेढें उत्तर देणार होती पण कुसुमनें चिमटा घेतल्यामुळें ती थांबली आणि म्हणाली, " तेवढ्यासाठींच सांगत होतें या काळतोंडीला—कीं जा आपल्या सासरीं आणि रहा तिथं. आमच्या इथं राहूं नकोस ! "

सासूरवाडीचें नाव निघताच, विड्यानें रंगलेलें तोंड आणि टिळेमुद्रांनीं सजलेलें नाक वाकडें करून आई म्हणाली, " अग पण कुठल्या सासुरवाडीला पाठवतेस तुझ्या वहिनीला ? नंद वैष्णव—"

व्रजेश्वरी एकदम चिडून मधेंच म्हणाली, " सारं कांहीं कळून संवरून वेड्याचं सोंग आणून उगीच माणसाचा अपमान करूं नकोस आई. आज नंद वैष्णवाचं नांव घे, उद्यां तुझ्या गोवर्धनच्या बापाचं नांव घे, असं करायला कुठल्या बायकोमाणसाच्या जातीला कांहीं दहावीस सासुरवाड्या असत नाहींत ! उगीच कुणी कस काहीं ऐकून घेईल ! "

प्रत्यक्ष मुलीनें कठोरपणानें असा फटका मारल्यामुळें सुरुंगाप्रमाणें भडकून ती किंचाळली, " अग दळभद्रे, तूं मुलगी ना माझी ? प्रत्यक्ष आईची बदनामी करतेस ? "

मुलगी म्हणाली, " कांहीं खोटंनाटं असतं तर उगी राहिलें असतें पण अगदीं खरं खरं आहे हें ! अगदीं शपथेवर सांगतें आई, तुझ्यासारख्या या चार बायकांच्या गुणांमुळं आपण महारमांग आहों असं म्हणावसं वाटूं लागतं— वैष्णव म्हणवून घ्यायला जिवावर येतं अगदीं. पुरे झालं ! आतां उगीच आरडाओरड करूं नकोस. नांव ठेवलं म्हणून वाईट वाटत असेल तुला, तर दे वहिनीला पाठवून बाडलगांवीं अन् मग पोटभर शिव्यागाळी द्यायच्या असतील मला तर दे त्या —पण तुला सांगून ठेवतें आई, आतां जास्ती बोलूं नकोस. "

मुलगी अशा प्रकारें चिडीला आल्यामुळें तिला वाटलें. अशाच रीतीनें ही लढाई पुढें चालू राहिली तर आपला पराजय होईल. म्हणून आवाज खालीं आणून ती म्हणाली, " तिला पाठवून द्याल तिकडे पण त्यांनीं घरीं घेतलं पाहिजे ना ? तुझ्यापेक्षां मला थोडं जास्त कळतं बरं व्रजेश्वरी !—आतां तीं हिचीं कुणी नव्हत. वृंदावनचा आणि कुसुमचा कांहीं सुद्धां लागाबांधा राहिलेला नाहीं ! उगीच खोटी आशा दाखवून तिला नाचवूं नकोस ! " असें म्हणून तिच्या प्रत्युत्तराची वाट न पहातां ती तणतणत निघून गेली.

उतरलेल्या मुद्रेनें कुसुमनें व्रजेश्वरीकडे केविलवाण्या नजरेनें पाहिलें, त्यावेळीं तिला धीर देऊन ती म्हणाली, " खोटी गोष्ट —साफ खोटी गोष्ट ! अगदीं जाणूनबुजून आई मुद्दाम खोटंनाटं बोलून गेली !— मी तिची मुलगीच कबुल करतें हें !—जरा थांब. मी जाऊन येतें—" असें म्हणून कांहींतरी नवीन कल्पना सुचल्यामुळें व्रजेश्वरी घाईघाईनें तिथून निघून गेली.

माणसाची अवस्था ठीक असली कीं बुद्धिही ठीक असते. याचा पडताळा कुंजनाथनें आणून दिला. बायको आणि बहिण या दोघींनींही काकुळतीला येऊन विनवलें तरीही तो आपल्या कर्तव्यापासून ढळला नाहीं. तो निश्चयपूर्वक म्हणाला, " तें होणं शक्य नाहीं. आईची परवानगी मिळाल्याशिवाय चरणला इथं आणणं शक्य नाहीं. "

व्रजेश्वरी म्हणाली, " निदान एकदां जाऊन त्यांची खबर तर घेऊन या."

भुवया वर चढवून कुंजनाथ म्हणाला, " अरे बापरे ! रोज दहा वीस माणसं मरताहेत कीं तिथं. "

" तर मग कुणाला तरी पाठवून त्यांची खबर घ्या ना. "

" हो. तसं कांहीं करतां येईल ? " असें म्हणून कुंजनाथ माणसाच्या शोधासाठीं बाहेर निघून गेला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं स्नान करून कुसुम सैंपाकघरांत जात होती तोंच पडवींत केर काढीत असलेली मोलकरीण म्हणाली, " आईनीं बंदी केली आहे ताईसाहेब, आज सैंपाकघरांत जायचं नाहीं तुम्ही. "

तिचें भाषण ऐकून कुसुमच्या हृदयांत धडकी भरली. तिथल्या तिथेंच थांबून तिनें भीत भीत विचारलें, " कां ? "

" तें मला माहीत नाहीं ! " असें म्हणून ती आपल्या कामाला लागली.

कुसुम येऊन आपल्या खोलींत बसली तरी कुणीच आलें नाहीं. एरवीं एवढ्या वेळांत व्रजेश्वरीच्या किती तरी खेपा व्हायच्या. पण आज तिचा मुळींच पत्ता नव्हता. बाहेर जाऊन एकदां तिनें कानोसा घेतला पण तिची भेट झाली नाहीं. कुसुम तिच्या आईच्या खोलींत केव्हांही जात नसे म्हणून ती तिथें लपून बसली होती. रोज दोघीही जोडीनें जेवायला बसत, आज ती वेळ देखील उलटून गेली.

कुसुम अत्यंत उद्विग्न झाली होती. तिच्या मनांत शंकेचें काहूर उठलें होतें. यापुढें वाट पाहणें अशक्य झाल्यामुळें ती पुन्हा एकदां व्रजेश्वरीच्या तपासासाठीं बाहेर आलेली पाहून कुंजनाथची सासू तिला आडवून म्हणाली, " आतां उशीर करण्यांत काय अर्थ आहे बेटा ? जा, एक बुडी मारून ये नि यावेळीं कसेबसे दोन घांस खाऊन घे. तुझा दादा गेला आहे ठाकुरवाडीला विचारायला. "

कशाला गेला म्हणून विचारण्यासाठीं कुसुमनें तोंड उघडलें पण कोरडी झालेली जीभ टाळ्याला चिकटल्यामुळें तिच्या तोंडून शब्द बाहेर आला नाहीं. तें पाहून कुंजनाथची सासू थोड्याशा लाघवी भाषेनें म्हणाली, " मुलाच्या बायकोला मुलाइतकंच सुतक पाळलं पाहिजे ना ? कांहीं झालं तरी बिचारी तशी लाभालोभाला मोठी चांगली होती. त्या दिवशीं व्रजेश्वरीचं लग्न ठरवायला आली तेव्हां किती किती बोलत होती—सहा दिवस झाले आज, वृंदावनची आई वारली ! व्हायचं तसं झालं. जिणं मरणं काय कुणाच्या हातीं आहे ? आतां महाप्रभूनं तेवढ्या त्या पोराला राखलं म्हणजे झालं ! काय बरं त्याचं नांव ? चरण ना ? अहाहा ! अगदीं राजबिंडा मुलगा ! आज सकाळीं दोन वेळां वांती जुलाब झाले त्याला !—"

कुसुमनें वर पाहिलें नाहीं, तोंडांतून शब्द काढला नाहीं. हळूहळू ती आपल्या खोलींत निघून गेली.

सुमारें तीन वाजले होते. व्रजेश्वरीनें या खोलींतून त्या खोलींत जाऊन पाहिलें तरी कुसुम कुठें सांपडली नाहीं असें पाहून तिनें मोलकरणीला विचारलें, " वहिनी कुठं दिसली का ग तुला ? "

" नाहीं ताईसाहेब, सकाळीं इथं होत्या त्या. "

पत्नीच्या रडण्याचा आवाज ऐकून कुंजनाथ अर्धवट झोपेंतून जागा झाला आणि उठून बसून म्हणाला, " म्हणतेस काय ? तर मग गेली कुठं ती ? "

व्रजेश्वरी रडत रडत म्हणाली, " कुणालाच माहीत नाहीं. घरदार, तलाव, बाग सगळीकडे शोधून पाहिलं. कुठंच थागपत्ता नाहीं तिचा. "

तिच्या डोळ्यांतलीं आसवें पाहून आणि त्याबरोबरच तिनें केलेल्या तलावाचा उल्लेख ऐकून कुंजनाथला रडें कोसळलें. त्याला वाटलें, आपल्या सासूचा छळ असह्य होऊन कुठें तरी जाऊन तिनें जीव दिला. तो घाईघाईनें बाहेर जाण्यासाठीं निघत होता त्यावेळीं त्याच्या सदऱ्याला हात घालून त्याला अडवून व्रजेश्वरी म्हणाली, " ऐका —असे जाऊं नका—"

" मला कांहीं ऐकायचं नाहीं ! " असें म्हणून सदरा तिच्या हातून सोडवून घेऊन कुंजनाथ वेड्यासारखा बाहेर निघाला.

दहा पंधरा मिनिटांनीं तो परत आला. बायकांसारखा मोठ्यानें हंबरडा फोडित रडत रडत त्यानें ओटीवर बसकण मारली. तो म्हणत होता, " माझ्या बहिणीला या माझ्या सासूनं मारून टाकलं, आतां मी इथं राहणार नाहीं. या घरांत पाऊल टाकणार नाहीं. अग कुसुम ग ! "

त्याच्या सासूला कांहींच माहीत नव्हतें. त्याच्या रडण्याचा आवाज ऐकून ती बाहेर आली आणि येतांच तांठरून उभी राहिली.

तिला पाहिल्याबरोबर कुंजनाथनें एकदम जमिनीवर आंग टाकलें आणि पुन्हा पुन्हा डोकें आपटीत तो म्हणूं लागला, " या राक्षसणीनं माझ्या छोट्या बहिणीला खाल्लं रे ! कशाला इथं मरायला आलों रे ! काय झाली ही माझी दशा ! "

व्रजेश्वरी जवळ येऊन त्याचा हात धरूं लागली तेव्हां तिला धक्का मारून लोटून तो म्हणाला, " दूर हो ! मला हातसुद्धा लावूं नकोस ! "

व्रजेश्वरीनें उठून बळेंबळेंच त्याला धरून पकडून आंत नेऊन म्हटलें, " नुसतं ओरडलं, डोकं फोडून घेतलं, म्हणजे कांहीं बहिण येत नाहीं परत ! मी सांगतें, ती कांहीं जीव द्यायची नाहीं."

कुंजनाथला तिचें म्हणणें पटलें नाहीं. तो तसाच रडत राहिला होता. नाना प्रकारचे क्लेश सोसून त्यानें तिला वाढवली होती. तिच्यावर जिवापलीकडे प्रेम केलें होतें. पूर्वी कितीतरी वेळ कुसुम रागारागानें तळ्यांत जीव द्यायची भीति घाली तें त्याला आठवलें. म्हणूनच या वेळीं त्याचें हृदय फाटून गेलें. कुठल्या तरी तळ्याविहिरींत आपल्या बहिणीचा देह तरंगत राहिला असेल अशी कल्पना तो करूं लागला.

मोठ्या प्रेमानें नवऱ्याचे डोळे पुसून व्रजेश्वरी म्हणाली, " आतां जरा शांत व्हा. मी खरोखरच सांगतें, तिनं जीव दिला नाहीं. "

आसवांनीं भरलेल्या डोळ्यांनीं कुंजनाथ तिच्याकडे वेड्यासारखा पाहत राहिला.

पुन्हा एकवेळ आपल्या पदरानें त्याचे डोळे चांगले पुसून घेऊन त्याची बायको म्हणाली, " वहिनी लपून छपून बाडलगांवीं गेलीय खास ! माझी अगदीं खात्री आहे. "

कुंजला तें पटलें नाहीं. तो म्हणाला, " नाहीं—नाहीं—तिथं ती मुळींच जायची नाहीं. चरणखेरीज दुसऱ्या कोणावर नजरसुद्धां टाकायची नाहीं ती. "

व्रजेश्वरी म्हणाली, " अगदीं चुकतांहां—डोंगराएवढा गैरसमज आहे हा तुमचा. माझं जसं प्रेम आहे तुमच्यावर, तसंच तिचं प्रेम आहे आपल्या नवऱ्यावर. तें कांहीं का असेना—चरणसाठीं तरी ती जाईल ना तिकडे ? "

" पण बाडलगांवचा रस्ता तिला कुठं माहीत आहे ? "

" तीच काळजी आहे मला. रस्ता चुकून कुठं भलतीकडे जाईल आणि मुक्काम वेळीं गांठायचा नाहीं. वाटेंत कांहीं तरी संकट आलं नाहीं म्हणजे झालं—नाहींतर बाडलगांव सात समुद्र आणि तेरा नद्यांच्या पलीकडे असता तरी तो हुडकून काढून आज ना उद्यां ती तिथ पोंचल्याशिवाय राहायची नाहीं. जरा माझं ऐका, तुम्ही त्याच रस्त्यानं जा. वाटेंत भेटली तर तिला बरोबर घेऊन तिच्या नवऱ्याच्या हातीं सुपूर्द करा अन् परत या. "

" चाललों ! " असें म्हणून कुंजनाथ उठून उभा राहिला.

आज त्याचे ते चकचकित विलायती बूट, रेशमी चादर आणि त्या बरोबरच येणारी छाती पुढें काढून चालायची रुबाबदार चाल सासुरवाडीलाच राहिली. त्या मेल्या कुशीच्या वियोगानें जमीदार कुंजनाथबाबू, फेरीवाल्या कुंज वैष्णवाच्या वेषांत, अनवाणी पायानें, उघड्या अंगानें, वेड्यासारखा धांवत धांवत चालता झाला.

## १४

वृंदावनची आई स्वर्गवासी होऊन सहा दिवस झाले होते. पूर्व सुकृतानें जो अधिकार मिळायचा तो तिच्या मृत्यूच्या नंतर त्यालाही मिळाला होता असें म्हणायला हरकत नव्हती.

त्या दिवशीं तारीणी मुखर्जीच्या दुर्वर्तनामुळें आणि घोषाळ महाशयाचें शास्त्रज्ञान ऐकल्यामुळें, तसेच त्याचे शिव्याशाप ऐकून जर्जर झाल्यामुळें, वृंदावननें गावांत लोखंडी नळाची नव्या पद्धतीची विहीर खोदून काढायचा संकल्प केला होता. अशा विहिरीचें पाणी कांहीं केल्या दूषित झालें नसतें आणि कोणत्याही प्रकारचे श्रम न करतां पाणी मिळूं शकल्यामुळें गांवच्या पाण्याची सोय झाली असती आणि त्याबरोबरच अशा या भयंकर सांथीच्या दिवसांत जलदोषापासून लोक मुक्त झाले असते.

अशा प्रकारची एक विहीर ( Tube well ) निर्माण करण्यासाठीं कलकत्याच्या एक प्रख्यात कंपनीकडे त्यानें पत्रव्यवहार सुरू केला. त्याची आई ज्या दिवशीं मृत्यू पावली त्याच दिवशीं सकाळीं कंपनीचे हे लोक आले आणि त्यांच्याबरोबर करारमदाराची चर्चा होऊन वृंदावननें लेखी दस्तखत करून घेतलें. त्यावेळीं सुमारें दहा वाजले होते. घाईघाईनें बाहेर येऊन मोलकरीण म्हणाली, " दादाबाबू, एवढा उशीर झाला तरी अजून आईचं दार कां उघडलं नाहीं ? "

साशंक होऊन वृंदावननें विचारलें, " अजून आई जागी झाली नाहीं का ? "

" होय दादा—दार आंतून बंद आहे. हांक मारली तरी उत्तर नाहीं. "

वृंदावन घाबराघुबरा झाला. धावत येऊन सारखा दरवाजा ठोठावीत ओरडूं लागला, " आई ! आई ग—! "

आंतून उत्तर आलें नाहीं. घरांतील सारीं माणसें येऊन सारखीं ओरडूं लागलीं, तरीही आंतून नुसता हुंकारसुद्धां आला नाहीं. लोखंडी पहारीनें झांकलेलें दार फोडून उघडलें. दार उघडतांच आंतून भयंकर दुर्गंधी आली. तोंडावर फटका मारल्याप्रमाणें सारे लोक शिसारून मागें हटले. तो फटका सहन करून लगेच वृंदावन तोंड फिरवून कसाबसा आंत शिरला.

बिछाना मोकळा होता. त्याची आई बाजूला जमिनीवर पडली होती. मृत्यू डोळ्यांशीं आला होता. अंगांत उठायची शक्ति होती तोंपर्यंत ती बाहेर येत होती. शेवटीं शक्ति थकली, हातपाय चालेना, त्यावेळीं जी जमिनीवर पडली ती पुन्हां उठली नसावी. साऱ्या खोलीभर महामारीच्या भयंकर आक्रमणाचा पुरावा जिकडे तिकडे दिसत होता.

जीवतपणीं तिनें स्वत:साठीं कधीं कुणाला एवढीसुद्धां तोशिस लागूं दिली नव्हती. म्हणूनच मरणाच्या दारीं उभी असतांना भर रात्रीं आरडा-ओरड करून इतरांची झोंपमोड करणें तिला आवडलें नसावें. सारी रात्रभर बिचारीनें कसे क्लेश सोसले असतील याची आता सर्वांना चांगली कल्पना आली होती.

अशा अचानक रीतीनें आणि शोचनीय प्रकारानें प्रत्यक्ष आईला मृत्यू आलेला पाहून मन ताब्यात ठेवणं कुणाही माणसाला साध्य झालें नसतें. वृंदावनचें तसेंच झालें. उभा राहण्याचा त्यानें जीवापाड प्रयत्न केला—दाराच्या चौकटीला धरून तो उभा राहण्याचा प्रयत्न करीत होता पण लगेच त्याला मूर्च्छा आली आणि तो आईच्या पायाजवळ तसाच कोसळून पडला.

त्याला उचलून घेऊन सर्वांनीं बाहेर आणलें. पंधरावीस मिनिटांनीं तो शुद्धिवर आला त्यावेळीं चरण आपल्याजवळ बसून रडतो आहे असें त्याला दिसून आलें. तो उठून बसला आणि मुलाचा हात धरून मरणप्राय झालेल्या आपल्या आईजवळ येऊन त्यानें बैठक मारली. डॉक्टरला बोलावण्यासाठीं जो माणूस गेला तो परत येऊन म्हणाला, " डॉक्टर घरीं नाहींत. कुठंतरी गेले आहेत. इतक्यांत परत यायचे नाहींत. "

त्याच्या आईची वाचा गेली होती, तरीही ती शुद्धीवर होती. मुलगा आणि नातू जवळ आलेले पाहून तिच्या निष्प्राण होत असलेल्या डोळ्यांतून आसवांच्या धारा वाहूं लागल्या. बोलण्यासाठीं तिचे ओंठ थरथरत होते.

सर्वांना ती आशीर्वाद देत असावी—ते आशीर्वाद जरी कुणाच्या कानीं पोंचले नाहींत तरी सर्वांच्या हृदयाला जाऊन भिडले असावे.

तुळशीवृंदावनाजवळ आणून तिला घोंगडीवर काढलें. किती वेळ ती टक लावून तुळशीकडे पाहत होती. निस्तेज होत असलेले तिचे थकलेले डोळे शेवटची झांप घेण्यासाठीं पाहतां पाहतां झांकले गेले.

हे सहा दिवस वृंदावननें कसे काढले तें त्या एकट्या भगवन्तालाच माहीत. त्या भगवन्तानें जसें कांहीं त्याला हातीं धरून उभें ठेवलें होतें.

आतां चरणचा खेळ बंद झाला होता. तो बोलत सुद्धा नव्हता. नाना प्रकारच्या किल्लीच्या गाड्या, आगबोटी, हालतेचालते पशुपक्षी—किती तरी मोलवान खेळणीं वृंदावननें त्याला आणून दिलेलीं होतीं. तीं खेळणीं घेऊन खेळण्यांत या पूर्वी तो रोज दंग झालेला असे. आतां तीं खेळणीं एका कोपऱ्यांत पडून राहिलीं होतीं. आतां तो त्यांना हातसुद्धां लावीत नव्हता.

त्या आपत्तीच्या काळांत या मुलाकडे लक्ष द्यायला कुणालाच फुरसत झाली नाहीं. आजीला खाटेवर चढवून चादरींत गुंडाळून मोठमोठ्यानें हरि-नामाचा गजर करीत ज्यावेळीं घेऊन जाऊं लागले, त्यावेळीं तो जवळ उभा राहून टकमक पहात होता.

आजी आपल्याला कां बरोबर घेऊन गेली नाहीं, बैलगाडींतून जायच्या-ऐवजीं अशी कपड्यांत गुंडाळून मुकाट्यानें माणसाच्या खांद्यावरून ती कां गेली, कां ती परत आली नाहीं, बाबा असे कां रडत बसले आहेत वगैरे प्रश्नांची उकल आपल्या मनाशीं करीत तो एकटाच बसून राहिला होता.

त्याची ती हताश झालेली परिस्थिति आणि भयंकर झालेली मुद्रा सर्वांच्या नजरेला दिसत होती. तिकडे पाहिलें नाहीं केवळ त्याच्या बापानें. आईच्या आकस्मिक मृत्यूचा धक्का त्याला एवढ्या जोरानें बसला होता, कीं कुठेंही लक्ष पुरवायला, बुद्धिपुरःसर कुठें नजर द्यायला किंवा कोणत्याही गोष्टीचा विचार करायला, अवश्य असणारी शक्ति त्याच्या ठायीं राहिली नव्हती. तो उदास झाला होता—भ्रमिष्ट झाला होता. जें त्याच्या नजरेसमोर दिसे तें पाहतां पाहतां कुठें तरी ओसरून जाई—ठरून राहत नसे.

अलीकडे संध्याकाळीं रोज त्याचे शिक्षक दुर्गादास बाबू त्याच्या घरीं येऊन बसत. त्याची समजूत घालण्याचा प्रयत्न करीत. वृंदावन मुकाट्यानें त्यांचें

बोलणें ऐकून घेई—पण त्यांतील कोणतीही गोष्ट त्याच्या अंतःकरणांत शिरून राहूं शकत नसे. अकस्मात अफाट समुद्राच्या मध्यभागीं आपल्या जहाजाचा तळ सुटला आहे, हजार प्रयत्न केले तरी दुरुस्त होत नाहीं,—ती फुटकी नाव कांहीं केल्या बंदर गांठणार नाहीं, असा कांहींतरी विलक्षण स्थायी परिणाम त्याच्या अंतःकरणाला ग्रासून राहिला होता. जिचा शेवट समुद्राच्या पोटीं जाण्यांतच होणार त्या नावेसाठीं कशाला जिवाचा आटापिटा करायचा? तसें नसतें तर त्याची पत्नी आयुष्याच्या भर सुरवातीला चरणला मागें ठेवून कां गेली असती? अशा प्रसंगाच्या वेळीं कुसुमच्या हृदयांत दयेचा उद्रेक नसता का झाला? अत्यंत निर्दयपणानें कां तिनें चरणला दूर लोटलें असतें?

आणि सर्वांच्यावर तिची आई! कुणाला लाभली होती का असली आई? आपण सुखासुखी निघून गेली, जायच्या वेळीं एक शब्दसुद्धां सांगून गेली नाहीं.

अशा प्रकारें त्याच्या भडकलेल्या मस्तकांत विधात्याची इच्छा प्रतिक्षणाला अधिकाधिक स्पष्ट होऊन दिसूं लागली होती. त्याचवेळीं घरची जुनी मोलकरीण येऊन रडत रडत तक्रार करूं लागली, “दादा, शेवटीं असा मुलगा हातचा का घालवणार? एकदां त्याला तुम्हीं जवळ घ्या, कोडकौतुक करा. कसा होऊन गेला आहे तें एकदां डोळे उघडून पहा तर खरं!”

तिचें तें भाषण माथ्यावर फटका मारल्यासारखें वृंदावनला जाणवलें. त्याची तंद्रा भंग पावली आणि तो दचकून उठून म्हणाला, “काय झालंय चरणला?”

मोलकरीण अस्वस्थ होऊन म्हणाली, “इडापिडा टळो! तसं कांहींच झालं नाहीं. इकडे ये बाळ चरण—जवळ ये. बाबा बोलवताहेत.”

घाबरत घाबरत चरण येऊन समोर उभा राहिला तेव्हां धांवतच जाऊन वृंदावननें त्याला उराशीं कवटाळलें. त्याला एकदम रडूं कोसळलें. तो उद्गारला, “तूं देखील जाणार का रे चरण!”

त्याला धमकावून मोलकरीण म्हणाली, “छे छे! हें काय बोलतां दादा?”

वृंदावन ओशाळला. चटकन डोळे पुसून घेऊन आज कितीतरी दिवसांनीं त्यानें हंसायचा प्रयत्न केला.

मोलकरीण आपल्या कामाला निघून गेली तेव्हां चरण हळूच म्हणाला, " आईकडे जातों बाबा ! "

आजीकडे जातों असें तो म्हणाला नाहीं हेंच भाग्य, असें वृंदावनला वाटलें. त्याला कुरवाळून तो म्हणाला, " तुझी आई आतां त्या घरीं नाहीं चरण."

" केव्हां येईल ती ? "

" तें कांहीं माहीत नाहीं मला. आज माणूस पाठवून चौकशी करतों. "

चरण खूष झाला. त्याच दिवशीं वृंदावननें खूप खूप विचार करून चरणला घेऊन जाण्याबद्दल केशवला पत्र लिहिलें. गांवांत सुरू असलेल्या भयंकर सांथीची हकिकतही त्यानें त्या पत्रांत सविस्तर लिहिली होती.

आईच्या श्राद्धाला आतां दोन दिवस राहिले होते. सकाळींच उठून त्या कामाच्या तयारीसाठीं तो चंडीमंडपाची व्यवस्था पाहत होता, तितक्यांत त्याला कळलें, कीं आंत चरणला उलटीजुलाब सुरू झाले होते. धांवत जाऊन पहातो तों तो निर्जीव होऊन बिछान्यावर पडला होता. महामारीनें पकड घेतल्याची भयंकर छाया त्याच्या चेहेऱ्यावर पसरली होती.

वृंदावनच्या डोळ्यासमोर अंधेरी आली. हातपाय लटपटून तो कोसळून एकदम खालीं पडला. कुणीतरी केशवला खबर द्या, असें सांगून तो मुलाच्या बिछान्यावर प्रेतवत होऊन पडला.

घटकाभऱ्यानें गोपाळ डॉक्टरच्या दवाखान्यांत गेल्यावेळीं त्याचे दोन्ही पाय कडकडून दाबून धरून वृंदावन म्हणाला, " दया करा डॉक्टरबाबू, माझ्या मुलाला वांचवा ! माझे हजार अपराध झाले असतील पण तो बिचारा निर्दोष आहे—अजाण पोर आहे. तुमच्या पाया पडतों डॉक्टरबाबू, एकदां येऊन त्याला पहा. त्याच्या यातना पाहिल्यात कीं तुम्हालासुद्धां दया येईल."

तोंड वांकडें करून गोपाळ म्हणाला, " तारिणी मुखर्जी म्हणजे डॉक्टर बाबूचा मामा, याची तुला त्यावेळीं आठवण नव्हती ? हलकं कुळ—हलकी जात—पैशाच्या जोरावर ब्राह्मणाचा अपमान केलास ! हे दोन पाय डोक्यावर घ्यावे लागतील हें त्यावेळीं आठवलं नाहीं तुला ! "

रडत रडत वृंदावन म्हणाला, " आपण ब्राह्मण— आपल्या पायाला हात लावून सांगतों, तारिणी ठाकूरचा मी कांहींसुद्धां अपमान केला नाहीं. मी

निषेध केला तो साऱ्या गांवाच्या कल्याणासाठीं. आपण डॉक्टर आहांत, आपल्याला सारं कांहीं कळतंय, प्यायचं पाणी तसं बिघडवण्यांत केवढा धोका होता गांवाला !"

आपले पाय सोडवून घेऊन गोपाळ म्हणाला, "धोका म्हणे ! काय मामाची चूक होती ? मी डॉक्टर—मला का कळत नाहीं ? दुर्गादासकडे जाऊन इंग्रजी शिकलास म्हणून असा शेफारूं नकोस. मला शिकवतोस काय ? एवढ्या मोठ्या तळ्यात दोन कपडे चुबकले तर काय असं पाणी बिघडणार होतं ? मी कुकुलं बाळच कीं नाहीं ! तें कांहीं नाहीं बाबा—पैशाची मस्ती आहे ही ! हलक्या लोकांच्या हातीं पैसा आला म्हणजे हें असं व्हायचंच. नाहींतर ब्राह्मणाला घाट बंद करायची काय टाप लागली होती तुझी ! एवढी मस्ती ! एवढी मिजास ! चल नीघ इथून. मी तुझ्या घरांत पाऊल सुद्धां टाकणार नाहीं."

मुलासाठीं वृंदावनचें काळीज फाटून जात होतें. डॉक्टरचे पाय पुन्हां कवटाळून धरून तो काकुळतीला येऊन म्हणाला, "नाक घासतों—क्षमा मागतों—तुमची पायधूळ घेतों—पण एकदां घरीं या डॉक्टरबाबू ! मुलाचे प्राण वांचवा. शंभर रुपये देतों—दोनशें देतों—पांचशें देतों—मागाल तितके देतों डॉक्टरबाबू—पण एकदां या नि औषध द्या."

"पांचशें देतोस ?" गोपाळ नरम येऊन म्हणाला, "अरे बाबा, तुला आतां सारं कांहीं सांगतों—अगदीं उघड करून सांगतों. तुझ्याकडे गेलों तर मला वाळींत टाकतील. आतांच ते सारे येऊन गेले होते,—नाहीं रे बाबा, तारिणीमामानं परवानगी दिली नाहीं तर माझ्या घरीं कुणी ब्राह्मण यायचा नाहीं. नाहींतर मी आहें डॉक्टर,—मला काय ! पैसा घ्यायचा, औषध द्यायचं ! पण तें कांहीं आतां जमायचं नाहीं. तुझ्यावर दया करायला गेलों तर माझ्या पोराबाळांच्या लग्नमुंजी कशा होतील बाबा ? उद्यां माझी आई मेली तर तिला खांदा द्यायला कोण येईल बाबा ? तिथं कांहीं तूं चालायचा नाहींस तसल्या कामाला ! आतां असं कर, घोषाळ महाशयांना घेऊन मामाकडे जा. तो वडिल माणूस आहे, सारे त्याला मानतात, त्याचे हातपाय धरून पहा—समजलं का वृंदावन, त्यांना एकदां सांगून टाकलं कीं मग मी—तशीं आजकाल मोठीं रामबाण औषधं आणलीं आहेत मी. औषध दिलं कीं होईल बरा."

काकुळतीला येऊन वृंदावन त्याच्याकडे पहात राहिला. त्याला आश्वासन देऊन गोपाळ पुन्हा म्हणाला, " अगदीं भिऊं नकोस. तूं जा आतां. उशीर लावूं नकोस. आणखी असं पहा, हें मला जें द्यायचं कबूल केलं आहेस तें त्यांना कांहीं सांगायला नको. जा—पळ आतां. "

वृंदावन धापा टाकीत रडत रडत येऊन तारिणीच्या पदकमलावर लोटांगण घालता झाला.

लाथ मारून तारिणीनें आपले पाय सोडवून घेतले आणि पिशाच्चासारखें विकट हास्य करून तो म्हणाला, " संध्यापूजा केल्याशिवाय मी पाणीसुद्धां घेत नाहीं तोंडांत ! कसं ? वठली कीं नाहीं माझी बत्तिशी ? झाला कीं नाहीं निर्वंश ? "

वृंदावनचें रडणें ऐकून तारिणीची बायको आंतून जी धांवत बाहेर आली ती स्वतःच रडूं लागली. ती नवऱ्याला म्हणाली, " छे, छे ! असलं अधर्मी काम करूं नका. जें व्हायचं तें होऊन गेलं. गरीब बिचारं मूल—एवढंसं मूल—औषध द्यायला सांगा गोपाळला. "

तारिणी खेंकसून म्हणाला, " तूं गप्प राहा. पुरूषांच्या कारभारांत तोंड घालूं नकोस. "

ती बिचारी ओशाळली आणि वृंदावनला म्हणाली, " माझा आशीर्वाद आहे बाबा. देव तुझ्या मुलाला आराम देईल ! " असें म्हणून डोळे पुशीत पुशीत ती घरांत निघून गेली.

वृंदावन वेडापिसा झाला होता. काकुळतीला येऊन त्याची विनवणी करीत होता—त्याच्या पायावर लोटांगणें घालीत होता. नाहीं—तरीही नाहीं !

अशा वेळीं शास्त्रज्ञ घोषाळ महाशय पायांतल्या खडावांचा खटखट आवाज करीत शेजारच्या घरांतून येऊन हजर झाले. सारी हकिकत ऐकून घेतल्यावर प्रसन्न चित्तानें ते म्हणाले, " शास्त्र म्हणतं, कुत्र्याला सलूख दिली तर तें तोंड चाटायला येतं. या असल्या हलक्या लोकांना सजा दिली नाहीं तर समाजाचा विध्वंस होईल. या अशामुळंच या कलिकालांत धर्मकर्म बुडालंय—ब्राह्मणाचा दर्जा गेलाय !—काय रे तारिणी, त्या दिवशीं मी म्हटलं नाहीं तुला, कीं या बिंदा वैष्णवाची मिजास भारीच वाढली आहे म्हणून ! माझं सांगणं ऐकलं नाहीं तेव्हांच ठरून गेलं, कीं आतां याच्यावर देवाचा

कोप होणार ! आतां सुटका नाहीं ! हातोहात कसं बक्षिस मिळालं तें पाहिलंस ना तारिणी ? "

त्याचें तें भाषण तारिणीला मनापासून रुचलें नाहीं. तो म्हणाला, " अन् मी ! त्या दिवशीं तळ्याच्या पाळीवर उभं राहून हातीं जानवं घेऊन ओरडलों, ' निर्वंश होवो ! ' काका संध्यापूजा केल्याशिवाय पाणी घेत नाहींत ! अजून चंद्रसूर्य उगवताहेत ! अजून भरती ओहोटी येते आहे !—"

शिकारी माणूस आपण मारलेल्या जनावराच्या मरणकालच्या यातना पाहून आपल्या अचूक शरसंधानावर खूप होतो, तशाच प्रकारच्या दृष्टीनें तारिणी त्याच्याकडे पाहात होता. एकुलत्या एक मुलाच्या अपेक्षित वियोगानें विव्हळ झालेल्या त्या हतभागी बापाच्या बेसुमार यातना पाहून तो अभिमानानें छाती फुलवीत होता.

आतां वृंदावन उठून उभा राहिला. जिवाच्या आकांतानें त्यानें अनेक विनवण्या केल्या होत्या, काकुळत्या केल्या होत्या,—त्यानंतर तो एक शब्दही बोलला नाहीं. बेफाम वर्चस्वाच्या भावनेनें आंधळ्या रूढाचाराला अनुसरून त्या चांडाळांनीं केलेले अत्याचार त्याला इतके जाणवले, कीं त्यापुढें पुत्र-वियोगाचें दुःखसुद्धां त्याला क्षुल्लक वाटूं लागलें. त्याचा स्वाभिमान जागा झाला. साऱ्या गांवाच्या कल्याणासाठीं जी गोष्ट केली, तिचें प्रायश्चित्त या स्वधर्मनिष्ठ ब्राह्मणांच्या गायत्री पुरश्चरणानें किंवा संध्यापूजेच्या तेजानें निर्वंश होण्यांत कशा रीतीनें मिळालें, या वादविवादाचा शेवटचा निकाल ऐकण्यासाठीं त्या जागीं एक क्षणभरसुद्धां न राहातां तो मुकाट्यानें तिथून निघून गेला.

दहा वाजायच्या सुमाराला आसन्नमरण झालेल्या आपल्या मुलाच्या शेजारीं तो येऊन बसला त्यावेळीं त्याचा मनस्ताप नाहींसा झाला होता. त्याच्या मुद्रेवर शांततेचें तेज झळकत होतें.

चरणच्या बिछान्याशेजारीं बसून केशव त्याचे हातपाय शेकीत होता. काळाच्या दाढेंतून चरणला ओढून काढण्यासाठीं तो जिवापाड प्रयत्न करीत होता. वृंदावनच्या तोंडून सारी हकिकत कळल्यावर तो एकदम उठून उभा राहिला आणि एक उपरणें खांद्यावर टाकून म्हणाला, " मी कलकत्त्याला निघालों. डॉक्टर मिळाला तर संध्याकाळपर्यंत येतों. नाहीं मिळाला तर हाच शेवट म्हणायचा ! अंः ! साऱ्या पृथ्वीनं ज्यांचा अभिमान आजवर बाळगला

तेच हे ब्राह्मण अं ! नुसत्या कल्पनेनं सुद्धां काळीज फाटून जातं रे वृंदावन ! मी चाललों. तोंवर मुलाला जगवता आलं तर पहा." असें म्हणून झपझप पावलें टाकीत तो निघून गेला.

केशव निघून गेला. बापाचा आसरा मिळतांच चरण, 'मी आईकडे जाणार,' असें म्हणून हंबरडा फोडून रडूं लागला. तो मुलगा जातीचा शांत होता. हट्ट करायची त्याला संवयच नव्हती. पण आज त्याची समजूत घालणें अत्यंत कठीण होऊन बसलें. वेळ जसजशी जात होती तसतशा रोगाच्या यातना उत्तरोत्तर वाढत होत्या. तहानेनें कोरडलेल्या गळयानें आईकडे जाण्यासाठीं तो एवढा मोठा कल्लोळ करीत होता, कीं ऐकणाराचें देखील काळीज फाटून जात होतें. तिसऱ्या प्रहरीं त्याची तीही ओरड मदावत आली. हातपाय गार पडत आले. बोलण्याचें त्राण राहिलें नाहीं.

तें चैत्र महिन्यांतलें दिनमान होतें. दिवस लौकर मावळत होता. अशावेळीं डॉक्टरला घेऊन केशव आला. हा डॉक्टर त्याच्याच वयाचा त्याचा एक मित्र होता. चरणकडे पाहातांच त्याची मुद्रा गंभीर झाली. तो एका बाजूला झाला. केशवनें त्याच्याकडे पाहिलें, तो कांहीं तरी उत्तर देणार होता, तितक्यांत त्याची नजर वृंदावनकडे गेल्यामुळें बोलणें तिथल्या तिथेंच राहिलें.

वृंदावनच्या तें लक्षांत आलें. तो शांतपणें म्हणाला, "हो. मीच त्याचा बाप. अगदीं कसलाही संकोच धरूं नका मनांत. जें वाटत असेल तें उघड उघड सांगून टाका. बारा तासपर्यंत कोणत्याही प्रकारचा उपचार न करतां पोटच्या पोराला समोर टाकून ज्या बापाला स्वस्थ बसतां येतं, त्याला वाटेल तें सहन होईल डॉक्टरबाबू."

त्याची ती धीरगंभीर वृत्ति पाहून डॉक्टर स्तंभित झाला. केवढाही डॉक्टर झाला तरी तो माणूसच. त्याला जें कांहीं सांगायचें होतें तें बापाच्यासमोर उघडपणें सांगायचें धैर्य झालें नाहीं. खालीं मान घालून तो स्वस्थ राहिला.

वृंदावनला आतां कळून चुकलें. तो म्हणाला, "केशव, मी आतां चाललों. देवघर जवळच आहे. जरूर पडली तर मला हाक मार. आणखी एकच गोष्ट—शेवट व्हायच्या आधीं मला खबर दे—शेवटीं एकदां पाहून घेईन." असें म्हणून तो खोलीबाहेर निघून गेला.

वृंदावननें जेव्हां देवघरांत प्रवेश केला त्यावेळीं तिथला प्रकाश अंधुक झाला.

होता. त्यानें उजव्या बाजूला पाहिलें—तिथें बसून त्याची आई जप करीत असे. त्या दिवसाची हकिकत त्याला सहज आठवली. कुंजनाथनें दिलेल्या आमंत्रणावरून त्याच्या घरीं ज्या दिवशीं हीं सारीं गेलीं होतीं, कुसुमच्या हातांत बांगड्या घालून तिला आशीर्वाद देऊन ज्यावेळीं त्याची आई आली होती, त्यावेळीं चरणला घेऊन ती इथेंच बसली होती. त्या दिवशीं तिचें हृदय आनंदानें भरून आलें होतें. देवाची ती दया कृतज्ञपणें त्याच्याच पायीं निवेदन करण्यासाठीं ती मुकाट्यानें इथें आली होती—

आणि आज ? कसलें निवेदन करण्यासाठीं तो या देवघरांत आला होता ?

धरणीवर अंग टाकून तो पडला आणि म्हणाला, " शेजारच्या खोलींत माझा चरण मरणाची वाट पाहातो आहे. देवा, फिर्याद घेऊन मी आलों नाहीं. पण देवा, बापाच्या हृदयांत वात्सल्याची भावना तूंच निर्माण केलीस—त्या बापाच्या डोळ्यासमोर एवढासुद्धां उपचार न होतां एवढ्या निर्दयपणानं त्याच्या एकुलत्या एक लेंकराची कां अशी हत्या करतोयस ? पितृहृदयाला एवढंसं समाधान मिळेल इतका मार्ग काय म्हणून खुला राखला नाहींस ? "

त्याला आठवली,—पुष्कळ लोकांच्या तोंडून पुष्कळ वेळां ऐकलेली ती फार जुनी म्हण आठवली,—होतं तें सारं कल्याणासाठीं ! तो आपल्याशींच म्हणाला, " ज्याची श्रद्धा नाहीं तुझ्यावर, त्यांना काय वाटतं तें त्यांचं त्यांनाच माहीत—पण माझा पूर्ण विश्वास आहे, कीं तुझ्या इच्छेवांचून झाडाचं एक पिकलेलं पानसुद्धां जमिनीवर खालीं पडत नाहीं. म्हणूनच आज एवढी ही प्रार्थना करतों, जगदीश्वरा, यांत माझं कसलं कल्याण सांठवून ठेवलंयस तें पटवून दे ना मला ! या एवढ्या लहानशा बोटभर चरणच्या मृत्यूनं जगांत कुणाचं कसलं कल्याण साधणार आहे ? "

जगतांतल्या साऱ्या घटना माणसाच्या बुद्धीच्या पलिकडच्या आहेत हें त्याला माहीत होतें. तरी देखील या एकाच प्रश्नावर जीव तोडून त्याचें सारें लक्ष एकाग्र होऊन गेलें,—कां चरण जन्माला आला ? कां तो एवढा मोठा वाढला ? जगांत येऊन कांहींना कांहीं करण्याचा अवसर न मिळतां कां म्हणून अशी हांक घालून त्याला आतां घेऊन जाणार ?

रात्रीचा नित्यक्रम उरकण्यासाठीं पुरोहित देवघरांत आला, त्याची चाहूल लागल्यामुळें ध्यानभंग होऊन ज्यावेळीं वृंदावन उठून गेला त्यावेळीं त्याच्या

हृदयांत उठलेलें वादळ शांत झालें होतें. आकाशांत प्रकाशाची छटा फुटली नव्हती खरी पण ढग दूर झाले होते. आकाश निर्मळ झालें होतें आणि त्या स्वच्छ आकाशाच्या प्रांतांत भविष्यकालीन जीवनाच्या मार्गाची अस्पष्ट रेषा उमटलेली त्याला दिसूं लागली होती.

तो बाहेर आला. पडवीच्या एका बाजूला दाराच्या आड उभी राहिलेली एक दीन दुबळी स्त्री पाहून तो थोडासा अचंब्यांत पडला. काळोखांत आडोशांत कोण अशी ही उभी राहिली आहे ?

वृंदावन जवळ आला. आल्याक्षणींच त्यानें ओळखलें, कीं ती कुसुम होती. त्याच्या जिभेवर चट्कन् शब्द येऊं पाहात होते,—' माझं सोळा आणे सूख पाहायला आलीस का कुसुम ? '—पण तो तसें बोलला नाहीं.

चरणच्या बाळजीवाच्या मंगलकामनेनें स्वतःचें सारें सुखदुःख, सारा मानअभिमान विसर्जन करून तो नुकताच आला होता. म्हणूनच अशा रीतीनें सूड साधून, आसन्नमरण असलेल्या आपल्या लेंकराचें अकल्याण करण्याची इच्छा त्याला झाली नाहीं. उलट तो काकुळतीनें म्हणाला, " थोडी आधीं आली असतीस तर चरणची इच्छा तरी पुरी झाली असती. आज अनंत यातना होत होत्या त्याला—पण त्या तशा वेळींसुद्धां तो तुझ्याकडे जाण्यासाठीं सारखा रडत होता. केवढं प्रेम होतं त्याचं तुझ्यावर ? पण आतां तो शुद्धीवर नाहीं ! —ये माझ्याबरोबर. "

कुसुम मुकाट्यानें नवऱ्याबरोबर निघाली. दरवाजाजवळ येतांच वृंदावननें शेवटचे क्षण मोजणाऱ्या चरणच्या बिछान्याकडे बोटानें दाखवून तिला म्हटलें, " हा पहा चरण निजलाय. जा घे त्याला !—केशव, ही चरणची आई ! "

" आतां हें प्रेत धरून कवटाळण्यांत काय फायदा ? सोड त्याला—घेऊन जाऊं दे तें प्रेत ! " असें दुसऱ्या दिवशीं सकाळीं कुसुमसमोर जाऊन म्हणण्याची कुणालाही छाती झाली नाहीं. कुंजनाथसुद्धां घाबरून मागें हटला. शेवटीं वृंदावननेंच तिला तसें सांगितलें.

वर पाहून कुसुमनें म्हटलें, " बोलवा त्यांना. मी स्वतःच देतें त्यांच्या हातीं. "

मनाचा कठोर निश्चय करून तिनें ज्या निधडेपणानें चरणचा मृतदेह स्मशानांत नेला तें पाहून वृंदावन देखील मनांतल्या मनांत घाबरून गेला.

# १५

चरणचा छोटा देह भस्म व्हायला फार वेळ लागला नाहीं. केशव सारखा पुन्हां पुन्हां तिकडे पाहात होता. एक मोठा भयंकर सुस्कारा सोडून तो मोठ्यानें ओरडला, " सारं खोटं ! सारं खोटं ! उठल्यासुटल्या जे म्हणतात, कीं देव करतो तें आपल्या बऱ्याकरतां म्हणून, ते सारे चोर हरामखोर आहेत."

गुडघ्यांत मान घालून वृंदावन जवळच स्तब्ध बसला होता. रडून रडून तांबडे लाल झालेले डोळे वर करून त्यानें त्याच्याकडे पाहिलें आणि म्हटलें, " स्मशानांत असली रागाची भाषा बोलूं नये केशव !"

" अं: !" असा उद्गार काढून केशव उगीच राहिला.

घरीं परत येतांना हरिजनांचीं दोनतीन मुलें झाडाखालीं खेळत बसलेलीं त्यांना दिसलीं. वृंदावन थबकून उभा राहिला आणि टक लावून त्यांच्याकडे पाहूं लागला. खेळाच्या रंगांत तीं मुलें त्या झाडाखालून जेव्हां दुसऱ्या झाडाकडे धांवत गेलीं त्यावेळीं एक मोठा सुस्कारा सोडून वृंदावन आपल्या मित्राकडे पाहून म्हणाला, " केशव, कालपासून एक प्रश्न पुन्हां पुन्हां माझ्या मनांत सारखा उठत होता. मला वाटतं त्याचं उत्तर मला आतां मिळालं. या जगांत एकुलतं एक मूल मरण्यांत देखील कांहीं वैशिष्ट आहे !"

नुकतीच शिवीगाळ करून केशव थांबला होता. एकाएकीं हा अद्भुत सिद्धांत एकून तो चकित झाला.

वृंदावन म्हणाला, " तुला अजून मूल झालेलं नाहीं—हजार कल्पना केल्यास तरी माझ्या अंतरांतलं दु:ख तुला कळायचं नाहीं—कळणं शक्यच नाहीं मुळीं. हें दु:ख एवढं मोठं आहे, कीं वैऱ्यावरसुद्धां असा प्रसंग यावा असं वाटायचं नाहीं कुणाला. पण याचीसुद्धां किंमत आहे केशव. आतां मला पत्ता लागला, कीं याची किंमत फार मोठी आहे. म्हणूनच मला वाटतं, देवानं ही व्यवस्था केली आहे."

कांहींसुद्धां उत्तर न देतां केशव त्याच्या तोंडाकडे पाहात राहिला होता. वृंदावन बोलत होता, "—हें माझं दु:ख एकदम निवळलं. या मुलांकडे पाहिलं तेव्हां आज प्रत्येक मुलाच्या चेहऱ्यांत मला चरणचा चेहरा

दिसतोय. प्रत्येक मुलाला हृदयाशीं घट्ट कवटाळून धरावं असं वाटतंय. चरण हयात होता तेव्हां केव्हांच असं वाटलं नव्हतं ! ”

खालीं मान घालून त्याचें भाषण ऐकत केशव त्याच्याबरोबर चालत होता. शाळेंतले दोघे विद्यार्थी, वनमाली आणि त्याचा धाकटा भाऊ, शिदोरी आणि पाण्याचें भांडें घेऊन जात होते, त्यांना हांक मारून वृंदावन म्हणाला, “ वनमाली, कुठं चाललास रे ? ”

“ बापाची शिदोरी घेऊन शेतावर चाललोंय पंडित महाशय. ”

“ इकडे माझ्याजवळ या पाहूं दोघेही. ” असें म्हणून दोन्हीं हातांनीं त्या दोघांनाही जवळ ओढून हृदयाशीं कवटाळून सारा जात्र डोळ्यात आणून तो त्यांच्याकडे पाहात राहिला. तो उद्गारला, “ कसं अगदीं समाधान झालं जिवाचं केशव ! खरोखरच चरणला मुकलों असं वाटून मी काल घाबरलों होतों. नाहीं—ती काळजी आतां गेली. आतां तो हरवायची भीति नाहीं. माझा चरण यांच्यांतच सामावला आहे—एके दिवशीं याच्यामधूनच तो माझा मला मिळेल ! ”

केशव घाबरून इकडे तिकडे पाहूं लागला आणि म्हणाला, “ त्यांना सोडून दे वृंदावन. त्यांच्या आईनं किंवा दुसऱ्या कुणी पाहिलं तर भारी वाईट वाटेल त्यांना. ”

“ हो. खरंच. चरणला आतांच जाळून आलों ना ! ” असें म्हणून त्या मुलांना सोडून देऊन तो उभा राहिला.

पंडित महाशयाच्या त्या विचित्र वर्तनामुळें त्या दोघांनाही मोठें चमत्कारिक वाटलें होतें. त्याच्या हातून सुटका होताच आपल्या भावाला घेऊन वनमाली पाहातां पाहातां दृष्टिआड झाला. भर रस्त्यात तिथेंच गुडघे टेकून हात जोडून आकाशाकडे पाहात वृंदावन म्हणाला, “ जगदीश्वरा, माझ्या चरणला घेऊन गेलास पण आज जी ही नवी दृष्टि मला मिळाली आहे ती मात्र काढून घेऊं नकोस. आज चरणचं प्रतिबिंब जसं या मुलांच्या तोंडावर दिसलं तसंच मला चिरकाल दिसूं दे. प्रत्येक मुलाला अशाच प्रकारें हृदयाशीं कवटाळण्यासाठीं माझे हात पुढें येऊं देत. केशव, स्मशानात बसून ज्यांना शिवीगाळ केलीस ते सारेच कांहीं लुच्चे हरामखोर नव्हेत रे ! ”

त्याचा हात धरून केशव म्हणाला, “ चल घरीं. ”

'चल.' असें म्हणून वृंदावन अगदीं सहजगत्या उभा राहिला. एक दोन पावलें चालल्यावर तो म्हणाला, "मला क्षमा कर. आज माझी जीभ जरा सैल सुटली आहे केशव! ही एवढी शिक्षा मला कां मिळाली, या प्रश्नाच्या भल्या मोठ्या बोजाखालीं माझं मन दडपलं होतं. बुद्धिपुरस्सर केव्हां कुठं मी गोहत्या ब्रह्महत्या केलेली नाहीं—मग देवानं मला एवढी मोठी शिक्षा कां दिली? माझा—"

त्याचें भाषण पुरें होण्यापूर्वीच केशव चिडून ओरडून म्हणाला, "त्या हरामजाद्या बुड्ढ्या घोषाळला विचार—तो म्हणेल, त्याच्या जपतपाच्या तेजानं! दुसऱ्या कुणा बदमाषाला विचार, तो म्हणेल, पूर्व जन्मींच्या पापानं! अं:! हे या देशींचे ब्राह्मण!"

वृंदावन शांतपणें म्हणाला, "केशव, सापानं टाकलेल्या कातीवर फटके मारण्यांत काय लाभ? सडलेल्या ताकाला दुर्गंधी आली म्हणून दुधाला नांव ठेवणं चुकीचं नाहीं का? अज्ञानाच्या टोकरीनं हे ब्राह्मण कुठं घसरले आहेत तें आधीं पाहून घे."

पूर्वीच्या साऱ्या गोष्टी आठवून केशव आंतून अत्यंत भडकला होता. तोंडाला आलें तें बोलला, "मग ही एवढी मोठी शिक्षा कां?"

वृंदावन म्हणाला, "शिक्षा नव्हेच मुळीं. मी तेंच म्हणत होतों तुला केशव. —कसलंच पाप आपल्या हातून घडल्याचं ज्याअर्थी मला आठवत नाहीं त्याअर्थी ही शिक्षा पापासाठीं मिळाली असं कबूल करून स्व:ला कमीपणा घ्यावा असं वाटत नाहीं मला. जिथं या जन्मांतलीच आठवण पुरेशी नाहीं, तिथं गेल्या जन्माच्या मानगुटीवर पापाचा बोजा चढवणं म्हणजे आत्म्याचा अपमान करणं होय. हें पापाचं फळ नव्हे,—माझ्या गुरुगृहवासाच्या गौरवाचे क्लेश आहेत हे! दु:ख भोगल्याशिवाय मोठी मिळकत कांहीं मिळत नाहीं. आज माझा चरण मेल्यामुळं जें ज्ञान मला मिळाल, तसलं मोलाचं ज्ञान पुत्रशोकासारख्या मोठ्या दु:खाच्या मोबदल्यावांचून केव्हांच मिळायचं नाहीं. हें हृदय चिरून दाखवतां आलं असतं तुला तर प्रत्यक्ष दाखवलं असतं, कीं या पृथ्वीवर जेवढीं म्हणून मुलं आहेत त्या साऱ्यांसाठीं माझ्या चरणनं आपली जागा सोडून दिली आहे. तूं ब्राह्मण—आज जें कांहीं मला मिळालंय तें केव्हांही हातसोड होऊं नये एवढाच आशीर्वाद मला दे."

वृंदावनचा गळा दाटून आला. समोरासमोर बसून दोघेही मित्र सारखे आसवें गाळूं लागले.

त्या दिवशीं वृंदावननें एकच विहीर खोदायचा संकल्प केला होता. पण आतां त्याला दिसून आलें, कीं साऱ्या गांवाला एक विहीर पुरेशी होणार नाहीं. गांवाच्या पूर्वेकडे राहणाऱ्या लोकांत दीनदुबळ्या लोकांचीच संख्या जास्त होती. या लोकांची पाण्याची गरज भागवल्याशिवाय रोगराईची भीति कमी होणें शक्य नव्हतें. म्हणूनच केशवला पाठवून वृंदावननें त्याच कंपनी-कडून माहिती मिळवली. साऱ्या लोकांना पाणी पुरेल अशी नळीची विहीर तयार करण्यासाठीं भरपूर पैसा खर्च केला तर नुसती तेवढ्याच गांवापुरती नव्हे, तर आजुबाजूच्या पांच सात गांवाची पाण्याची उणीव भरून येईल. इतकेंच नव्हे, तर तसाच प्रसंग आला तर शेती बागायती करतांसुद्धां पुरेसें पाणी मिळणें शक्य होईल.

वृंदावननें आनंदानें संमति दिली. देवोत्तर संपत्ति वगळून जी कांहीं त्याची संपत्ति होती ती सर्व श्राद्धाच्या दिवशीं रजिस्टर करून या कामासाठीं केशवच्या हातीं देऊन तो म्हणाला, " केशव, आतां एवढं कर भय्या, यापुढं विषारी पाणी पिऊन माझ्या चरणचे भाऊबंद मरतां नयेत. तसेंच माझ्या सर्व संपत्तीपेक्षां मोठी संपत्ति म्हणजे ही माझी शाळा, हिचा भार तूं घेतलास—आतां मी निश्चिन्त झालों. कधीं काळीं मी इकडे परत आलों आणि जर या माझ्या शाळेंतला एक तरी विद्यार्थी खरा कर्तबगार झाल्याचें मला दिसून आलं तर त्याच दिवशीं माझं चरणचं दुःख नाहींसं होईल. "

अलिकडे दुर्गादासबाबू सदोदित इथें हजर असत. ते अतिशय संतापून म्हणाले, " वृंदावन, तुझं सांत्वन कसं करावं ते मला कांहीं सुचत नाहीं बाबा. दुःख केवढं का मोठं असेना तें सहन करणं म्हणजेच माणुसकी. हताश होऊन—हात पाय गाळून संसार सोडून माणसानं जावं असं कांहीं भगवंताचं म्हणणं नाहीं."

वृंदावन विनयपूर्वक म्हणाला, " संसार टाकून जायचा माझा मुळींच उद्देश नाहीं मास्तर महाशय ! ती गोष्ट अगदीं अशक्य आहे. मुलांचीं तोंडं दिसलीं नाहींत तर मी एक दिवससुद्धां जगूं शकणार नाहीं. आपल्या कृपेनं लोक मला पंडित महाशय म्हणून ओळखूं लागले. हा जो मान मला

मिळाला आहे तो मी केव्हांही हातचा जाऊं देणार नाहीं. पुनः कुठंतरी जाऊन मी हाच उद्योग सुरू करीन. ”

दुर्गादासबाबू म्हणाले, “ तूं आपली सारी इस्टेट गांवाला पाणी मिळण्या-पायीं खर्ची घालून बसलास. आतां तुझा चरितार्थ कसा चालणार ? ”

भिंतीला टांगलेली भिक्षेची झोळी दाखवून वृंदावन उगीच थोडेंसें हंसून म्हणाला, “ वैष्णवाच्या बच्चाला कुठंही मूठभर भिक्षा मिळणं कठीण नाहीं मास्तर महाशय. तेवढ्यावर कसाबसा माझा चरितार्थ चालेल. ही संपत्ति माझ्या चरणची होती, म्हणूनच मी ती त्याच्या सोबती संवगड्यांसाठीं देऊन टाकली आहे. ”

दुर्गादासबाबू ब्राह्मण होते, तसेच ते गांवांतले वडिल माणूस होते. श्राद्धाच्या दिवशीं स्वतः हजर राहून ते देखरेख करीत होते, त्यामुळें कुसुमची खरीखुरी हकिकत त्यांना कळून आली होती. तीच गोष्ट आठवून ते म्हणाले, “ हें काहीं बरं नाहीं बाबा. तुझी गोष्ट वेगळी आहे. पण सूनबाईच्या दृष्टीनं ती मोठी शरमेची गोष्ट होईल. हें असलं कांहीं होतां कामा नये वृंदावन.”

मान खालीं घालून वृंदावन म्हणाला, “ ती आपल्या भावाकडे जाईल. ”

दुर्गादासबाबू वृंदावनला आपल्या मुलासारखा मानीत असत. संकटानं खचून जाऊन घर सोडून जाण्याचा त्याचा हा संकल्प ऐकून त्यांना अत्यंत वाईट वाटलें होतें. या संकल्पापासून त्याला परावृत्त करण्याचा शेवटचा प्रयत्न म्हणून ते म्हणाले, “ वृंदावन, जन्मभूमीचा त्याग करण्याची जरूरी काय ? इथंच राहिलास तर सारे व्यवहार पूर्वीसारखे सुरळीत चालतील. ”

वृंदावनचे डोळे भरून आले. तो म्हणाला, “ भिक्षेखेरीज आतां मला उपाय नाहीं—इथं भिक्षा मागणं मला व्हायचं नाहीं. शिवाय या घरीं राहिलों तर जिथ जिथं नजर जाईल तिथं तिथं चरणच्या छोटा हाताचा ठसा कुठं ना कुठं तरी दिसणारच. मला क्षमा करा मास्तर महाशय, मी हाडामासाचा माणूस आहें, एवढा मोठा बोजा सहन करायची ताकद माणसाच्या माथ्यांत नाहीं ! ”

दुर्गादासबाबू हताश होऊन बसून राहिले.

चरणच्या आजारांत उपचार करण्यासाठीं अगदीं अखेरच्या वेळेला जो डॉक्टर आला होता, त्याच्या मनावर त्या दिवशींच्या मर्मभेदक घटनेचा फार विलक्षण परिणाम झाला होता. पुढें काय झालें तें कळून घेण्याच्या जिज्ञासेमुळें,

त्याचप्रमाणें वृंदावनबद्दल त्याला जो विलक्षण ओढा वाटत होता त्यामुळें, त्या दिवशीं सकाळीं, कुणाचेंही बोलावणें आलें नव्हतें तरी, कलकत्त्याहून तो त्या गांवीं आला. चालत असलेलें हें संभाषण तो मुकाट्यानें ऐकत होता. वृंदावनच्या मनांत वैराग्याची ही जी भावना उत्पन्न झाली होती त्याला कांहीं कारण तरी होतें. पण भविष्यकालावर तिलांजली देऊन या एका क्षुल्लक शाळेचा भार घेऊन केशव आपखुषीनें कां इथें राहिला, तेंच त्याला कळत नव्हतें. आपल्या मित्राला उद्देशून तो म्हणाला, " तुझा भविष्यकाल मोठा उज्वल आहे केशव.—त्याच्यावर पाणी सोडून तूं सारं आयुष्य इथंच का खर्ची घालणार ? "

केशव थोडक्यांत म्हणाला, " शिक्षण हाच माझा व्यवसाय आहे. "

थोडासा नाराज होऊन डॉक्टर म्हणाला, " तें मला माहीत आहे—पण कॉलेजची प्रोफेसरी अन् असल्या या शाळेची पंतोजीगिरी एकच का ? कोणत्या प्रगतीच्या आशेनं हें करतोयस तें सांग ना मला. "

केशव अगदीं सहजपणें म्हणाला, " साऱ्या कांहीं ! चार पैसे मिळवणं म्हणजेच कांहीं प्रगति नव्हे अविनाश. "

" तें मलाही कबूल आहे. पण असल्या ह्या गावांत वस्ती करून राहणं सुद्धां महापाप ! नुसत्या कल्पनेनंच शहारे येतात अंगावर ! "

वृंदावन हंसला आणि केशवनें उत्तर देण्याच्यापूर्वीच म्हणाला, " तो दोष काय या गांवाचा आहे ? आपलासुद्धां दोष नव्हे का डॉक्टरबाबू ? आमची ही दुर्दशा पाहून आज आपल्याला शहारे आले. या दुर्दशेमुळं किती मुलं, किती स्त्रीपुरुष मरताहेत तें कधीं कुणी पहातोय का आपल्या डोळ्यानं ? आपण सारे लोक असेच पाठ फिरवून आम्हाला टाकुन निघून जाऊं लागलां तर निरुपाय होऊन आम्ही मेलों तर त्यांत आश्चर्य कसलं ? रागावूं नका डॉक्टरबाबू, पण आपल्या तोंडचा घास ज्यांच्याकडून येतो, आपल्या अंगावरचं वस्त्र ज्यांनीं दिलं आहे, ते हतभागी दरिद्री लोकच या गांवचे रहिवासी आहेत. त्यांना आडवे घालून—वर पाय देऊन–त्यांची शिडी बनवून आपण वर चढून जातांहांत त्यांना तुडवीत तुडवीत. केशवला तें जाणवलं. म्हणूनच एम्. ए. झाला तरी तो मागं हटला अन् इथंच राहिला ! "

आनंदानें उसळून उठून केशवनें वृंदावनला घट्ट मिठी मारली आणि

म्हटलें, " माणुसकी दाखवायची केवढी मोठी संधी मला दिलीस ही वृंदावन ! दहा वर्षांनीं पुन्हा इथं ये आणि पहा या गांवांत लक्ष्मीसरस्वतीची प्रतिष्ठा झाली आहे कीं नाहीं ती ! "

दुर्गादासबाबू आणि अविनाश डॉक्टर दोघेही त्या दोन्ही मित्रांच्या तोंडाकडे विस्मयपूर्वक आदरानें पहात राहिले.

भिक्षेची झोळी हातीं घेऊन वृंदावन दुसरे दिवशीं आपला गांव सोडून जाणार आणि ज्या कुठें थारा मिळेल तिथें जाऊन पुनः आपल्या कामाला सुरवात करणार, ही बातमी चोहींकडे पसरली. कांहीं दिवसपर्यंत वृंदावननें आपल्या गांवीं जाऊन रहावें अशी इच्छा केशवनें पुनः पुनः प्रदर्शित केली होती पण वृंदावन कबूल झाला नाहीं. सुख दुःख, सोय गैरसोय, यांची कसलीच पर्वा करायची नाहीं असा त्याचा निश्चय होता.

जाण्याचें निश्चित झालें तेव्हां देवसेवेचा भार पुरोहित आणि केशव यांच्यावर टाकून घरच्या नोकरचाकरांकडे त्यानें आपली दृष्टि वळवली. आईच्या पेटींत जी कांहीं शिल्लक होती ती सारी त्यांना देऊन टाकून त्यानें त्यांना निरोप दिला.

त्यानें कांहीं तजवीज केली नव्हती ती एका कुसुमची !—तसें कांहीं करावें असें त्याला वाटलें नाहीं —तशी जरुरीही जाणवली नाहीं. ज्या दिवशीं चरणला तिनें थारा दिला नाहीं त्या दिवसापासून तिच्याबद्दल तो उदासीन झाला होता. चरणच्या मृत्यूनंतर त्या उदासीनतेचें तिटकाऱ्यांत रूपांतर झालें होतें. म्हणूनच, कुसुम कां आली, काय करते आहे, कां राहिली आहे याची त्यानें एवढीसुद्धां चौकशी केली नाहीं. चौकशी केली नाहीं एवढेंच नव्हे, तर त्याला वाटत होतें, आपणहून आली आहे—श्राद्धविधि संपल्यावर तशीच आपण होऊन निघून जाईल.

ती आल्यानंतर तशीच जरूर पडल्यामुळें जरी तो तिच्याशीं मधून मधून केव्हांतरी बोलला होता; तरीही त्यानें डोळे वर करून तिच्याकडे पाहिलें नव्हतें. कुसुमनें देखील त्याच्याशीं भेटायचा किंवा बोलायचा एवढासुद्धां प्रयत्न केला नव्हता.

अशाच प्रकारें हे कांहीं दिवस गेले होते. पण आतां अवधी नव्हता. ती केव्हां निघून जाणार म्हणून तिला विचारण्यासाठीं वृंदावननें घरच्या मोलकरणीला पाठवलें. तिच्या उत्तराची वाट पहात तो राहिला होता.

दासीनें येऊन सांगितलें, कीं आपण जाणार नाहीं असें ती म्हणते.

वृंदावन आश्चर्यचकित होऊन म्हणाला " आतां इथं रहायची सोयच नाहीं मुळीं, असं कां नाहीं सांगितलंस तिला ? "

मोलकरीण म्हणाली, " सूनबाईंना सारं कांहीं माहित आहे. "

नाराज होऊन वृंदावन म्हणाला, " तिला विचार, म्हणावं एकटीच का रहाणार आहेस इथ ? "

एका मिनिटांतच मोलकरीण तिला विचारून आली आणि म्हणाली, " हो ! "

वृंदावन स्वतः आंत आला. खोलीचा दरवाजा बंद होता. एकदम आंत जायला त्याचें मन घेईना. त्यानें दाराच्या फटींतून पाहिलें त्यावेळीं त्याच्या सर्वांगावर कांटा उभा राहिला. जळलेल्या घराच्या पोळलेल्या भिंतीसारखी कुसुम या बाजूकडे तोंड करून उभी होती. तिच्या डोळ्यांतली नजर फिरली होती— वेड्यासारखी झाली होती. पुत्र शोकाबरोबरच पश्चात्ताप झाल्यामुळें माणसाची काय विलक्षण अवस्था होते तें वृंदावननें पहिल्यानेंच पाहिलें. तो घाबरून मागें हटला.

सहज त्याचा धक्का लागल्यामुळें दरवाजाची कडी वाजली त्यावेळीं कुसुमनें वर पाहिलें. पुढें येऊन दार उघडून ती म्हणाली, " या आंत ! "

वृंदावन आंत येतांच दाराला आंतून कडी घालून ती त्याच्यासमोर उभी राहिली. तिचें माथें भडकलें असावें, ती भानावर नसावी, अशा परिस्थितींत ती काय करील याचा नेम नाहीं असें वाटून वृंदावनच्या काळजांत धडकी भरली.

पण कुसुमनें कोणत्याच प्रकारचें अवास्तव वर्तन केलें नाहीं. गळ्यांत पदर घेऊन तिनें आपलें मस्तक नवऱ्याच्या दोन्ही पायांत खुपसलें आणि ती तशीच पडून राहिली.

वृंदावन घाबरून तसाच स्तब्ध उभा राहिला. एवढीसुद्धां हालचाल करावी असें त्याला वाटेना.

कितीतरी वेळ त्याचे पाय धरून कुसुम तशीच पडून राहिली होती—जणूं काय पांयावर पडून त्याची शक्ति ती खेंचून घेत होती. बऱ्याच वेळानें ती वर उठून बसली आणि त्याच्या तोंडाकडे पहात काकुळतवाणीनें म्हणाली, " सारे म्हणतात तुम्ही धीराचे माणूस. सहन करायचं सामर्थ्य आहे तुम्हाला—पण मी काय करूं ? अहोरात्र माझ्या हृदयांत सारखी आग धगधगत असतांना मी कोणत्या आधारावर जिवंत राहूं ? तुम्हाला टाकून मरून तरी कशी जाऊं ? "

दोघांचीही परिस्थिति एकच—एकच दुःख. वृंदावनच्या हृदयांत पेटूं लागलेली द्वेषाची आग विझून गेली. हात धरून तिला उठवून तो म्हणाला,

" ज्या मार्गानं मला शांति मिळाली त्याच मार्गानं तुलाही मिळेल. त्याखेरीज दुसरा उपाय नाहीं. "

कुसुम मुकाट्यानें ऐकत होती, वृंदावन बोलत होता, " चरणवर तुझं किती प्रेम होतं त्याची मला कल्पना आहे कुसुम. म्हणूनच तुला हा मार्ग दाखवतोंय मी. तो तुझा मुलगा मेला नाहीं—हरवला नाहीं—नुसता लपून राहिलाय—चांगले डोळे उघडून पाहायला शिकलीस तर तुला आपोआप दिसेल—जिथं जिथं म्हणून मुलंबाळं खेळताहेत तिथं आमचा चरण आहेच आहे ! "

एवढ्या वेळानें कुसुमच्या डोळयांतून आसवांची झरणी सुरू झाली. पुन्हा एकदां नवऱ्याच्या पायावर तिनें आपलें मस्तक ठेवलें. थोड्या वेळानें त्याच्याकडे पाहून ती म्हणाली, " मी तुमच्याबरोबर येणार. "

वृंदावन घाबरून म्हणाला, " माझ्याबरोबर ?—छे ! अशक्य ! "

" अगदीं अशक्य नाहीं ! मी येणार. "

वृंदावन गहिंवरून म्हणाला, " कशी येणार तूं कुसुम ? तुझा प्रतिपाळ कसा करणार मी ? माझ्यासाठीं मी भिक्षा मागेन पण तुझ्यासाठीं मला भिक्षा मागतां येत नाहीं ! शिवाय ही पायपीट कशी झेपेल तुला ? "

निश्चयाच्या वाणीनें कुसुम म्हणाली, " वाटेल तितकी पायपीट करीन मी. आतां ही आलें ती तशीच ना ? शिवाय असं पहा, मी तुम्हाला भिक्षा मागूं द्यायची नाहीं—मग ती तुमच्यासाठीं असो कीं माझ्यासाठीं असो. तुम्ही आपल्या कामाला लागा—मला काय करायचं तें मी करीन. असला संसार कसा चालवायचा तें मी जाणतें. इतके दिवस दादाचा संसार मीच चालवला ना ? "

वृंदावन विचार करून पाहूं लागला.

कुसुम म्हणाली, " उगीच विचार करूं नका. मी येणार. एकदां चूक करून मुलगा गमावून बसलें—आतां नवरा गमावायचा नाहीं मला ! "

क्षणभर विचार करून वृंदावननें प्रश्न केला, " ज्या मंत्राची दीक्षा चरणनं मला दिलीय,—ताकद आहे तुझी त्या मंत्राची दीक्षा घ्यायची ? "

निश्चयात्मकतेनें कुसुम म्हणाली, " आहे ! "

" चल तर. " असें म्हणून वृंदावननें संमति दिली.

पुन: एकदां केशवला सारें कांहीं सांगून निरवानिरव केल्यावर त्याच रात्रीं आपल्या पत्नीला घेऊन वृंदावननें बाडलगांवचा शेवटचा निरोप घेतला.

# वैकुंठचें मृत्युपत्र

## १

पांच सहा वर्षांपूर्वी बाबूगंजच्या वैकुंठ मुजुमदारचें किराणा मालाचें दुकान ज्यावेळीं अनेक प्रकारचीं संकटें सहन करून टिकून राहिल्याचें दिसून आलें, त्यावेळीं सर्वांनाच आश्चर्य वाटलें. वैकुंठनें कशा रीतीनें बाजू संभाळली तें कुणालाच माहीत नव्हतें—पण तेव्हांपासून दुकानाची हळूहळू भरभराट होत गेली.

पूर्वीसारखे संकटाचे दिवस राहिले नाहींत, असें असूनही वैकुंठनें आपला मोठा मुलगा गोकुळ याला शाळेंतून काढून दुकानाच्या कामाला लावलें तेव्हां गांवांतल्या लोकांच्या आश्चर्याला सीमा राहिली नाहीं. वैकुंठच्या या वागणुकी-बद्दल जो तो आपापल्या परीनें बोलाबोली करूं लागला. कुणी म्हणत, " पाहिलीत म्हाताऱ्याची ही रीत ? किंवा कुणी सांगावं, कदाचित् त्या मुलांतच दम नसेल. एक वर्ष नापास झाला म्हणून लावला दुकानांत कामाला. त्याची आई जिवंत असती तर असं करूं दिलं असतं का तिनं ? धाकट्या मुलाच्या—त्या विनोदच्या बाबतींत असं कांहीं कर म्हणावं !—विषाचा सडा छाटील बायको मग ! "

खरें पाहिलें तर गोकूळ हा तेवढासा बुद्धिवान नव्हता. वर्गांत त्याचा नंबर कधींच वर आला नाहीं. परीक्षेचा रिझल्ट बाहेर आला त्यावेळीं तो एवढेंसें तोंड करून आपल्या सावत्र आईजवळ येऊन रडूं लागला. तिनें त्याला जवळ ओढून घेतलें आणि मोठ्या प्रेमानें त्याचें तोंड कुरवाळीत म्हटलें, " अरे

गोकूळ, अजून केवढीं तरी संकटं सोसायचीं आहेत बाबा. संकट आलं तरी तें सहन करून जो हंसतमुखानें वावरतो त्या मुलासारखा दुसरा मुलगा नाहीं. रडूं नकोस बाळ, मन लावून अभ्यास कर, कीं पुढल्या वर्षीं पास होशील. ”

धाकटा मुलगा विनोद उड्या मारीतच घरीं आला. तो दादापेक्षां सहा वर्षांनीं लहान होता. त्याच्याखालीं तीनचार यत्तांत होता. यावेळीं एकदम पहिला आल्यामुळें त्याला डबल प्रमोशन मिळालें होतें. मुलाच्या तोंडची ती हकीकत कळल्यामुळें आईला आनंद झाला आणि मोठ्या प्रेमानें तिनें त्याला असंख्य आशीर्वाद दिले.

दुकानचें काम उरकून खातेवह्या बगलेला मारून संध्याकाळीं वैकुंठ जेव्हां घरीं आला त्यावेळीं दोन्ही मुलांच्या परीक्षांचे निकाल त्याला कळले. त्यानें त्या बाबतींत बरेवाईट कोणतेच उद्गार काढले नाहींत. मुलांचा सर्व भार त्यांच्या आईवर सोंपवून तो निश्चिन्त असे. हातपाय धुऊन थोडासा फराळ केल्यावर पान खातखात नित्याप्रमाणें अगदीं स्वस्थपणें तो खातेवह्या पहात बसला.

## २

“ आमची आई भवानी कुठं ग ? ”—अशा हांका मारीत हातांतली काठी जमिनीवर वाजवीत शाळेंतले सहावे वृद्ध शिक्षक जयलाल बानर्जी त्या दिवशीं संध्याकाळीं वैकुंठ मुजुमदारच्या घरीं येऊन हजर झाले. वैकुंठच्या दुकानावर डाळतांदूळ, तूपतेलाची भरपूर उधारी करण्यासाठीं ते त्याच्या बायकोला ‘ आई ’ म्हणून हांक मारीत असत.

संध्याकाळचें कामकाज उरकून ओटीवर एक चटई टाकून भवानी दोन्हीं मुलांना जवळ घेऊन बसली होती. घाईघाईनें उठून तिनें एक आसन आणून दिलें. बानर्जी महाशय बैठक मारल्यावर बोलूं लागले, “ हो ! रत्नगर्भा आहेस बरं तूं ! पोटीं मुलगा यावा तर असा ! एवढ्या मुलांत तुझा मुलगा विनोद एकदम फर्स्ट ! एकदम डबल प्रमोशन ! त्याचे मार्क पाहिल्या-बरोबर हेड मास्तरसुद्धां थक्क होऊन गेले. तोंडांत बोट घालून नुसतं पाहत राहिले. पोरं शिकवतां शिकवतांच माझा जन्म गेला ना —पण तुझ्या विनोद-सारखा मुलगा आजतागायत अजून मला दिसून आला नव्हता. मी आज

अगदीं भविष्य करून ठेवतों,—हा तुझा मुलगा उद्यां हायकोर्टाचा जज्ज होईल—अगदीं होईलच होईल. ”

भवानी कांहीं बोलली नाहीं. बानर्जी महाशयांना अवसान आलें होतें. ते पुढें म्हणाले, “—नाहीं तर हा गोकळा ! हा कुठं आणि तो कुठं ? असला गाढवाचा राजा आहे हा पोर—बरं का भवानीमाई—मीच होतों परिक्षेच्या वेळीं देखरेख करायला.—कितीतरी मुलं टेबलाखालीं पुस्तकं उघडून गुपचुप कॉपी करीत होतीं. या गोकळ्याच्याच उजव्या बाजूला मल्लीकांचे दोन मुलगे पुस्तक उघडून लिहूं लागले—मी आपलं पाहिलं न पाहिल्यासारखं केलं—एवढंच नव्हे, तर डोळे मिचकावून याला इशारासुद्धां केला—पण हा बोध्या बैल हात धरून जो स्वस्थ बसला होता तो इकडे तिकडे बघेना देखील. आशु मल्लीकांचे मुलगे पास होतात अन हाच का पास व्हायचा नाहीं ? खरं कीं नाहीं ? त्यालाच विचारा ना एकदां. ” असें म्हणून मास्तरसाहेबांनीं आपली काठी गोकुळकडे वळवली—जसे कांहीं छडी चालवण्याचा हाडामांसांत मुरलेला रोजचाच व्यवसाय ते इथंसुद्धां जाणवून देत होते !

बिचारा गोकूळ घाबरून कापूं लागला. पाहतां पाहतां भवानीनें आपल्या सावत्र मुलाला हृदयाशीं कवटाळलें. गोकुळची आई हयात नव्हती. आईची त्याला आठवणसुद्धां नव्हती. सावत्र आईच्या हातींच तो वाढला होता. आज शाळेंतून जेव्हां तो रडत रडत आला तेव्हांपासून तो तिच्याजवळच होता. तिनेंही त्याला आपल्यापासून दूर जाऊं दिलें नव्हतें. हा वेळपर्यंत तो मास्तरांचें भाषण मुकाट्यानें ऐकत बसला होता.

गोकुळच्या मस्तकावर मोठ्या प्रेमानें हात फिरवीत भवानी म्हणाली, “ हो का रे बाळ, सारीं मुलं पुस्तकं पाहून लिहीत होतीं अन् तूं तेवढा स्वस्थ बसून राहिला होतास का ? पाहिलं सुद्धां नाहींस का तिकडे ? ”

गोकुळला उत्तर देतां आलें नाहीं. आपल्या दुबळेपणाचा प्रत्यक्ष पुरावा उघडकीस आल्यामुळें मुकाट्यानें मान खालीं घालून तो स्वस्थ बसला होता. पण आंत खातेवह्या तपाशीत बसलेल्या वैकुंठच्या कानीं जेव्हां हें सारें भाषण गेलें, त्यावेळीं तो हातांतलें काम बाजूला ठेवून कान देऊन ऐकूं लागला.

मोठ्या प्रेमानें हंसून भवानी म्हणाली, “ या वर्षी आतां मन लावून अभ्यास कर म्हणजे पुढल्या वर्षी तूं सुद्धां पहिला येशील ! ”

सावत्र आईच्या तोंडच्या त्या उद्गारांतील वात्सल्याची भावना बानर्जी महाशयांना ओळखतां आली नाहीं. सवतीचा मुलगा म्हणजे नावडता असायचा, हा अनादि कालापासून चालत आलेला सिद्धांत इथें तरी कां बदलेल असें त्यांना वाटलें. हें बोलणें नुसतें तोंडदेखलें आहे अशी कल्पना करून, गोकुळचा पाणउतारा करण्याकरितां टाळयाला जीभ लावून एक प्रकारचा विलक्षण आवाज करून ते म्हणाले, "आतां काय म्हणावं! हा गोकळ्या पहिला येणार? पूर्वेचा सूर्य पश्चिमेला उगवेल कीं! फर्ष्ट येणारा तो हा तुझ्या डाव्या बाजूला बसलाय—" असें म्हणून विनोदकडे बोट दाखवून थोड्याशा कोरड्या हंसण्याचा आव आणून ते पुढें म्हणाले, "—पण या पोराला कांहीं लाज शरम आहे? उलट बाकीच्या पोरांबरोबर भांडत होता. काय म्हणे, 'मी नसेन पास झालों, पण माझा धाकटा भाऊ तर सर्वांच्या डोक्यावर पहिला आलाय ना? तुमच्या कुणाच्या कुठल्या भावाला असं डबल प्रमोशन मिळालंय तें दाखवा पाहूं!' ऐकलेत ना बेट्याचे उद्गार आई? धाकटा भाऊ पहिला आला म्हणून शरम वाटायची, कीं उलट दिमाख मिरवायचा त्यासाठीं?"

भवानीच्यानें आतां रहावेना. तिनें गोकुळला जोरानें ओढून आपल्या हृदयाशीं कवटाळलें. बिचारा गोकुळ लाजेनें अर्धमेला होऊन तिच्या कुशींत डोकें खुपसून उगीच राहिला होता. आपल्या धाकट्या भावाबद्दल गोकुळला किती प्रेम होतें याची भवानीला चांगलीच कल्पना होती.

बानर्जी महाशय आणखीही इकडल्या तिकडल्या बऱ्याच गोष्टी बोलत होते. आतां एव्हांपासूनच विनोदाला घरीं शिकवायला मास्तर ठेवला पाहिजे, हेंच सांगायचा त्यांचा मुख्य उद्देश होता; पण मायलेकरांतला तो जिव्हाळा पाहून चट्कन त्यांच्या मनाला थोडासा खटका लागला. भवानीनें त्या निर्बुद्ध सावत्र मुलाला असें जवळ घेऊन कौतुक केलेलें त्यांना पटलें नाहीं. वस्तुतः यापेक्षां कांहींतरी निराळाच परिणाम होणें अवश्य होतें असें त्यांना वाटलें. अर्थात् दोन मुलांची तुलना करून जें कांहीं बोलायचा त्यांचा उद्देश होता तें बोलायची ही वेळ नव्हे, असें ठरवून त्यांनीं इकडल्या तिकडल्या गोष्टी सुरू केल्या.

हा वेळपर्यंत भवानी बहुधा मुकाट्यानें ऐकत होती. नंतर देखील ती फारसें

कांहीं बोलली नाहीं. शेवटीं रात्र होऊं लागली तेव्हां सर्व प्रकारच्या आशीर्वादाचा उच्चार करीत, भविष्यकाळीं विनोदला अगदीं खात्रीनें जज्जाची जागा मिळणार असें भविष्य करीत, हातीं काठी घेऊन बानर्जी महाशय जायला निघाले.

आंत बसलेला वैकुंठ याच संधीची वाट पहात होता. बाहेर येऊन त्यानें दरडावून विचारलें, " काय रे गोकळा, सारे बुकांत पाहून लिहून पास झाले, मग तूं कां केलं नाहींस तसं ?

गोकुळची गाळण उडाली. तो पूर्वीसारखाच लपून राहिला. बऱ्याचशा धमक्या दिल्यावर त्यानें जें कांहीं सांगितलें त्याचा भावार्थ असा—चोरी केली जाते, पुस्तक पाहून कॉपी केली जाते, याचा उल्लेख करून आदल्या दिवशीं हेडमास्तरनीं तसें न करण्याबद्दल विद्यार्थ्यांना बजावलें होतें—हेंच तें खरें कारण.

वैकुंठ कांहीं वेळपर्यंत आपल्याशींच विचार करीत राहिला होता. नंतर तो म्हणाला, " उद्यांपासून तूं शाळेंत जाऊं नकोस. माझ्याबरोबर दुकानीं ये. " असें म्हणून आपल्या खोलींत जाऊन तो आपल्या कामाला लागला.

ही नुसती मामुली जरब आहे असें समजून भवानी त्यावेळीं कांहीं बोलली नव्हती. पण दुसऱ्या दिवशीं सकाळीं दुकानांत जायच्या वेळीं वैकुंठनें गोकुळला आपल्याबरोबर बोलावलें त्यावेळीं ती एकदम भडकून उठली आणि म्हणाली, " हें काय जगावेगळं बोलणं तरी ? एवढंसं मूल, ओंठ पिळला तर दूध येईल, त्याला काय दुकानच्या कामाला लावणार तुम्ही ? तें चालायचं नाहीं. मी जिवंत आहें तोंवर गोकुळला शाळा सोडूं द्यायची नाहीं. असला राग मी तर कधीं पाहिला नाहीं !—" असें म्हणून रागारागानें मुलाला ओढून घेऊन भवानी जाऊं लागली.

थोडेंसें हसून वैकुंठ म्हणाला, " कुणाचा राग ग ? "

भवानी म्हणाली, " तुमचा. दुसऱ्या कोणाचा ? "

" मला कधीं रागावलेला पाहिला होतास तूं ? "

" तर मग हें असं कां बोलतां तें सांगा ना ? पोरवयांत सारींच मुलं पास-नापास होतात, म्हणून कुणी शाळेंतून काढलंय का त्यांना ? "

वैकुंठनें त्या वेळीं गोकुळला दुसरीकडे जायला सांगितलें. तो गेल्यावर तो

म्हणाला, " हें पहा, खरोखरच मला राग आला नाहीं. तुझ्या या मोठ्या मुलाला मी जो दुकानावर घेऊन जातोंय तो मोठ्या खुषीनं. तुझा धाकटा मुलगा उद्यां जज्ज होईल कीं नाहीं तें बानर्जीमहाशयासारखं मला कांहीं खात्रीनं सांगतां यायचं नाहीं—पण मी एवढं मात्र सांगेन—कीं उद्यां माझ्यामागं तुम्हा लोकांना कुणावर भार टाकून जर निश्चिन्त राहतां येईल, तर तें गोकुळवरच. "

नवऱ्याच्या तोंडचे ते उद्गार ऐकून भवानीचे डोळे क्षणभर ओले झाले. ती म्हणाली, " तें मला माहीत आहे. पण हा माझा गोकुळ अगदीं भोळा आहे. तुमच्या या व्यापारांतले मारपेंच कळतील का त्याला ? कदाचित सारे लोक त्याला हातोहात फसवतील. "

वैकुंठ हंसून म्हणाला, " सारेच फसवायचे नाहींत—कुणी कुणी फसवतील देखील ! पण एवढं मात्र खरं, कीं तो मात्र कुणाला फसवायचा नाहीं. एवढं झालं म्हणजे पुष्कळ झालं. आई लक्ष्मी स्वतः येऊन त्याच्या हातीं खेळत राहील. "

बोलतां बोलतां स्वतः वैकुंठच्या डोळ्याला देखील पाणी आलें. तसें पाहिलें तर धंद्याच्या बाबतींत तो पक्का माणूस होता. भांडवलाच्या अभावीं कित्येक दिवस त्याला कष्ट सहन करावे लागले होते. आतां थोडी शिल्लक हातीं आली होती खरी पण वेळही उलटून जात चालली होती. ती पूर्वीची ताकद आतां त्याच्याठायीं राहिली नव्हती. चट्कन डोळे पुसून घेऊन तो हंसून म्हणाला, " असं पहा, या वयांत केवढा मोठा लोभ दूर सारून गोकुळला बाहेर यावं लागतंय, केवढं कठीण आहे तें काम, तं तुला आज कळायचं नाहीं एवढं करायची ताकद आली, कीं धंद्यांतले मारपेंच चवदा आणे शिकतां आले असं मी म्हणेन. बाकीचे दोन आणे त्याला मी शिकवीन. "

" पण लोक काय म्हणतील ? "

" लोकांच्या म्हणण्याची बाब मी कशाला पाहूं ? मी माझ्यापुरतं पाहातों आहें. तुमचा भार त्याच्यावर टाकला, कीं मला सुखानं डोळे मिटतां येतील, एवढंच मी जाणतों. "

आज कित्येक दिवस नवऱ्याची प्रकृति सारखी ढांसळत असल्याचें भवानीला दिसून येत होतें. त्याच्या शेवटच्या उद्गारामुळें तें तिला फारच

जाणवलें. तिला रडूं कोसळलें. रडत रडत ती म्हणाली, " ठीक आहे. घेऊन जा त्याला ! "

तिनें स्वत: गोकुळला बोलावून घेतलें आणि नवऱ्याच्या हातीं सुपुर्द केलें. त्याचा मुका घेऊन ती म्हणाली, " यांच्याबरोबर दुकानीं जा बाळ. तूं करता-सवरता झालास तरच आमची धडगत. "

आईबापांच्या तोंडाकडे पाहिल्यामुळें गोकुळ आश्चर्यचकित झाला. काय वाटेल तें करून या वर्षी पास व्हायचें, अशी त्या बिचाऱ्यानें काल रात्रीं बिछान्यावर पडल्या पडल्या प्रतिज्ञा केली होती. शाळा सोडून दुकानावर काम करायला जाण्यांत कुणाही मुलाला अभिमान वाटला नसता—त्यालाही वाटला नाहीं. आजवर त्यानें कधींही आपल्या आईची अवज्ञा केली नव्हती. म्हणूनच आपले शाळासोबती आपली थट्टा करतील ही जाणीव मनाला डांचत असतांनासुद्धां कोणत्याही प्रकारें नाराजी न दाखवतां तो मुकाट्यानें आपल्या बापाबरोबर निघून गेला.

## ३

दहा वर्षे निघून गेलीं. म्हातारा वैकुंठ मरणाच्या दारीं उभा राहिला होता. गोकुळच्या बाबतींत त्यानें केलेली अपेक्षा खोटी ठरली नाहीं हें त्या घराकडे नजर टाकतांच कळून आलें असतें. आतां तें आळींतलें किराण्याचें छोटें दुकान राहिलें नव्हतें. तो आतां बडा मोठा स्टोअर झाला होता. तिथें लाखों रुपयांचा कारभार चालत होता.

विनोद कलकत्त्याला एम. ए. चा अभ्यास करीत होता. नातवंडांचा तांडा पाहून वैकुंठनें आनंदानें देह ठेवला असता; पण धाकट्या मुलाच्या बाबतींत ज्या ओंगळ बातम्या अलीकडे येऊं लागल्या होत्या त्यामुळें आयुष्याचे हे अखेरचे क्षण त्याला अवजड वाटूं लागलें होतें.

आज शेवटची हांक आली, असें त्या दिवशीं सकाळीं वैकुंठला वाटलें. अस्वस्थपणाची पराकाष्ठा झाली असें वाटून त्यानें आपल्या पत्नीला बिछान्या-जवळ बोलावून घेऊन तशा त्या परिस्थितींतसुद्धां मुद्रेवर हसूं आणून म्हटलें,

" माझी घटका भरत आली. थोडा आधीं जातोंय मी. तूं इथं आहेस तोंवर या माझ्या दोन्हीं मुलांवर नजर ठेव. आतां त्यांना तुझ्या हवालीं केलंय. "

नवऱ्याचा शुष्क झालेला हात हातीं घेऊन एक शब्दसुद्धां न बोलतां भवानी रडूं लागली.

वैकुंठ बोलत होता, "—गोकुळला मागं ठेवून त्याची आई निघून गेली. पुनः लग्न करायची माझी इच्छा नव्हती. केव्हांही मी लग्न केलं नसतं—पण ज्यावेळीं मी पाहिलं, कीं मी एकटा,—गोकुळला लहानाचा मोठा करणं माझ्या करवीं व्हायचं नाहीं,—त्या वेळीं जिवाचा धडा करून भीतभीत लग्नाला तयार झालों. देवानं माझं मन पारखलं होतं म्हणून तुझ्यासारखी पत्नी मला मिळाली.—म्हणूनच मला पश्चात्ताप करायची पाळी आली नाहीं. आयुष्याच्या या शेवटच्या क्षणांत विनोदनं जर मला दुःख द्यायला सुरवात केली नसती तर आज मी मोठ्या आनंदानं देह ठेवला असता. "

बोलतां बोलतां त्याच्या डोळ्यात आसवें जमा झालीं. भवानीनें आपल्या पदरानें त्याचे डोळे पुसले खरे पण इकडे तिचे स्वतःचे डोळे मात्र आसवांनीं भरून आले होते.

वैकुंठ बोलत होता, "—मला मरणं कठीण जातंय. विनोदच्या हातीं दुकान गेलं तर माझ्या गैरहजेरींत दोन दिवसांत तो त्याची धुळधाण करील ! परलोकांत माझ्या आत्म्याला समाधान मिळायचं नाहीं—तिथंही माझ्या जिवाला टोंचण्या लागतील !—"

थोडा वेळ थांबून तो म्हणाला, "—एवढ्यावरच का थांबणार आहे ? तुलासुद्धां पायाखालीं जमीन मिळायची नाहीं उभं रहायला—गोकुळला-देखील आपलीं पोरंबाळं घेऊन रस्ता गांठावा लागेल —"

बोलतां बोलतां वैकुंठच्या सर्वांगाला कांपरें भरलें. अपेक्षित दुर्घटनेच्या कल्पनेनें त्याच्या हृदयाची हालचाल सुद्धां बंद पडेल कीं काय असें वाटूं लागलें. भवानी घाबरीघुबरी झाली. नवऱ्याच्या तोंडाजवळ तोंड नेऊन रडत रडत ती म्हणाली, " विनोदला कांहींसुद्धां देऊं नका. रक्ताचं पाणी करून तुम्ही उभारलेला हा धंदा भलत्या हातीं जातां नये. दुकान, घर, वाडी, विषयसंपत्ति जें जें म्हणून कांहीं आहे तें सारं गोकुळच्या नावें करून ठेवा. तुम्ही शांत व्हा—अगदीं निश्चिन्त व्हा—मी स्वतः साक्षी राहीन या देणगीला ! "

पत्नीच्या तोंडाकडे पहात राहिलेल्या वैकुंठच्या हृदयांतून एक मोठा सुस्कारा बाहेर पडला. तो म्हणाला, " रात्रंदिवस मी एवढा एकच विचार करतोंय—देवाचं नांव घ्यायला सुद्धां अजून मला सुचत नाहीं—खरोखरच का तुला पसंत आहे हें ? " असें म्हणून वैकुंठनें हताशपणानें आणखी एक सुस्कारा सोडला. भवानीचें काळीज फाटून गेलें. मरणोन्मुख नवऱ्याच्या छातीवर डोकें ठेवून गहिंवरल्या वाणीनें ती म्हणाली, " होय हो होय—माझी संमति आहे. तुमच्या पायाला हात लावून सांगतें, मला कबूल आहे. मला दुसरं कांहीं नको, तुम्ही निश्चिन्त झालां कीं मला सारं कांहीं मिळालं ! या क्षणाला तरी तुमच्या मनाला त्रास नको व्हायला. "

वैकुंठ पुन्हा कांहीं वेळ स्वस्थ राहिला आणि थोडा वेळ विचार करून म्हणाला, " पण विनोद ? "

एक क्षणाचा सुद्धां विलंब न लावतां भवानी म्हणाली, " त्याची काळजी तुम्हाला नको तो आतां शिकलासवरलाय—स्वतःचा भार घ्यायला समर्थ झालाय. तो कसा का वागेना पण माझा गोकुळ त्याची उपेक्षा करायचा नाहीं—धाकट्या भावाची काळजी तो घेईलच घेईल. "

यानंतर वैकुंठ कांहीं बोलला नाहीं. समाधानाचा निश्वास सोडून तो पाठ फिरवून झोपीं गेला. भवानी तशीच दगडाच्या पुतळीसारखी त्याच्याजवळ बसून राहिली होती. तिच्या मनाला यातना होत होत्या. डोळयांतून सारख्या पाण्याच्या धारा लागल्या होत्या. आपल्या पोटच्या गोळयावर आपल्या नवऱ्याचा विश्वास नाहीं—अविश्वासू म्हणून हक्काचा वारसा दूर करण्याचा प्रसंग यावा,—या जाणीवेनें तिच्या हृदयाला बाण भेदल्यासारखें झालें. तिनें त्याची खिजगणती केली नाहीं. मुलगा बरा असो कीं वाईट असो. ती आईच होती ना त्याची ? तिच्याच पोटचा गोळा होता ना तो ? आपल्या या दुर्दैवी मुलाचा भविष्यकाल अंधकारमय असल्याचें तिला उघड उघड दिसत होतें. तिच्या मातृहृदयाला फांसण्या लावल्यासारख्या झाल्या होत्या.

पण मागें हटून निभावतां येईल असा कोणताही मार्ग तिला नजरेसमोर दिसत नव्हता. मरणोन्मुख झालेल्या नवऱ्याच्या समाधानासाठीं पोटच्या गोळयाचा सर्वनाश करण्याचा मार्ग तिनें स्वतःच दाखवून दिला होता. आतां त्या मार्गापासून तिला परावृत्त करण्याचें कुणाच्याच हातीं राहिलें नव्हतें.

त्या दिवशीं दुसऱ्या प्रहरीं वकिलाला बोलावून रीतसर मृत्यूपत्र करण्यांत आलें. वैकुंठनें आपली स्थावर जंगम मिळकत आपल्या मोठ्या मुलाच्या नांवें लिहून दिली.

साक्ष घालण्यासाठीं सही करतांना भवानीचा हात कापूं लागला. आईचा जिव्हाळा कुठल्या तरी सांदीकोपऱ्यांतून पुढें येऊन तिचा हात दाबून धरूं पहात होता—पण तो मागें खेंचला गेला नाहीं. नवऱ्याचीं पावलें अंतरंगांत कवटाळून मोडक्या तोडक्या अक्षरानें तिनें त्या मृत्युपत्रावर साक्ष म्हणून सही केली.

विनोदला ही गोष्ट कळली नाहीं. कलकत्त्याच्या एका घाणेरड्या गल्लींत, त्याहीपेक्षां घाणेरड्या अशा सहवासांत त्यावेळीं तो झिंगून पडला होता. त्याला घेऊन जाण्यासाठीं जे दोघे नोकर आले होते, ते तो घरीं आला नाहीं असें पाहून दोन दिवसांनीं परत गेले. ही हकिकत वैकुंठच्या कानीं घालण्याचें धैर्य कुणाला झालें नाहीं. त्यानें त्या बाबतींत कुणाला कांहीं विचारलें नाहीं—तरीही त्याला सारी कल्पना येऊन चुकली होती.

आणखी दोन दिवस तो कसाबसा मृत्यूशीं झगडत होता. सकाळपासून त्याचा श्वास अवघडूं लागला होता. सारा दिवस त्याच्या डोळयांवर झांपड होती. संध्याकाळच्या सुमाराला त्यानें डोळे उघडले. भवानी त्याच्या उशाशीं बसली होती. गोकुळ त्याच्या पायथ्याशीं बसून रडत होता. वैकुंठनें डोळयाच्या खुणेनें त्याला अगदीं जवळ बोलावलें आणि अत्यंत क्षीण आवाजांत विचारलें ! "विनोदला कळलं नाहीं का गोकुळ ? नाहींतर इतक्यांत आला पाहिजे होता तो !"

बोलतां बोलतां त्याच्या डोळयांच्या कोपऱ्यांतून एक आसूं खालीं पडलें. कांहीं दिवस त्यानें एकदांसुद्धां विनोदच्या नांवाचा उच्चार केला नव्हता. शेवटच्या घटकेला नवऱ्याच्या तोंडून मुलाचें नांव निघालेलें ऐकतांच भवानीच्या हृदयाला केवढा तरी मोठा धक्का बसला, तरीही ती एक शब्द-सुद्धां न बोलतां खालीं मान घालून बसून राहिली होती. बापाच्या डोळयांतलीं टिपें गोकुळनें पुसलीं—तेव्हां तो म्हणाला, "शेवटीं त्याला डोळे भरून पाहिलं नाहीं. त्याला म्हणावं, माझा आशीर्वाद आहे.—कधीं ना कधीं एक दिवस तो ताळयावर येईल. असल्या आईच्या पोटीं जन्म घेणारं लेकरूं असंच

रहायचं नाहीं जन्मभर. समजलास बाबा ! अशी वेळ येईल त्या वेळीं आपल्या धाकट्या भावाला दूर लोटूं नकोस. आणि ही तुझी आई—अनेक जन्मींचं पुण्य फळाला यावं तेव्हां अशी आई मिळते बरं गोकुळ !—"

गोकुळ एखाद्या पोरासारखा रडूं लागला. तो म्हणाला, "माझी आई माझ्याकडेच असायची. तिची काळजी नको बाबा. पण विनोदला मात्र आपण इस्टेटीचा अर्धा भाग देऊन जा."

वैकुंठ म्हणाला, "नाहीं गोकुळ, या मिळकतीपायीं मी रक्ताचं पाणी केलंय—तिची वाताहात झाली तर परलोकांतसुद्धां मला समाधान मिळायचं नाहीं. कांहीं झालं तरी तें सहन व्हायचं नाहीं मला—"

बोलतांना त्याला थकवा आला. किती वेळ तरी तो मुलाच्या तोंडाकडे पहात राहिला होता. मनांतल्या मनांत त्याला शेवटचा आशीर्वाद देऊन त्यानें डोळे झांकले. त्याच्या पायावर पडून गोकुळ फिरून रडूं लागला.

मोठ्या कष्टानें त्यानें पाठ फिरवली. तोंडांतल्या तोंडांत तो म्हणाला, "आतां हीं मुलं तुझ्या स्वाधीन भवानी !—मी चाललों." यानंतर तो कांहीं बोलला नाहीं. दुसऱ्या दिवशीं सूर्योदयाबरोबरच त्याचा प्राण देह सोडून निघून गेला.

त्यावेळीं अनेकांनीं अनेक परीनें बोलायला सुरवात केली. वैकुंठ हा जसा पक्का व्यवसायी होता तसाच तो वृत्तीनें सरळ होता. अगदीं दारिद्र्यांतून एवढ्या मोठ्या योग्यतेला आल्यामुळें त्याच्या शत्रूंची आणि मित्रांची संख्या सारखीच मोठी होती. मित्रपक्षाकडून होत असलेलें गुणगान जसें अतिशयोक्तीनें भरलेलें होतें, तशीच शत्रुपक्षाकडील होत असलेली निंदा देखील अमर्याद होती. कुणी त्याला कृपण म्हणत होते, कुणी दानशूर म्हणून वैकुंठच्या करंगळीला कदलीकाण्डाची उपमा देऊन स्वतःवर खूष होत होते. कुणी कांहींही म्हटलें तरी एका बाबतींत मात्र सर्वांचें एकच मत होत होतें,— कसाही असो, तो लुच्चा नव्हता कीं लबाडही नव्हता. आपलें जें कांहीं येणें असेल त्यापेक्षां कुणाकडून त्यानें एक पैसा जास्त घेऊन कुणाची फसवणूक केली नाहीं. आपल्या धंद्याच्या बाबतींत त्यानें हीच विद्या आपल्या मोठ्या मुलाला शिकवली होती. वैकुंठ वारंवार म्हणे, "गोकुळ, माझं एवढं सांगणं कधीं विसरूं नकोस बाबा, कीं कुणाची फसवणूक करून कुणाला मारतां येत नाहीं. त्यामुळं शेवटीं स्वतःवरच मरायची पाळी येते." डोक्याचे पिकले

केस दाखवून तो म्हणे, " या माझ्या माथ्यावरून पुष्कळ वारे वावटळी येऊन गेल्यायत गोकुळ—अनेक हालअपेष्टा भोगल्यायत मी—पण त्यामुळं कधींही माझं माथं मी कुणापुढं वांकवलं नाहीं. माझी एवढी इज्जत कायम राख बाबा."

## ४

विनोदला मिळकतीचा वांटा मिळाला नाहीं ही बातमी ज्यावेळीं बाहेर आली, त्यावेळीं गांठचा पैसा खर्च करून चारपांच जण कलकत्त्याला जाऊन त्याचा शोध करूं लागले.—आणि मग मात्र सारी हकिकत उघडकीस आली. त्यांनीं परत आल्याबरोबर तिकडे विनोद करीत असलेल्या उपद्व्यापांची हकिकत सर्वांसमोर मांडली. पण आश्चर्य हें, कीं त्यांनीं दिलेला हा उपकाराचा बोजा उचलून घ्यायला कृतघ्न गोकुळ तयार नव्हता. एकदम रागाला येऊन तो फट्कन् बोलून गेला, " साले सारे लबाड ! मत्सरानं जळताहेत—भलत्या कंड्या पिकवताहेत ! "

आतां जख्ख म्हातारे झालेले बानर्जी महाशय काठी टेकीत टेकीत येऊन एकदम रडायला लागले. एकदाचें त्यांचें रडें थांबलें त्यावेळीं ते म्हणाले, " गोकुळ रे, आमचा हारू तीन दिवस आणि तीन रात्री न खातां आणि न पितां कलकत्त्याच्या गल्ल्याकुच्यांतून सारखा धुंडाळीत होता. पंचवीस तीस रुपये खर्ची पडले, तेव्हा कुठं त्याला त्या बेटयाचा पत्ता लावतां आला. नाहीं-तर कुणाची टाप लागली होती त्याचा ठावठिकाणा मिळवायची ?—"

तिरसटपणें गोकुळ म्हणाला, " मी कांहीं कुणाला पैसा खर्च करायला सांगितलं नव्हतं महाशय ! "

थक्क होऊन बानर्जी म्हणाले, " असं कसं म्हणतोस गोकुळ ? किती झालं तरी आम्ही तुझीं घरचीं माणसं. बाकीचे लोक बसतील उगीच—पण आम्हाला बसतां येतं का ? "

" बरं बरं जा—जा आपल्या कामाला जा ! " असें म्हणून गोकुळ तिथून निघून गेला.

दिवसामागून दिवस जात होते तरी विनोद येत नव्हता. शांतस्वभावी गोकुळ आतां एकदम भडकून उठला होता.

भवानीला पाहिलें तर तिला ओळखतां आलें नसतें, इतका या थोड्या दिवसांत तिच्यांत बदल झाला होता. खालीं मान घालून मुकाट्यानें ती श्राद्धाची तयारी करीत होती—मुलाचें नांव सुद्धां काढित नव्हती. या एका वर्षांत कांहीं ना कांहीं निमित्त करून विनोदनें गोकुळकडून बराच पैसा वसूल केला होता. विनोदची बायको मनोरमा ही कल्पना असल्यामुळें वारंवार नवऱ्याला पूर्वीपासूनच टोंचणी लावित असे, तरीही तो तिकडे कान देत नसे. आज सकाळीं हाच उल्लेख पुन्हा निघाल्यामुळें गोकुळ एकदम भडकला आणि म्हणाला, " कुणाच्या बापाचा पैसा ज्याअर्थी विनोद खर्च करीत नाहीं, त्याअर्थी काय म्हणून कुणी उठाठेव करावी ? "

तसाच तणतणत तो आपल्या सावत्र आईच्या खोलीकडे आला आणि मोठ्यानें ओरडून म्हणाला, " बायकांच्या बुद्धीनं रावणासारख्यांचीं राज्यं वंशासकट रसातळाला गेलीं, तिथं आमची काय कथा ! हळूच बाबांच्या कानाला लागून गुपचुप हें मृत्युपत्र करण्याची सल्ला दिलीस आई, त्यामुळं वाताहात झाली चोहींकडे माझी. "

आश्चर्यचकित होऊन भवानीनें नुसतें वर पाहिलें, त्यासरशीं मारे हातवारे करीत तो ओरडून म्हणाला, " तुला मी सज्जन म्हणून समजत होतों आई, पण तूंही कांहीं कमी नाहींस. बायकांची जातच ही अशी ! "

अशा प्रकारें पडलेल्यावर पेटण्याचे घाय देऊन जसा आला होता तसा तो निघून गेला.

सारेच म्हणत असत—आधीं दुकानदार—त्यांतून मूर्ख—त्यांतून रागाला आला कीं बेट्याच्या जीभेला हाड नाहीं—हें आतां सर्वांना कळून चुकलें होतें. पण अलीकडे त्याचा हा फटकळपणा पराकाष्ठेला गेला आहे असेंच—आपल्यांना आणि परक्यांना—सर्वांनाच वाटूं लागलें होतें.

तिसऱ्या प्रहरीं वामकुक्षी आटोपून बानर्जी महाशय तोंड धुऊन बाहेर येत होते तोंच गोकुळ येऊन तिथें हजर झाला. त्या दिवशीं त्यानें त्यांचा अपमान केला होता खरा, पण किती झालें तरी तो मोठा माणूस—अर्थात तो आल्या-मुळें म्हाताऱ्याची धांदल उडाली. तीन नोटा काढून ब्राह्मणाच्या पायाजवळ ठेवून तो विनयपूर्वक म्हणाला, " मास्तर महाशय, आपल्या हारूच्या खर्चाचे पैसे द्यायला आलोंय. "

" राहूं दे. राहूं दे. त्याची एवढी कसली घाई होती दादा ?—एवढं तुमच्या घरचं दिलंघेतलं आहे आम्ही—" असें म्हणून बानर्जी महाशयांनीं तिन्ही नोटा उचलून खिशांत घातल्या.

गोकुळच्या डोळ्यांतून आसवें गळत होतीं. उपरण्याच्या पदरानें डोळे पुसून तो म्हणाला, " अजून विनोद कसा आला नाहीं मास्तर ? तुमच्या हारूला बरोबर घेऊन मी आज स्वतःच जाऊन येतों. "

सारें आंग खुदळीत बानर्जी महाशय तिरमिरीनें म्हणाले, " छे, छे असलं कांहीं बोलूं नकोस बाबा ! माझा हारू असतांना असल्या जागीं तूं जाणार ? नाहीं नाहीं—ते होणार नाहीं. उद्यांच मी पाठवतों त्याला. "

गोकुळ म्हणाला, " नाहीं मास्तरमहाशय, मलाच गेलं पाहिजे. तो मोठा मानी आहे. मृत्युपत्राची हकिकत त्याला कळली असेल अन् म्हणूनच रागारागानं तो येत नसेल. प्रत्यक्ष माझ्यातोंडून ऐकल्याशिवाय त्याची खात्री व्हायची नाहीं. कसा माझ्या आईबापांनीं सत्यानाश केला हा माझा ! " असें म्हणून गोकुळ स्फुंदत स्फुंदत रडूं लागला. बानर्जी महाशयानीं अनेक प्रकारांनीं त्याची समजूत घातली, अशा परिस्थितींत गोकुळनें त्या जागीं जाणें इष्ट नाहीं हें त्याला पटवून दिलें, आणि उद्यांच्या उद्यां हारूला पाठवून त्याला आणून हजर करतों असें पुन्हा पुन्हा प्रतिज्ञा करून सांगितलें. गोकुळचा नाइलाज झाला. हाराणच्या खर्चासाठीं आणखी पांच नोटा त्याच्या हातीं ठेवून डोळे पुशीत पुशीत तो आपल्या घरीं निघून गेला.

## ५

जयलाल मास्तरला गोकुळनें गुप्तपणें ऐशीं रुपये लांच दिला—ही हकिकत बाहेर येईपर्यंत पुष्कळ जण त्याच्या निर्बुद्धपणाचा उल्लेख करून त्याला नांवें ठेवीत होते. तो विनोदसाठीं तळमळत होता—आणि तिकडे विनोद त्याच्याकडे ढुंकूनसुद्धां पहात नव्हता—ही गोष्ट घरादारांतल्या साऱ्या माणसांना अगदीं उघड उघड कळून चुकल्यामुळें गोकुळ मनांतल्या मनांत झुरत चालला होता.

आजपर्यंत घरची गाडी चूंचुडा स्टेशनवर निदान दहा वेळ तरी जाऊन आली असेल. गोकुळ खवचटपणें कोचमनला विचारी, " अरे, परत

आलास तो काय कलकत्त्याची गाडीच नाहीं ? जा, जा. एक चक्कर मारून ये बा."

कोचमन अदबीनें उत्तर देई, "आणखी दोन गाड्या यायच्या आहेत खऱ्या पण घोड्याला दाणापाणी दिलं नव्हतं म्हणून यावं लागलं परत."

एकदम सप्तमांत आवाज चढवून गोकुळ त्याला धमकावून म्हणे, "छोटे बाबू काय असे मेवामिठाई खाऊन येणार आहेत, म्हणून याच्या नबाबी घोड्याला घटकाभर दाणापाणी मिळालं नाहीं म्हणून घाई झाली ? जा— असाचा असा जा आणि घेऊन ये."

धन्याचा उद्देश चांगलासा न कळल्यामुळें बिचारा कोचमन घाबऱ्याघाबऱ्या सलाम करून निघून जात असे.

घरचा कारभारी रसिक चक्रवर्ति हा फार दिवसांचा जुना नोकर होता. घरांतील सारीं माणसें त्याला वडिलकीच्या नात्यानें वागवीत. तो म्हणे, "छोटेबाबू आले तर भाड्याची गाडी करून येतील. त्यासाठीं एवढे रागावतां कां बडेबाबू ?"

रसिक जवळच असल्याचें गोकुळनें पाहिलें नव्हतें. तो ओशाळून म्हणाला, "मी रागावतों आहें तो त्या दळभद्र्यासाठीं, असं का तुम्हाला वाटलं ? तुम्हाला काय वाटलं चक्रवर्ति महाशय ? घरांतलीं हीं बायकामाणसं रात्रंदिवस रडारड करताहेत म्हणून—नाहींतर या घरांत पाऊल टाकूं दिलं नसतं त्याला. गोकुळ मुजुमदार रागावला कीं बापाला बाप म्हणायचा नाहीं !—हो !"

रसिकला सारें कांहीं माहीत होतें. विनोद आला नाहीं म्हणून घरच्या बायकामाणसांनीं केव्हांही डोळ्यांतून एक टिपसुद्धां गाळलें नव्हतें हें सर्वांना चांगलें माहीत होतें पण या बाबतींत वाद घालणें मुळीं शक्यच नव्हतें.

मोठ्या थाटानें बापाचा श्राद्धविधि गोकुळनें केला. त्यावेळीं तो सारखा गडबडींत असे—पण कितीही गडबड असली तरी त्याचे कान असत बाहेर, गाडीचा आवाज येतोय कीं नाहीं तें ऐकण्याकडे. थोड्या वेळानें बऱ्याच लांबून एका मोठ्या गाडीचा आवाज ऐकूं आल्याचा भास झाल्यामुळें त्यानें रसिक चक्रवर्तिला कानोसा घ्यायला सांगितलें. एका नोकराला बोलावून तो म्हणाला, "अरे, जरा पुढं जाऊन पहा गाडी आमचीच कीं नाहीं ती ? बिचाऱ्या घोड्यांना मारून हैराण केलं म्हणून रागावून बोललों, तो बेटा खरोखरच गाडी घेऊन परत स्टेशनवर गेला ! कशाला पाठवावयाला हवी

गाडी या गुणी बाळासाठीं ? सावत्र आईला राग येईल म्हणून काय घोड्यांना असं बडवून मारायचं ? "

रसिकनें नुसतें ऐकून घेतलें पण बरेंवाईट कांहींच उत्तर दिलें नाहीं. थोड्या वेळानें रिकामी गाडी परत आली आणि तबेल्यांत निघून गेली. नोकरानें येऊन खबर दिली. रसिक समोरच होता त्याच्याकडे पाहून अगदीं रुक्षपणें हंसत गोकुळ म्हणाला, " असा हा छळ चाललाय माझा ! जा, जा घरांत जाऊन सांग आईला तिच्या परीक्षावाल्या मुलाची कीर्ति ! उद्यांपरवां जर केव्हां आला तर कसा फाटकाच्या आंत पाऊल टाकतो तें पाहीन ? मग तुम्ही म्हणाल कीं—हो !—गोकुळ मुजुमदाराचा मुलगाच नव्हे. एकदां वांकडा होऊन बसलोंय, कीं मग स्वतः ब्रह्मा विष्णू महेश त्याची तरफदारी करायला आले तरी त्यांचीसुद्धां पर्वा करायचा नाहीं—सांगून ठेवतोंय ! तुम्ही जाऊन आईला सांगा चक्रवर्ति महाशय,—म्हणावं पृथ्वी उलटीच्या पालटी झाली तरी गोकुळ मुजुमदार तिळाएवढा ढळायचा नाहीं आपल्या शब्दापासून. वेळीं आला असता तर मिळालं असतं कांहींतरी—आतां एक दमडीसुद्धां टिचायचा नाहीं म्हणावं ! कसा घरांत पाऊल टाकतो तो पहातों !" बोलत बोलत तणतणत गोकुळ घरांत निघून गेला.

कुणावरचा राग काढण्यासाठीं अवेळीं घरीं परत येऊन संध्याकाळीं गोकुळ बिछान्यावर पडला तें घरांतल्या बायकांना कळलेंसुद्धां नाहीं. घरच्या दाईनें दूध घ्यायचा आग्रह केला त्यावेळीं तो वसूकन् तिच्या अंगावर आला. शास्त्रीपंडितांची संभावना करायची यादी तयार करायचें काम दुकानच्या गुमास्त्याकडे दिलें होतें. तो येऊन कांहींतरी प्रश्न विचारूं लागला. त्यासरशीं ताड्कन् उठून गोकुळनें त्याच्या हातचे कागद काढून घेतले आणि त्याच्या चिंध्या चिंध्या केल्या. तो म्हणाला, " असे कांहीं पांच-पंचवीस गांव ठेवून बाबा गेले नाहींत, कीं राजेरजवाड्यांसारखी शास्त्रीसंभावना करायला हवी ? जा, जा, ही असली अमिरी चाल नाहीं माझ्याकडे चालायची !" बिचारा गुमास्ता शरमिंदा होऊन निघून गेला.

तो असा अस्वस्थ झाल्याचें कळल्यामुळें भवानी दाराच्या उंबरठ्याजवळ येऊन बसली. मोठ्या प्रेमानें तिनें विचारलें, " आज तुला बरं वाटत नाहीं का रे गोकुळ ?"

पडल्या पडल्या गोकुळनें उत्तर दिलें, " नाहीं. "

भवानी म्हणाली, " नाहीं ? मग कांहीं खाल्लं नाहींस का ? अवेळीं येऊन असा झोंपून कां राहिलास ? "

गोकुळ म्हणाला, " राहिलोंय झोंपून ! "

क्षणभर थांबून भवानीनें पुन्हा विचारिलें, " शास्त्रीपंडितांच्या दक्षिणेची यादी कां फाडून टाकलीस ? उद्यां सकाळीं आमंत्रणं गेलीं नाहींत तर पुढं वेळ कुठं आहे बाबा ? "

तशाच प्रकारें गोकुळनें उत्तर दिलें, " नाहीं तर नाहीं ! "

भवानीला जितकें आश्चर्य वाटलें तितका थोडासा रागही आला. ती म्हणाली, " हें काय गोकुळ, अशा वेळीं असं करणं शोभतं का ? काय झालंय, सांग ना मला—मी सारं कांहीं ठाकठीक करतें ? "

आईच्या प्रश्नाचें उत्तर देण्यासाठीं गोकुळ बिछान्यावरून उठून एवढे मोठाले डोळे करून पहात बसला. कुणाजवळ कसें बोलावें हें तो कधीं शिकलाच नव्हता. तो तणतणत म्हणाला, " तुझी सल्ला ऐकेल आई त्याच्या सारखा गद्धा कुणी नाहीं ! बाबा तुझं ऐकत होते म्हणून मी कां ऐकावं ? दहा ब्राह्मण घालून मी मोकळा होईन. मला तें अवडंबर नको ! " असें म्हणून लगेच भिंतीकडे तोंड करून तो निजून राहिला.

भवानी शांतपणें म्हणाली, " हें काय बाबा ? ते गेले म्हणून त्यांच्या-बद्दल असं बोललेलं चालेल का ? "

गोकुळनें उत्तर दिलें नाहीं. तो कांहीं बोलत नाहीं असें पाहून ती म्हणाली, " असं भलतंच कांहीं केलंस तर लोक काय म्हणतील बेटा ? ज्याचा जसा दर्जा, त्यानं त्या दर्जाला शोभेसं कांहीं केलं पाहिजे ना ? तसं नाहीं केलं तर बदनामी होईल. "

तसाच पडून राहून गोकुळ म्हणाला, " करा बदनामी म्हणावं साल्यांना ! कुणाची पर्वा नाहीं मला. असल्या बोलाच्या मारानं घाबरून कांहीं मी मरायचा नाहीं. "

भवानी म्हणाली, " पण स्वर्गांत त्यांचं समाधान होईल का अशानं ? एवढा विषय मागं ठेवून गेले आहेत ते, त्याला साजेसं कांहीं केलं नाहीं, तर त्यांचा आत्मा कसा शांत होईल ? "

भवानीनें बुद्धिपुरस्सर त्याच्या काळजाला हा चिमटा घेतला होता. बापावर त्याचें किती प्रेम होतें तें तिला माहीत होतें.

गोकुळ उठून बसला आणि रडकुंडीला येऊन म्हणाला, " खर्चाची गोष्ट कुणी काढलीय आई ? जेवढा वाटेल तेवढा खर्च करा तुम्हीं. पण एकेक दिवस जातो आहे तसतसे माझे हातपाय गळाठत येताहेत. तिकडे विनोद रागारागानं तोंड फिरवून बसला आहे—इथं मी एकटा काय करूं आई ? "

बोलतां बोलतां त्याला आंतून भडभडून आलें आणि तो रडूं लागला. दुःखाचा उमाळा येऊन भवानीही रडूं लागली. बराच वेळ गेल्यावर पदरानें डोळे पुसून तशाच रडक्या आवाजानें तिनें विचारिलें, " त्याला हें कळलं आहे का रे गोकुळ ? "

गोकुळ एकदम म्हणाला, " कळलं आहे तर काय ! "

" कुणी त्याला कळवलं ? "

त्यांच्यावर ओढवलेल्या या प्रसंगाची बातमी त्याला कुणी कळवली कीं नाहीं, हें स्वतः गोकुळला माहीत नव्हतें. मास्तर महाशयाचा मुलगा हारू याच्या बाबतींत सुद्धां आतां त्याला संशय उत्पन्न झाला होता. तरीसुद्धां त्याला वाटत होतें, कीं त्याला ही बातमी कळली आहे—कळून सवरून विनोद येत नाहीं, तो एक शरमेमुळें तरी किंवा चिडीला आल्यामुळें.

आईच्या तोंडाकडे पाहून तो म्हणाला, " आई, हें त्याला कळलंय. बाबांना आपण कायमचे अंतरलोंय हें काय त्याला अजून कळलं नसेल ? माझ्या-सारखाच त्याच्या काळजांत आगीचा डोंब नसेल का उठला ? त्याला सारं कळलंय आई ! "

थोड्या वेळानें भवानी ज्यावेळीं बोलूं लागली त्यावेळीं गोकुळ आश्चर्य-चकित झाला. आतां तिच्या आवाजांत तो दुःखाचा गहिंवर नव्हता, कीं रागाचा ताठरपणाही नव्हता. अगदीं सहजगत्या ती म्हणाली, " हें जर खरं असेल गोकुळ, तर असल्या भावासाठीं तूं स्वतःला मुळींच त्रास करून घेऊं नकोस. असं समज, कीं आमच्या कुळांत आतां दुसरं मूल नाहीं. रागाच्या आहारीं जाऊन जो मुलगा बापाला शेवटची तिलांजली द्यायला घरीं येत नाहीं त्याचा आमचा आतां कसलाच लागाबांधा नाहीं ! "

यावर काय उत्तर द्यावें तें गोकुळला सुचेना. तो उगीच राहिला. उत्तर दिलें तें त्याच्या बायकोनें. दाराआड उभी राहून ती सारें भाषण ऐकत होती, तिथूनच ती चांगल्या खड्या आवाजांत म्हणाली, " मामंजीनीं नकळत का तसं कांहीं केलं ? ते होते अंतर्ज्ञानी. तीन चार दिवस तपास केला कलकत्त्याला, भावजींचा कांहीं पत्ता लागला नाहीं, तेव्हांच त्यांना त्याचे सारे चाळे कळून चुकले. एवढं झाल्यावर त्यांनींच जर सारी मिळकत आम्हाला देऊन टाकली तर कोण कशाला आम्हाला नांवं ठेवील ? उठल्या सुटल्या तुम्हीं ' माझा भाऊ माझा भाऊ ' करतां—"

तिचें बोलणें पुरें झालें नाहीं. दुसरा कुणी असता तर त्यानें काय केलें असतें तें सांगण्याची जरूरी नाहीं असेंच सूनबाईला वाटलें असावें—पण भवानी मात्र मनांतल्या मनांत अत्यंत आश्चर्यचकित झाली. या पूर्वी, सासरा हयात असतांना, सूनबाई अशा प्रकारें कधींच कांहीं बोलली नव्हती—एवढेंच नव्हे, तर सासूच्या समोर नवऱ्याला उद्देशून ती कधीं बोललीच नव्हती. इतक्या थोडया अवधींत तिची एवढी मोठी प्रगति झालेली पाहून भवानी थक्क झाली.

पहिल्यानें गोकुळला धक्का बसल्यासारखें होऊन तो स्वस्थ राहिला होता पण लगेच उघड्या दरवाजाच्या उजव्या बाजूला हात करून भवानीकडे पाहून तो पिसाळल्याप्रमाणें ओरडून म्हणाला, " ऐक आई, ऐक. हलकटाच्या पोरीची ही भाषा ऐक ! "

सूनबाई उत्तर द्यायला सरसावली त्यावेळीं ओरडली नाहीं खरी, पण आवाजांत थोडासा जोर आणून नवऱ्याला उद्देशून ती म्हणाली, " हें पहा, जें बोलायचं असेल तें मला बोला. उगीच बाप काढूं नका कुणाचा. जसा माझा बाप तसा तुमचा बाप ! "

उत्तर देण्यासाठीं गोकुळचे ओंठ थरथरले पण तोंडावाटे शब्द बाहेर आला नाहीं. त्याच्या डोळ्यांवाटे जणुं काय आगीच्या ठिणग्या उडत होत्या.

हा वेळपर्यंत भवानीं उगीच राहिली होती. शांतपणें पण तितक्याच जरबेच्या आवाजानें ती म्हणाली, " असं बोलणं बरं नव्हे सूनबाई. जा, आपल्या कामाला जा. "

सुनबाई म्हणाली, "मी केव्हांच कांहीं बोललें नाहीं सासूबाई. मोलकरणी-सारखी राबायला आलेंय—रात्रंदिवस राबत मरतेंय. रोज खातां पितां उठतां बसतां हे 'माझा चार परीक्षेवाला भाऊ—माझा पांच परीक्षेवाला भाऊ' म्हणून डांगोरा पिटीत असतात, तो भाऊ कांहीं आला नाहीं, कीं एक दिवशीं येऊन यांना 'मूर्ख'सुद्धां म्हटलं नाहीं त्यानं. यांना कांहीं लाज शरम असती तर मला कशाला बोलावं लागलं असतं?"

उत्तराची अपेक्षा न करतां दणदण पाय वाजवीत ती निघून गेली. तिच्या तोंडचें तें भाषण ऐकून आज इतक्या दिवसांनीं भवानीला मोठा धक्का बसला. आजवर तिला या सूनबाईची ओळख पटली नव्हती—आतां पटली, तेव्हां तिला अत्यंत दुःख झालें, रागही आला—पुढें ही कशी वागेल याजबद्दल तितकाच संदेहही उत्पन्न झाला.

पण सूनबाई तशी निघून गेली नव्हती. कुणाला ऐकायला तितकें कठिण जाऊं नये इतक्या अंतरावर, ओसरीच्या टोंकाला उभी राहून, एका विशिष्ट दृष्टीनें नजर रोंखून ती पुनः म्हणाली, "जेव्हां तेव्हां राशी राशी पैशांची जरूर लागली कीं दादाची आठवण होते. माझ्या मामाच्या घरींसुद्धां चारदोन परीक्षा देऊन बाहेर पडलेलीं माणसं बघितलींयत मी!—सावध करायला गेलें तर तेढं वाटतंय यांना. मी म्हणतें बाबानों, गोड वाटो कीं कडू वाटो, आपले पैसे आपल्यादेखत असे उधळले जाताहेत—स्पष्ट दिसताहेत—चार पोरंबाळं आहेत माझीं, त्यांच्याकडे पाहिलं तर बोलल्याशिवाय कसं रहावेल माझ्यानं? भोळा दादा मिळालाय—जेवढं मिळतं तेवढं घेताहेत लुबाडून. लुबाडा म्हणावं! माझं काय? त्यांचींच पोरंबाळं उघडी पडतील!—"

आतां मात्र सुनबाई खरोखरच निघून गेली. ताड्कन् उडी मारून गोकुळ पुढें झाला आणि निघून गेलेल्या आपल्या बायकोला उद्देशून मोठ्यानें ओरडून म्हणाला, "असं का! मी मूर्ख? मी भोळा? कोण साला म्हणतोय असं? कुणी मिळवलीय ही मिळकत? मी कीं या विंद्यानं? माझ्या डोळ्यांत धूळ टाकून पैसे उकळायला या विंद्याचा बाप उतरला पाहिजे खालीं! मी वडील आहें—तो धाकटा आहे! त्यानं चार परीक्षा दिल्या असल्या तर मी दहा परिक्षा देईन म्हणावं! माहीत आहे? मी मूर्ख काय! घरांत पाऊल टाक तर खरा, भय्या-कडून ओढून काढतों बाहेर!—कोण येतो मला नको म्हणायला तें पहातों.—"

अशाच प्रकारें असंबद्ध आणि निरर्थक भाषण करीत तो सारखा आरडा-ओरडा करीत होता. भवानी जी एकदां उगी राहिली ती पुन्हां बोलली नाहीं. दगडाच्या पुतळीसारखी स्तब्ध राहून ती ऐकत होती. थोड्या वेळानें ती उठून निघून गेली.

## ६

त्या वेळीं झगडा झाला खरा पण त्याच रात्रीं बायकोबरोबर गोकुळची मिटवामिटव झाली असावी, असें दुसऱ्या दिवशींच्या त्या दोघांच्या चाल-चलणुकीवरून दिसून आलें.

सकाळींच उठल्याबरोबर त्यानें आरडाओरडा करायला सुरवात केली. आतां श्राद्धाच्या मुख्य दिवसाला तीनच दिवस राहिले होते, हेंच तो पुन्हा पुन्हा सर्वांना बजावून सांगत होता. बाहेरच्या कुणी माणसानें विनोदचें नांव काढलें तर तो कानांत बोटें घाली. तो म्हणे, " मरायच्या वेळीं बाबांनीं ज्याला आपला मुलगा नव्हे म्हणून म्हटलं, त्याची आतां कसली कुणी चौकशी करायची ? आतां त्याचा आमचा कसलाच लागाबांधा राहिलेला नाहीं. भाऊ म्हणून जो कुणी होता तो गेला मरून ! "

त्याचें भाषण ऐकलें म्हणजे कुणी डोळे मिचकावून दुसऱ्याला डोळा घालीत, कुणी मान हलवून होकार देइ, तर कुणीं त्याच्या दृष्टीआड जें सांगायचें तें सांगून टाकीत. अर्थात सर्वांना एवढें कळून चुकलें, कीं विनोद आतां उघडा पडला. गोकुळनें कोणती युक्ति लढवली कोण जाणे—पण आतां तो सोळा आणे मिळकत गिळून बसला. कुणी कुणी विनोदबद्दल गुपचुप सहानुभूति दाखवूं लागले होते, एवढेंच नव्हे, तो जर कोर्टांत जायला कबूल असला तर ही लबाडी बाहेर काढण्यासाठीं त्याला वाटेल ती मदत द्यायला आपण पुढें येऊं, असा आडून आडून ध्वनी करूं लागले होते.

बुड्डक जयलाल बानर्जी अगदीं उघड उघड म्हणूं लागले, " माणसाची ओळख सहज पटत नाहीं, याला प्रत्यक्ष प्रमाण म्हणजे हा गोकुळ मुजुमदार. सर्वांच्या डोळयांत धूळ टाकतोय पण माझ्या डोळयांत धूळ टाकतां यायची नाहीं म्हणावं ! गांवचे सारे लहान थोर, सारे स्त्रीपुरुष, अगदीं एका भाषेनं

म्हणतायत, कीं गोकुळ न्यायनिष्ठ, गोकुळ बंधुवत्सल, प्रत्यक्ष धर्मराज युधिष्ठिर —सारे ओरडताहेत मोठ्यामोठ्यानं, पण मीच काय तो बोलत नाहीं. पहातोंय नि हसतोंय. मनांतल्या मनांत म्हणतोंय, सावत्र आईचा मुलगा म्हणजे सावत्र भाऊ—त्याच्यावर हें केवढं मोठं प्रेम ! वेदापुराणांत कस्मिन् कालीं जें कधीं घडलं नाहीं, ते आतां या कलिकालांत घडणार आहे होय ? आजवर तोंड झांकून नुसता बघत राहिलों होतों. कांहीं बोललों नाहीं कुणाजवळ. जरूर काय ? एक दिवस सारं कांहीं उघडकीला येणार तें चांगलं माहीत होतं मला !—केवढा सज्जन माणूस !—केवढा सज्जन माणूस !—आतां तुम्हीच पहा, या गोकळ्याबद्दल जें भविष्य मी केलं होतं तसंच घडून आलं कीं नाहीं ?"

पण या पूर्वी त्यांनीं काय भविष्य केलें होतें त्याचा ज्याअर्थी कुणालाच पत्ता नव्हता त्याअर्थी ते म्हणतील त्याला होकार देणें अवश्य झालें होतें. गवताच्या गंजीला लागलेल्या आगीप्रमाणें ही गोष्ट तोंडोतोंडी जिकडे तिकडे फैलावली. बाहेरच्या या विरोधी चळवळीमुळें इतक्या लवकर सारें वातावरण आपल्याविरुद्ध इतकें तीव्र झालें आहे, याचा गोकुळला मात्र पत्ता लागला नव्हता.

भवानी पहिल्या पासूनच मितभाषिणी होती. त्यांतून गेल्या रात्रीपासून तिच्या मनावर जो परिणाम झाला होता त्यामुळें ती अगदींच अबोल झाली होती. गोकुळची बायको मनोरमा हिनें संधि साधून आपल्या नवऱ्याला एका बाजूला घेऊन ही गोष्ट दाखवून दिली आणि म्हटलें, "सासूबाईंची वृत्ति पाहिलीत ?"

उद्विग्न होऊन गोकुळ म्हणाला, "नाहीं. काय झालंय आईला ?"

मनोरमा तोंड वेंगाडून म्हणाली, "काय व्हायचं आणखी ? काल सांगितलं होतं ना मी तेंच ! भावजींचा मिळकतीवरचा हक्क गेला म्हणून—तेव्हांपासून माझ्याबरोबर बोलणं टाकलंय ! तुमच्याबरोबर तरी बोलताहेत का ?"

गोकुळ कोरडेपणानें म्हणाला, "नाहीं, माझ्याबरोबरसुद्धां नाहीं."

आवाज अगदीं खालीं आणून माना वेळावीत मनोरमा म्हणाली, "पाहिलीत गंमत—भावजीनीं जे पैसे दोन हातीं उधळले, ते असते तर आमचेच होते ना ? मामंजीनीं सारी मिळकत तर आमच्या नांवें केली आहे. यांनीं आमचं नुकसान करावं अन् तसे दोन शब्द सहज तोंडावाटे गेले तर रागारागानं

काय यांनीं बोलणं वर्ज्य करावं ? ही काय रीत झाली ? तुम्हीं तर 'आई' 'आई' म्हणत नाचत असतां—आतां तुम्हींच सांगा ना, मी म्हणतें तें खरं कीं, खोटं ?"

गोकुळचा चेहरा एकदम काळवंडून गेला. काय उत्तर द्यावें हें त्याला सुचेना. ती त्याची अवस्था ध्यानीं येऊन मनोरमा म्हणाली, "—भावजी कसे असले अन् कसे वागले तरी पोटचा गोळाच ना तो ? किती झालं तरी तुम्ही सावत्र. सारी मिळकत तुम्हांला मिळाली हें कसं सहन होईल कुठल्या बायको-माणसाला ? नाहीं—नाहीं—असं माझं बोलणं उडवून देऊन चालायचं नाहीं. आतां यापुढं थोडं सावध राहिलं पाहिजे तुम्हाला. असं 'आई' 'आई' करीत विरघळून गेलांत तर सारी धूळधाण होईल—मी सांगून ठेवतेंय ! पैसा मोठा भयंकर आहे बरं !"

संशयाच्या पिशाच्चानें गोकुळच्या हृदयाचा ठाव घेतला. तो एवढाले डोळे करून उतरल्या मुद्रेनें तिच्याकडे पाहात राहिला. ती तशीच बोलत होती, "—आमची बायकांची जात ! बायकोला जशी बायको ओळखते तसं पुरुषाला नाहीं ओळखतां येत. एवढं माझं ऐकून ठेवा—"

असें म्हणून ती क्षणभर आपल्या नवऱ्याच्या तोंडाकडे पाहत राहिली. आपल्या बोलण्याचा परिणाम त्याच्या मनावर बराचसा झाला आहे असें वाटल्यामुळें ती जरा जास्त जोरांत येऊन म्हणाली, "—शिवाय भावजींचं असंच उनाडायचं व्रत कांहीं सारखं चालू राहून चालायचं नाहीं ? आजवर तुम्ही त्यांच्या शिक्षणासाठीं कांहीं कमी केलं असं नाहीं. आतां त्यांनीं कुठं तरी कसली तरी नोकरी पत्करून, लग्न करून, आपल्या आईला घेऊन संसार थाटायला नको का ? आपल्या आईला आमच्याकडे ठेवून आपण कुठं तरी भटकणं शोभेल का त्यांना ? शिवाय असं पहा, डोकं टेकायला एखादं लहानसं झोंपडं तरी हवं ना त्यांना ? आमच्या सामर्थ्याप्रमाणें आम्ही मदत करूं. अमुक मुजुमदारानं आपल्या सावत्र भावाकडे बघितलं नाहीं, असं लोकांनीं तरी म्हणूं नये. सावत्र भावाचा नि आमचा संबंध काय ? म्हणायचं त्यांना म्हणूं दे तसं—आम्ही कांहीं म्हणणार नाहीं. तो दोष आमचा नाहीं."

बोललेल्या भाषणावर विचार करण्याची संधि नवऱ्याला देण्याच्या उद्देशानें ती एवढेंच बोलून निघून गेली. स्वप्नाविष्टाप्रमाणें गोकुळ शून्य दृष्टीनें पाहत

स्वस्थ राहिला होता. कसलें तरी अद्भुत स्वप्न आपल्याला दिसत आहे असें त्याला वाटत होतें. बाकीचें सारें भाषण एका बाजूला पडून एकच उद्गार त्याच्या कानांत सारखा गुणगुणूं लागला होता—'पैसा मोठा भयंकर आहे !' या पैशाच्या पायींच आई आपल्याला सोडून रागारागानें विनोदकडे जाऊन राहायला तयार झाली आहे ?

त्यानें विचार करून पाहिलें—खरेंच ! बायको बोलली तें कांहीं खोटें नव्हे. आजच्या दिवसांत आई त्याच्याबरोबर एक शब्दसुद्धां बोलली नव्हती. कसल्या तरी कामासाठीं तो तिच्यासमोर चार दोन वेळां गेला होता पण तिनें नजर वर करून त्याच्याकडे पाहिलें नव्हतें. ती मुळचीच मितभाषिणी आहे असा समज असल्यामुळें, त्यावेळीं तें त्याच्या ध्यानीं आलें नव्हतें—पण आतां सारा प्रकार त्याला सूर्य प्रकाशासारखा स्वच्छ दिसूं लागला. असला गुपचुप अबोलपणाचा विरोध सहन करणें त्याच्या दृष्टीनें अशक्य होतें.

समोरसमोर भांडण करण्याच्या उद्देशानें तो त्याचक्षणीं आईच्या खोलीकडे वळला. आंत पाऊल टाकतांच म्हणाला, " भरलेल्या घरांत असं तोंड वाकडं करून बसून राहून चालायचं नाहीं ! "

भवानी अचंब्यांत पडली. तिनें वर नजर करून त्याच्याकडे पाहिलें मात्र, तोंच तो बोलूं लागला, " तुझी सून म्हणाली तें कांहीं खोटं नाहीं—विनोदनं पैशाची धूळधाण केली ! बाबानीं त्याचा वाटा मला देऊन टाकला तर त्याचा दोष मला कां ? तूं अन् तो काय तें पाहून घ्या. माझ्यावर असं रुसून बसलेलं मला खपायचं नाहीं. मी सांगून ठेवतोंय—

तें उद्गार भवानीला जाणवले. ती शांतपणें म्हणाली, " गोकुळ, मी रुसलें नाहीं कीं रागावलें नाहीं कुणावर !—अन् कुणाबरोबर कांहीं जमवूनही घ्यायचं नाहीं मला ! "

" नाहीं ना ? तर मग हें असं बसून चालायचं नाहीं. विनोदला म्हणावं कुठंतरी नोकरी पत्कर. माझ्या घरांत त्याला थारा मिळायचा नाहीं. "

" तें तर ठरलेलंच आहे गोकुळ. तें पुन्हां कशाला सांगायला हवं ? " असें म्हणून भवानी मान खालीं घालून स्वस्थ बसली.

भांडण करण्यासाठीं टाकलेला हा खडा फुकट गेल्यामुळें गोकुळचा निरुपाय झाला. रागारागानें कांहींतरी किडबिडत तो तिथून चालता झाला.

बायकोला बोलावून तो म्हणाला, " आज अगदीं स्पष्ट सांगून टाकलं आईला, विनोदला इथं थारा व्हायचा नाहीं.—नोकरीचाकरी काय वाटेल तें करावं त्यानं—मला त्याच इथं कांहीं नाहीं. "

मनोरमा हुरळली आणि त्याच्याजवळ येऊन हळूच म्हणाली, " मग काय म्हणाल्या त्या ? "

अस्वाभाविकपणें तिरसटून गोकुळ म्हणाला, " मी कुठं तिच्या बोलण्याची कदर केली आहे ? "

मनोरमा डोळे वटारुन म्हणाली, " मग ?—मग ? "

गोकुळ तशाच रीतीनें म्हणाला, " मग आणखी काय ? तिला कबूलच करावं लागलं, कीं या घरीं विनोदला जागा नाहीं. "

आवाज आणखी खालीं आणून मनोरमा म्हणाली, " ही शंभरटक्के रागाची बोली—कळलं का ? सासूबाईचं सारं लक्ष आहे आपल्या मुलाकडे—तुम्ही तिच्या डोळ्यांत सलतां आहांत कुसळासारखे ! "

बाहेर येतांना रसिक चक्रवर्ति समोर दिसला. त्याला उद्देशून तो म्हणाला, " हें पहा, ही एक बातमी ऐकलीत चक्रवर्ति महाशय ? आजवर एवढं करीत आलों पण आतां आईच्या डोळ्यांत सलूं लागलों आहें मी. भाषणसुद्धां करीत नाहीं माझ्याबरोबर. समोर दिसलों तर तोंड फिरवून बसते. "

चकित होऊन चक्रवर्तींनीं म्हटलें, " नाहीं–नाहीं–काय म्हणतां हें बडेबाबू ? "

" काय म्हणतों ?—अग ए हाबूच्या आई, ऐक, ऐक—"

घरची म्हातारी दाई तितक्यांत कसल्या तरी कामासाठीं जात होती. धन्याची हांक ऐकतांच ती जवळ आली त्याचक्षणीं गोकुळ चक्रवर्तीकडे बोट करून तो म्हणाला, " हे विचारताहेत पहा, आतां तूंच सांग हाबूची आई, आईला माझ्याबरोबर बोलतांना आतां पाहिलसं तूं ? समोर आलों, कीं तोंड फिरवून जाते कीं नाहीं ती ? "

हाबूच्या आईला कांहींच माहित नव्हतें. ती क्षणभर वेड्यासारखी पाहत राहिली. धन्याला बरें वाटावें म्हणून शेवटीं उगीच मान हालवून आपल्या कामाला निघून गेली.

" खरं खोटं कळलं ना आतां ? " असें म्हणून चक्रवर्तीला डोळ्यानें इशारा करून गोकूळ तिथून निघून गेला.

त्या दिवशीं गावांतील जे कोणी लोक दुःखवटयाच्या भेटीसाठीं येत होते त्यांच्याकडेसुद्धां आपल्या सावत्र आईच्या विरुद्ध पुनः पुनः तो एकच गोष्ट सांगूं लागला होता, " किती झालं तरी मी सावत्र मुलगा. अर्थात बाबांचा मृत्यू झाला न झाला तोंच मी आतां हिच्या डोळयांत सलूं लागलों. "

संध्याकाळीं तो घरीं आला तेव्हां भवानीला उद्देशून म्हणाला, " मुद्दाम माणसं पाठवून धाकट्या आत्याबाईंना वर्धमानांतून बोलावून आणण्याइतका कांहीं मी आज माणसाच्या अडचणींत नाहीं—एवढी मला गरजही नाहीं. यायचं असलं तर ती स्वतः येईल. "

भवानी त्याच्याकडे पाहून शांतपणानें म्हणाली, " असं करणं बरं दिसेल का गोकुळ ? "

गोकुळ तावातावानें म्हणाला, " बरंवाईट मला कांहीं माहीत नाहीं. सारखे दोन हातीं पैसे उधळणं मला कांहीं शक्य नाहीं. तूं या बाबतींत मला अधिक त्रास देऊं नकोस—सांगून ठेवतोंय ! "

या बाईंना आणण्यासाठीं कालच तिनें गोकुळला सांगितलें होतें. मात्र आतां ती कांहीं बोलली नाहीं. उगीच राहून ती आपल्या कामाला लागली तरीही समोर शतपावली करीत गोकुळ बोलत होता, " आण म्हटलं तर कांहीं आणतां येत नाहीं ! कर्जबाजारी करून बुडून जायचा मार्ग पत्करणं तर बरं नव्हे ! "

भवानी तोंडातल्या तोंडांत पुटपुटली, " बरं तर गोकुळ, तुला बरं वाटत असेल—न का पाठविनास बोलवायला ! "

गोकुळ तसाच बोलत होता, "—आतां एव्हांपासून माझं मलाच पाहिलं पाहिजे. मला कांहीं माझी आई नाहीं. मी मेलों कीं झालं—कोण आहे माझं म्हणायला ? आतां माझं मलाच सांभाळलं पाहिजे. पैशाअडक्याच्या बाबतींत मागंपुढं पाहून खर्च केला पाहिजे. माझी आई तर नाहीं पाह्यला ! "

तो निघून गेला. पैसाअडका, मालमिळकत, यांच्यावर एकाएकीं त्याची एवढी आसक्ति उत्पन्न झालेली पाहून भवानीनें एक मोठा सुस्कारा सोडला. पण गोकुळ तितक्यांतच फिरून आला आणि म्हणाला, " मला कांहीं कळत नाहीं—आतां बोलतेयस ती रागाची भाषा आहे तें मला काय कळत नाहीं ? काल तूंच सांगितलंस, 'गोकुळ, तुझ्या आत्याबाईला आणायला माणूस पाठव ! ' आणि आज म्हणतेस, ' तुला बरं वाटेल तें कर.' माझा बाप आतां

नाहीं, मला भाऊ नाहीं म्हणून का माझा असा कोंडमारा करतेयस ! लोक म्हणतील, खरोखरच गोकुळ आतां आपल्या आईचं ऐकत नाहीं. "

अशा प्रकारचें त्याचें तें अडवणुकीचें तेढें भाषण ऐकून भवानी हतबुद्ध झाली. कांहीं वेळ त्याच्याकडे पहात राहून म्हणाली, " मी तुझ्या कुठल्या भानगडींत नाहीं गोकुळ. मी कांहींच बोललें नाहीं बाबा ! "

गोकुळचे डोळे एकाएकीं पाण्यानें भरून आले. तो म्हणाला, " तूं सांगितलंस नि मी ऐकलं नाहीं, असं आजवर कधीं झालंय ? मी तुला सांगून ठेवतोंय—हें बरं नाहीं. विन्या तो तसा घराला पारखा झालाय—मी सुद्धां असाच कुठं तरी तोंड घेऊन निघून जाईन—मग ही आपली मालमिळकत घेऊन तूं बैस स्वस्थ ! " असें म्हणून डोळे पुशीत पुशीत तो बाहेर निघून गेला.

## ७

गोकुळची मोठी मुलगी हेमांगिनी आपल्या आजीजवळ झोंपत असे. उजाडायच्या पूर्वीच उठून ती ओरडत ओरडत आली, " काका आले आई, काका आले ! "

शेजारच्या खोलींत गोकुळ कांबळें टाकून झोंपला होता, तो धडपडून उठून बसला. त्याची बायको विचारीत होती—तिला आश्चर्य वाटत असलें तरी आनंद झाला नसावा—त्याला ऐकूं आलें, " केव्हां आले ग तुझे काका ? "

मुलगी म्हणाली, " काल मध्यान्ह रात्रीं आई. "

आईनें विचारिलें, " आतां काय करताहेत ते ? "

मुलगी म्हणाली, " अजून उठले नाहींत. आपल्या खोलींत झोपलेयत. "

यापेक्षां जास्त कांहीं न विचारतां ती आपल्या कामाला निघून गेली.

गोकुळनें दरवाजांतून हातानें खूण करून, जरा आवाज चढवून, मुलीला म्हटलें, " तुझी आजी तुला काय म्हणाली ग हेमू ? "

हेमू म्हणाली, " माहीत नाहीं बाबा ! "

तरीही गोकुळनें विचारलें, " फार संतापून बडबडत होती वाटतं ? "

हेमू अनिश्चितपणें एकदोन वेळ मान हलवून नंतर सहज उद्गारली, " हूं ! "

गोकुळ अस्वस्थ झाला. तिचा हात धरून त्यानें तिला बळेंबळेंच आंत ओढून घेतलें आणि हळूच विचारलें, " तुझी आजी काय काय बोलली— सारं मला सांग हेमू ! "

हेमूला पेंच पडला. काका ज्यावेळीं आला त्या वेळीं ती जागी नव्हती. तिला कांहींच माहीत नव्हतें. ती म्हणाली, " माहीत नाहीं बाबा."

गोकुळला तें खरें वाटलें नाहीं. तो नाराज होऊन म्हणाला, " मग आतांच होय कसं म्हटलंस ? आईनं तुला ' सांगू नकोस ' म्हटलं होय ? तूं सांग ना—मी कुणाला सांगायचा नाहीं तुझं नांव."

हेमूला मोठा पेंच पडला. ती नुसती त्याच्या तोंडाकडे टकमक पहात राहिली. तिला कुरवाळून उत्तेजन देत गोकुळ म्हणाला, " सांग ना पोरी, काय काय बोलणं झालं ? तूं घराबाहेर हो, असं म्हटलं वाटतं आईनं ? हे घे दोन रुपये तुला—बाहुली घे. " असें म्हणून उशाखालचे दोन रुपये काढून त्यानें मुलीच्या हातीं दिले.

हेमू नुसतीच म्हणाली, " हं. तसंच म्हटलं. "

" मग काय—मग काय ? "

हेमू रडकुंडीला येऊन म्हणाली, " मग काय तें माहित नाहीं बाबा. "

तिला जवळ घेऊन पुनः पुनः कुरवाळीत तो म्हणाला, " आहे माहित— आहे ना माहित ? काय म्हणाला तुझा काका ? "

" काहीं नाहीं म्हणाले. "

गोकुळला तें खरें वाटलें नाहीं. तो जरा रागारागानें म्हणाला, " मुळींच कांहीं बोलला नाहीं ? असं कधीं झालंय ? "

बापाला राग आला आहे असें पाहून हेमूच्या ओंठाशीं रडें आलें. ती म्हणाली, " मला माहित नाहीं बाबा. "

" पुन्हा माहित नाहीं म्हणतेस ? हरामखोर कार्टी ! " असें म्हणून त्यानें फट्कन् तिच्या थोबाडींत भडकावली आणि म्हटलें, " चल—दूर हो. "

बिचारी मुलगी रडत रडत निघून गेली.

गोकुळ घाईघाईनें खालीं आला आणि आपल्या आईच्या खोलींत येऊन म्हणाला, " छान केलंस ! घरांत त्याचं पाउल पडलं न पडलं तोंच चांगलं शिकवलंस ! चांगलं बनवलंस त्याला ! त्याला माझ्याबद्दल वैषम्य वाटावं,

म्हणूनच ना ? सारं कांहीं मला कळलंय. आतां त्या तुझ्या मुलालासुद्धां सांगून ठेव—म्हणावं माझ्यासमोर येऊं नकोस !—मी बजावून ठेवतोंय !—" असें म्हणून तो तसाच तणतणत बाहेर निघून गेला.

भवानीला कांहींच कळलें नाहीं. ती नुसती पहात राहिली होती. घरीं येणारीं वेगवेगळीं माणसें आपापल्या कामांत चूर होतीं. गोकुळनें इकडे तिकडे पाहिलें. समोर हाबूची आई दिसली तिला हांक मारून तो म्हणाला, " अग हाबूची आई ! म्हटलं, भय्या रात्रीं आलाय वाटतं ? "

ती होकार देऊन म्हणाली, "होय. मल्या मध्यान्ह रात्रीं बाबू घरीं आले."

गोकुळ म्हणाला "तें माहीत आहे ग मला. पण त्यानंतर मायलेकरांचं काय काय बोलणं झालं ? माझ्याबद्दल खूप तक्रार केली वाटतं आईनं ? घरांतून बाहेर जायच्या बाबतींत—"

दाई मधेंच म्हणाली, " नाहीं बडेबाबू, आई उठलीच नव्हती. यदू त्यांची बॅग घेऊन आला. छोटेबाबूंची खोली उघडून मी दिवा लावून दिला. ते जे एकदां आंत गेले ते अजून बाहेर आले नाहींत. "

गोकुळ नाराजी दाखवून म्हणाला, " मला चकवतेस काय ? सारं कांहीं ऐकलंय मी. "

गोकुळचे ते उद्गार ऐकून बिचारी दाई थक्क होऊन नुसती पहात राहिली. त्यानंतर हाबूची शपथ घेऊन ती म्हणाली, " असलं कांहीं बोलूं नका बडे-बाबू. मी सारखी तिथं होतें. मीच त्यांची सारी व्यवस्था लावून दिली. मी म्हटलं—तेव्हां ' आईला उठवूं नकोस ' असं त्यांनीं सांगितलं अन् म्हटलं, ' आतां जा तूं. आणखी कांहीं नको मला. दिवा लावून ठेवून तूं जा झोपायला ! ' माझ्या बाळाचं तोंड कसं काळवंडून गेलेलं दिसलं ! "

गोकुळच्या दोन्ही डोळ्यांना पाणी आलें. तो म्हणाला, " कसं नाहीं काळवंडणार ? आतां तूंच पहा हाबूची आई, बाबा वारले—बेट्यानं एकदां शेवटची भेटसुद्धां घेतली नाहीं—एक दमडीसुद्धां मिळाली नाहीं त्याला—काय त्याला वाटलं असेल तें त्याचा तोच जाणे. बाबांबद्दल त्याला केवढं प्रेम होतं तें जाणतांच ना तुम्ही लोक ? काय म्हणतेस हाबूची आई ? "

बोलतां बोलतां त्याच्या डोळ्यांतून आसवांच्या धारा वाहूं लागल्या. हाबूची आई म्हणजे सर्वांची जुनीपुराणी दाई—त्याच्या डोळ्याला पाणी आलेलें

पाहून तिचेही डोळे ओलावले. ती गहिंवरून म्हणाली, "काय म्हणायचं बडेबाबू ? बाबा म्हणजे जीव कीं प्राण होते त्याला. तरीपण अलिकडे खूप खूप ल्याहायला वाचायला लागल्यामुळं मगज गरम झालाय पोराचा. तेव्हां—"

आतां गोकुळला बोलायला कुणीतरी सांपडलें. तो म्हणाला, "तेंच तर म्हणतों ना हाबूची आई ! कसा मगज गरम व्हायचा नाहीं ? थोडा का अभ्यास करावा लागलाय त्याला ? एकदम ऑनर ग्रॅज्युएट ! या हुगळी-चूंचडा भागांत माझ्या भावाइतके शिकलेले कितीजण आहेत तें दाखवून दे पाहूं ? खुद्द लाटसाहेब हाताला धरून ज्याला बसवून घेतो तो काय असातसा माणूस ? तेंच म्हणतोंय ना मी—एकदां कलकत्त्याला जाऊन पहा. कुणाही गृहस्थाच्या घरीं जा, अन् सांग त्याला, कीं मी विनोदबाबूची दाई म्हणून—मग पहा ते लोक कसा तुझा आदरसत्कार करतात ते ! माहीत आहे ? पण म्हणतात ना, गांवच्या बैराग्याला भिक्षा मिळेना ! या इथल्या लोकांना त्याची काय कदर ?—तोंड अगदीं उतरलंय त्याचं—असं म्हणालीस होय ? खरंच का ग ?"

दाई म्हणाली, "नुसतं चेहेऱ्याकडे पाहिलं त्याच्या, कीं कुणाच्याही डोळ्याला टचकन् पाणी येईल बडेबाबू !"

गोकुळच्या डोळ्यांतून सारख्या आसवांच्या धारा लागल्या. उपरण्याच्या पदरानें डोळे पुसून तो म्हणाला, "तुझ्याच आंगावर वाढलाय तो हाबूची आई, तुलाच त्याची खरी पारख आहे. आजवर हंसत खेळत सुखासमाधानानं अभ्यास करण्यांतच वेळ गेलाय त्याचा. हा सगळा उपद्व्याप त्याला कसा मानवेल ? तूंच सांग ना. मृत्युपत्रांत त्याला कांहीं ठेवलं नाहीं—नाहीं म्हटलं कीं नाहीं ! त्याच्या बापाची तर इस्टेट नव्हे ! कोण साला आड येणार ? काय केलंय त्यानं ? चोरी केली आहे ? दरोडा घातलाय ? खून केलाय ? कुठल्या साल्यानं बघितलंय ? मग त्याला इस्टेट कां मिळूं नये तें सांग ना ? काय कोर्टकचेऱ्या नाहींत ? उद्यां विनोद कोर्टात गेला तर मला अर्धी मिळकत पैसा कवडीचा हिशेब करून केंस चिरून द्यावी लागेल, तें माहीत आहे ?"

ती होकार देऊन म्हणाली, "द्यावी लागेलच तर काय !"

गोकुळला आतां अवसान आलें. मोठ्या उत्साहानें तो म्हणाला, "मग सांग ना तसं ! अन् आमची ही आई !—बायकांच्या जातीनं बायकांच्या

जातीसारखं कां राहूं नये ? मृत्युपत्र करायचा सल्ला तूंच ना दिलास ? कशाला दिलास ? आईला शोभतं का हें असं ? कांहीं धर्म आहे ना ? तो पहातोय ना ? निर्दोष माणसाला क्लेश दिले तर त्याचा जाब द्यावा लागेल ना ?— अन् इस्टेट ! भारीच आहे कीं इस्टेट ! आज ना उद्यां तो हायकोर्टाचा जज्ज झाला—तो व्हायचा आहे ठरलेलंच आहे—म्हणजे अटकावून ठेवतां येईल का त्याची इस्टेट ? हा सारा मागला पुढला विचार करूनच वागलं पाहिजे ना ? बऱ्या बोलानं दिलं नाहीं तर कान पकडून द्यायला लावतील कीं !—तो अपमान पत्करेल ? "

हाबूची आई फार खूष झाली. विनोदला तिनेंच लहानाचा मोठा केला होता. तिला या मृत्युपत्राच्या भानगडी मुळींच पटल्या नव्हत्या. ती म्हणाली, " तर मग बडेबाबू, तुम्ही छोटेबाबूंना कां बोलावीत नाहीं ? हा घे तुझा मिळकतीचा वांटा, असं कां म्हणत नाहीं ? वांटा द्यायला तुम्ही तयार झालां तर नको म्हणणारा कुणी सुद्धां नाहीं. "

गोकुळचा अस्सल खटका होता तो याच जागीं. तो तिच्याकडे कांहीं वेळ पहात राहून म्हणाला, " तर मग सारे जे म्हणतात, कीं द्यायचा अधिकार मला नाहीं—तें कसं ? बाबांचं मृत्युपत्र तर रद्द करतां येत नाहीं ! माझ्या बायकोचा मामेभाऊ एक बडा कायदेपंडित आहे—त्यानं आपल्या बहिणीला पत्र लिहिलंय वाटतं—तसं केलं तर म्हणे तुरुंगांत जावं लागेल—तरी पण आईची कबुली असली, माझ्या बायकोची कबुली असली, तर जमेल वाटतं."

याचें उत्तर बिचारी हाबूची आई काय देणार होती ? ती आपल्या कामाला निघून गेली. गोकुळनें मागें वळून पाहिलें, हिमू खेळायला जात होती, तिला मोठ्या प्रेमानें जवळ बोलावून त्यानें विचारलें, " तुझा काका उठला का ग ? "

हिमू होकार देऊन म्हणाली, " उठले ते आपल्या बसायच्या खोलींत गेले. कुणाबरोबर बोलले नाहींत."

घरांतल्या एकान्त खोलींत विनोद बसत असे. ती खोली रस्त्याला लागून होती. ती इंग्रजी पद्धतीनें सजवलेली होती. त्याचे इष्टमित्र त्याला भेटायला येत ते याच जागीं. चोर पावलांनीं गोकुळ खिडकीजवळ गेला आणि हळुच आंत डोकावून पाहूं लागला. विनोद खुर्चीवर बसला नव्हता, रस्त्याकडे तोंड करून त्यानें जमिनीवरच बैठक मारली होती, तें पाहून गोकुळच्या डोळ्यांना

पाणी आलें. धाकट्या भावाचा चेहरा दिसेल या आशेनें तो चारपांच मिनिटें तसाच उभा होता. शेवटीं निराश होऊन डोळे पुशीत तो तिथून मागें आला.

चक्रवर्ति म्हणाला, “ बडेबाबू , शास्त्रीपंडितांच्या संभावनेची यादी—”

भरल्या काळोखांत एकदम प्रकाश मिळाल्याचा गोकुळला भास झाला. तो घाईघाईनें म्हणाला, “ या असल्या बाबतींत मला कां गुंतवतां चक्रवर्ति महाशय ? स्वत: आई सरस्वती आतां घरीं आली आहे. कुठला पंडित किती विद्वान आहे, कुठल्या शास्त्र्याला काय दिलं पाहिजे, कुणाचा मान किती राखायचा, तें सारं विनोदला तर कळतंय. त्याला विचारून काय तें ठरवून कां टाकीत नाहीं तुम्हीं ? मी या बाबतींत मुळींच हात घालणार नाहीं चक्रवर्ति महाशय. ”

चक्रवर्ति म्हणाला, “ पण अजून छोटेबाबू झोपून उठले नाहींत. ”

थोडासा हंसण्याचा प्रयत्न करून गोकुळ म्हणाला, “ झोपून म्हणे ! खाणं जेवणं झोंप कुठं सुचतेय त्याला ! हाबूच्या आईला बोलावून विचारा ना. तिनं पाहिलंय स्वतः. ती मला म्हणाली, ‘ बडेबाबू , एकदां पहा तर छोटेबाबूंकडे—पाहिलं तर डोळ्यांतलीं टिपं आवरत नाहींत.’ अगदीं कसासाच झालाय चेहरा. सोन्यासारखी कांति पण काळवंडलीय विचार करतां करतां.” असें म्हणून त्यानें त्याची बसायची खोली दाखवून म्हटलें, “ जाऊन पहा ना—थंड्या मातीवर अगदीं मुकाट्यानं एकटाच बसलाय तो. हें असं पाहिलं कीं कुणाचं काळीज फाटून जायचं नाहीं चक्रवर्ति महाशय ? ”

कांहीं तरी तात्पुरतें दु:खसूचक वाक्य तोंडांतल्या तोंडांत उच्चारून चक्रवर्तीनें जायला सुरवात केली, तोंच त्याला मागें बोलावून गोकुळ म्हणाला, “ असं पहा, तुम्हाला सारं कांहीं माहीत आहे म्हणून विचारतों, मी असा उभा आहें तोंपर्यंत विनोदला हे कष्ट कशाला ? त्याच्या नाजूक प्रकृतीला उपासतपास कसे मानवतील ? आजारी पडेल अशानं. त्याला म्हणावं, नित्याच्या संवयी-प्रमाणें जसं खाणंजेवणं असेल तसं चालूं दे.”

चक्रवर्ति निरुत्साहानें म्हणाला, “ तसं नाहीं झालं—”

त्याचें भाषण गोकुळनें पुरें होऊं दिलें नाहीं. तो म्हणाला, “ नाहीं म्हणजे काय ? तुम्हीच सांगा. माझा हा मजूरहमालाचा देह—याला सारं कांहीं मानवतं—पण त्याचं तर तसं नाहीं ! पांचसात परिक्षा पास होऊन साऱ्या देशांत

ज्यानं अव्वल दर्जा मिळवला, त्याची तोड काय आमच्यासारख्यांना येणार आहे ? कोण आहे रे तिकडे—भुतो, चट्कन् जाऊन भटजीबुवांना बोलावून आण पाहूं. होईनात का पैसे खर्च !—श्राद्धाच्या वेळीं कुणी केली आहे ती कदर ? असं पाठच्या भावाला मारून का टाकायचं ? त्यानं असं वरणभातावर राहिलेलं मला नाहीं खपायचं ! मग कोण काय वाटेल तें म्हणो ! ”

होकार देऊन चक्रवर्ति म्हणाले, “ अगदीं बरोबर आहे बडेबाबू ! तरी पण असं आहे, लोक म्हणतील—”

“ अरे लोक म्हणतील म्हणून स्वतःच्या भावाला मारून का टाकायचं आहे ? कुठं गेली तुमची अक्कल चक्रवर्ति महाशय ? नाहीं—नाहीं. या याद्याविद्या घेऊन जाऊन त्रास देऊं नका त्याला. आधीं दोन घांस जाऊं दे पोटांत—जरा माणसांत येऊं दे ! ” असें म्हणून त्या बिचाऱ्यावर उगीच खेंकसून गोकुळ तिथून निघून गेला.

## ८

भटजीच्या हातून चहाचा पेला घेऊन विनोदनें तो ओतून टाकला. पण तो किती गुपचूपपणें तयार केला होता, असा टाकून दिल्यामुळें कुणाच्या मनावर कसा आघात झाला, तें त्या एका देवालाच माहीत.

साऱ्या दिवसांत विनोदचें पुष्कळांबरोबर बोलीभाषण झालें खरें, पण वडील भावाची नुसती सावली दिसली तरी देखील तो बाजूला सरकत होता—आणि ही सावली तर त्याला एक घडीचीसुद्धां फुरसत देत नव्हती. ज्या बाजूकडून वळून विनोद जायला निघे त्याच बाजूकडचें कांहीं ना कांहीं काम निघून गोकुळ तिथें हजर होई. अशा प्रकारें दिवस वर येत होता.

तिसऱ्या प्रहरीं विनोद आपल्या खोलींत एकटाच बसला होता. एक कागद हातीं घेऊन गोकुळ तिथें येऊन उभा राहिला. उगीच थोडासा हंसण्याचा प्रयत्न करून तो म्हणाला, “ कलकत्त्यातलं घर सोडून तूं एकदम गेलास हजारीबागला—शेवटच्या घटकेला बाबांना तें कळलं वाटतं—कांहीं तरीच झालं तें ! ” असें म्हणून गोकुळनें पुनः एकदा हंसण्याचा खोटा आव आणून म्हटलें, “ तूं तरी काय घोटाळा केलास ? एक शब्दानं तरी कळवूंसुद्धां नये ?

तें जाऊं दे. झालं तें झालं!—तें होऊन जाईल सारं!—हीं कामं एकदा संपूं दे—एक बक्षिसपत्र लिहिलं—काय समजलास विनोद?—उगीच थोडेसे पैसे वायफळ खर्च होतील एवढंच—कळलं कीं नाहीं?—अन् इथले हे सारे लोक—सारं कांहीं माहीत आहे त्यांना—कळलं ना तुला?—कांहीं तरी बोलताहेत ते. सारी मिळकत तुम्हा दोघां भावांची असं बाबा सांगून गेले, एवढंच कळलं नाहीं कुणाला!—तें जाऊं दे. तेवढ्यानंच कांहीं अडलं नाहीं—आज मला जरा बरं वाटत नाहीं भय्या, ही तिजोरीची चावी राहूं दे तुझ्याकडे. आज शास्त्रीपंडित यायचे आहेत—कोण कसा, कुणाची काय लायकी, कुणाला काय द्यायचं तें तुझ्याशिवाय दुसऱ्या कुणाला कळणार आहे? आतां यावेळीं इथं बसून दोन शब्द बोलून तुझ्याबरोबर वाटाघाट करायला मला तर फुरसत नाहीं—" असें म्हणून गोकुळनें तिजोरीची किल्ली आणि दक्षणेची यादी कशीबशी त्याच्यासमोर ठेवून तिथून काढता पाय घ्यायला सुरवात केली. वामकुक्षी करून उठल्यापासून हें सारें भाषण मनांतल्या मनांत त्यानें ठरवून ठेवलें होतें.

विनोदनें त्या दोन्ही वस्तू दूर सारल्या आणि म्हटलें, "मला यांत गुंतवूं नका. मी याला हातसुद्धां लावणार नाहीं."

एका क्षणांत गोकुळच्या हंसतमुखावरची हंसण्याची छाया कुठल्या कुठें नाहींशी झाली. सारा दिवसभर विचार करून आपण ठरवलेली सारी योजना फुकट जाते आहे असें पाहून तो म्हणाला, "हात लावणार नाहीं? कां?"

विनोद म्हणाला, "मला काय करायचं आहे? मी बाहेरचा माणूस—दोन दिवसांसाठीं आलोंय—दोन दिवसांनीं निघून जाईन—"

गोकुळ उद्‌गारला, "निघून जाईन?"

विनोद म्हणाला, "गेलंच पाहिजे. शिवाय हा पैशाअडक्याचा व्यवहार. मी हा दरिद्री माणूस—दीनदुबळा—बरोबर हिशेब चुकवतां आला नाहीं तर तुम्ही मला चोर म्हणून पोलीसच्या हातीं द्याल अन् टाकाल तुरुंगांत अडकवून."

उत्तर देण्यासाठीं गोकुळचे ओंठ क्षणभर हालले एवढेंच. लगेच तो खालीं वांकला आणि चावी आणि कागद घेऊन बाहेर निघून गेला. मोठ्या थाटामाटानें पितृश्राद्ध करून नांवलौकिक करून घ्यायची आशा त्याच्या मनांतून एकदम नाहींशी झाली.

आणि आज सकाळपासून त्याला केवढा उत्साह वाटत होता! केवढी धामधूम चालली होती त्याची! संध्याकाळीं तो घरीं आला आणि पसरलेल्या कांबळ्यावर आडवा झाला त्यावेळीं त्याची बायको आंत आली आणि आश्चर्यचकित होऊन म्हणाली, " प्रकृति बिघडली आहे का? "

उदासपणें गोकुळ म्हणाला, " नाहीं. ठीक आहे. "

" तर मग असे येऊन झोपलांत कां? "

गोकुळनें उत्तर दिलें नाहीं. मनोरमेनें पुन: विचारलें, " भावजीबरोबर कांहीं बोलीभाषण झालं का! "

गोकुळ म्हणाला, " नाहीं. "

आतां तिला अवसान आलें. तिनें खालीं जमिनीवर बैठक मारली आणि त्याच्या कानाला लागून म्हटलें, " भावजी काय सांगत फिरताहेत तें आलं का तुमच्या कानावर? "

गोकुळ उगीच राहिला. मनोरमा आणखी थोडें पुढें सरकून म्हणाली, " ते म्हणतात म्हणे, कीं बाबा आजारी झाल्याचा पत्ताच नव्हता त्यांना—हजारीबाग कीं कुठंसे होते ना ते?—काय कावेबाज आहे हा तुमचा भाऊ? "

गोकुळनें प्रांजळपणें विचारलें, " कावेबाजी कसली? तुला नाहीं खरं वाटत? "

मनोरमा म्हणाली, " मला? मला वाटतंय तर! गळाभर गंगेंत उभं राहून शपथ केली तरीसुद्धां खरं वाटायचं नाहीं मला. "

ते उद्गार गोकुळला कर्णकटु वाटले. आपल्या या अद्वितीय आणि चार परीक्षा दिलेल्या कुलदीपक भावाच्या विरुद्ध कुणी कांहीं बोललेलें त्याला मुळींच खपत नसे. अशा वेळीं तो भडकून उठे पण आज त्याच्या काळजाला जो बाण बसला होता त्यामुळें तो अगदीं खचल्यासारखा झाला होता, म्हणूनच त्यानें तें भाषण मुकाट्यानें ऐकून घेतलें.

खोलींत दिवा होता खरा पण तो बराच अंधुक होता—त्यामुळें त्याच्या मुद्रेवर झालेला परिणाम मनोरमेला चांगलासा दिसला नाहीं—म्हणूनच ती म्हणाली, " खूप सावध रहा बरं, सावध रहा. आतां एकेक उपद्व्याप सुरू होतील. कुणाचं कांहीं ऐकूं नका. माझ्या बाबांना विचारल्याशिवाय कोणतीही

गोष्ट करूं नका. उद्यां सकाळच्या गाडीनं ते येणार आहेत इथं—मी कसं ना कसं तरी पत्र पाठवलंय त्यांना. तुम्ही कांहीं म्हणा, पण बाबा आल्याशिवाय माझा जीव खालीं पडायचा नाहीं."

गोकुळ एकदम उठून बसला आणि म्हणाला, "तुझे बाबा येणार आहेत होय?"

"कसे यायचे नाहींत? ते आल्याशिवाय कोण हा इथला कारभार सांभाळणार? निमतोल्याच्या कुंडूबाबूंच्या अडतीचा कारभार पाहतात ते. त्यांच्याशिवाय एक पानसुद्धां हलत नाहीं तिथलं. पण तसं आहे म्हणून मुलीच्या अडचणीच्या वेळीं नको का तें टाकून यायला?"

गोकुळ मुकाट्यानें ऐकत होता. मनोरमा खुषींत आली होती. नवरा ऐकतो आहे असें पाहून ती आणखी रंगांत आली आणि म्हणाली, "आतां या तुमच्या दुकानाची जी कांहीं जबाबदारी असेल ती टाका बाबांच्या अंगावर. मग कसलीच काळजी करायला नको. कुणाला मग नुसतं म्हणायचं, मला माहीत नाहीं—त्यांना विचार. बस्स! मग भावजी असोत कीं दुसरे कुणी असोत, कुणाची छाती होणार आहे त्यांच्यासमोर एक ब्र काढायची! कळलं ना?" असें म्हणून मनोरमेनें त्याच्याकडे एक अर्थपूर्ण कटाक्ष फेंकला. त्या अंधुक प्रकाशांत गोकुळला तो दिसला कीं नाहीं तें सांगतां येणार नाहीं, पण त्यानें होय किंवा नाहीं म्हणून कोणताच उद्गार काढला नाहीं.

त्यानंतर मनोरमा बऱ्याच गोड गोड गोष्टी बोलत बसली होती. तरीही नवऱ्याकडून कांहींच प्रत्युत्तर येईना. वारा कोणत्या दिशेनें वाहतो आहे तें ठरवतां येणें अशक्य झाल्यामुळें त्या रात्रीपुरतें तिनें आपलें भाषण तेवढेंच ठेवलें.

सकाळींच उठून गोकुळ अत्यंत घाईघाईनें भवानीच्या खोलीकडे आला आणि म्हणाला, "आई, तिजोरीची चावी विनोद तुझ्याकडे देऊन गेला का?"

भवानी थोडक्यांत म्हणाली, "छे! नाहीं!"

चावी गोकुळकडेच होती. पण कांहींतरी डाव टाकण्याच्या उद्देशानें त्यानें तें खोटेंच विचारलें होतें. असली वस्तू विनोदच्या हातीं देण्याच्या बाबतींत आपल्या आईला काय वाटतें याचा तो अंदाज घेत होता. पण आईच्या

संक्षिप्त उत्तरामुळें त्याचा सारा डाव फसला. तोंड वांकडें करून तो म्हणाला, " त्यानंच कुठं ठेवली, कीं मीच कुठं तरी ठेवली कोण जाणे ! "

भवानी कांहींच बोलली नाहीं. घरांत एवढी गर्दी सुरू असतांना तिजोरीची चावी सांपडत नाहीं असें कळून सुद्धां आईनें कोणत्याच प्रकारचा उद्वेग झाल्याचें दिसूं दिलें नाहीं, याचें त्याला आश्चर्य वाटलें. या प्रकरणीं ती कळकळ दाखवीत नाहीं ही गोष्ट गोकुळच्या मनाला लागून राहिली. एवढ्या महत्त्वाच्या बाबतींत लक्ष घालण्यापुरती जागृति तिच्याठायीं कशी उत्पन्न करावी हेंच त्याला सुचेनासें झालें.

थोडा वेळ थांबून तो म्हणाला, " शंभु आणि दरबारी आत्याबाईंना आणायला गेले ते सुद्धां अजून कसे आले नाहींत् ? "

भवानी थंडपणें म्हणाली, " कोण जाणे !—काय सांगावं !— "

गोकुळ म्हणाला, " तूं माणसं पाठवायला सांगितलंस आई, तें बरं झालं. आतां आली नाहीं तर मर्जी तिची. आम्ही आमच्या कर्तव्यांतून मोकळे झालों. किती दूरवर नजर ठेवून तूं वागतेस आई, त्याचं कौतुक वाटतं मला— तुझ्याशिवाय मला— "

भवानी उगीच बसून राहिली होती. गोकुळच्या तोंडचे हें भाषण ऐकून तिच्या गंभीर दुःखी चेहऱ्यावर संतोषाचें किंवा आनंदाचें ऐवढेंसुद्धां चिन्ह दिसून आलें नाहीं. किती तरी वेळ गोकुळ तिच्या बोलण्याची वाट पहात तिथेंच उभा राहिला होता. शेवटीं कंटाळून तो तिथून निघून गेला.

बाहेर आल्यावर गोकुळ अगदीं बैचेन झाला होता. त्याचवेळीं जिल्ह्याचे डेप्युटी आणि कांहीं वकील मुखत्यार मंडळी निमंत्रणावरून भेटीसाठीं आली होती. विनोद त्यांच्याबरोबर बसून मोकळ्या मनानें बोलत होता. या मोठ्या माणसांकडे आपल्या धाकट्या भावाचा यथार्थ परिचय करून देण्यासाठीं गोकुळचा जीव खालीं वर होत होता. विनोद त्यांच्याजवळ बसला असल्यामुळें चार परीक्षा देऊन तो एवढा मोठा विद्वान झाल्याची खबर त्यांना देणें अशक्य झालेलें पाहून गोकुळ कातावून गेला होता.

कांहीं वेळ मागेंपुढें करून तो डेप्युटीसाहेबांच्या समोर आला आणि लवून सलाम करून अतिशय विनयपूर्वक बोलला, " हा माझा धाकटा भाऊ विनोद—ऑनर ग्रॅज्युएट ! "

विनोद रागारागानें डोळे वटारून आपल्या वडील भावाकडे पाहूं लागला पण त्याच्याकडे लक्ष न देतां तो हात जोडून म्हणाला, "माझ्या वाडवडिलांचं भाग्य म्हणून आपले पाय या घराला लागले!—विनोद, साहेबांबरोबर तूं इंग्रजी भाषेत कां बोलत नाहींस? ते मॅजिस्ट्रेट आहेत. त्यांच्याबरोबर बंगालींत बोलणं बरं दिसतं का? चार लोकांनीं ऐकलं तर ते काय म्हणतील तुला?"

आजूबाजूच्या लोकांनीं त्याच्याकडे अर्थपूर्ण नजरेनें पाहिलें, स्वत: डेप्युटीसाहेब संकोचानें स्तब्ध बसले आणि अत्यंत शरम वाटल्यामुळें बिचाऱ्या विनोदचा चेहरा गोरामोरा झाला. दादाचा स्वभाव त्याला पूर्णपणें माहित होता. वेळींच आवरलें नाहीं तर त्याची मजल कुठवर जाऊन पोंचली असती तें सांगतां आलें नसतें.

"एक गोष्ट सांगायची आहे—" असें म्हणून त्यानें बळेंबळेंच हात धरून गोकुळला एका बाजूला घेतलें आणि म्हटलें, "मला आतांच घरांतून घालवून द्यायचं आहे का दादा? असं कांहीं बोलाल तर मला इथं एक क्षणभरसुद्धां राहतां यायचं नाहीं."

गोकुळ घाबरून म्हणाला, "काय? काय झालं?"

"आपला हा अत्याचार माझ्या सहनशक्तीपलीकडे गेला आहे—केव्हांपासून सांगतों आहें—पण तुम्ही माझा पिच्छा सोडीत नाहीं. असली परीक्षा दिलेले माझ्यासारखे लोक गल्लोगल्लीं हिंडताहेत!"

रागानें विनोदचा चेहरा तांबडा लाल झाला होता. तो आपल्या जागीं येऊन बसला. शरमिंदा होऊन गोकुळही दुसरीकडे निघून गेला.—यापुढें असें कांहीं बोलायचें नाहीं असा त्यानें आपल्या मनाशीं निश्चय केला असावा.

पण अर्ध्या तासाच्या आंतच विनोदबरोबरच—जमलेल्या साऱ्या मंडळीच्या कानीं आलें—मोठमोठ्यानें ओरडून गोकुळ एका नोकराला बजावीत होता—"छोट्या बाबूंचं ऑनर ग्रॅज्युएटचं सोन्याचं मेडल् हाताळून सारेजण खराब करून टाकाल!"

गालांतल्या गालांत हंसून डेप्युटीबाबूंनीं एकदां विनोदकडे पाहून लगेच दुसरीकडे पाहायला सुरवात केली.

# ९

निमतोलाच्या कुंडूंच्या अडतीच्या कामाची खोटी करून गोकुळचा सासरा येऊन हजर झाला. पिकले केंस, काळी मिशी,—नोकझोकांत जरा विशेष खुलून दिसणारा तो एक पक्का माणूस होता. अडतीवरचीं कामें करणारीं मुलें त्याच्या पाठीमागें त्याला ' घरघुबड ' म्हणत. घरीं आल्याबरोबर एका घटकेच्या आंत साऱ्या व्यवहाराचीं सूत्रें आपल्या हातीं घेऊन प्रत्येका-बरोबर बोली-भाषण करायला त्यांनीं सुरवात केली. कर्मदक्ष आणि अत्यंत हिशेबी असलेल्या या सासऱ्याच्या आगमनानें गोकुळला मोठा आनंद झाला. मुलगी आणि जांवई यांनीं केलेला अत्याग्रह हिशेबीं न घेणें अशक्य झाल्या-मुळें इथली व्यवस्था पाहण्यासाठीं येण्याची या गृहस्थानीं कशी तसदी घेतली होती, ही हकिकत पाहतां पाहतां साऱ्या आप्तेष्टमंडळींत फैलावली गेली.

प्रहर रात्र झाली होती. नुकतींच जेवणींखाणीं उरकलीं होतीं. नोकरानें येऊन सांगितलें, " धनीसाहेब बोलावताहेत. "

घाईघाईनें उठून गोकुळ येऊन हजर झाला. श्वशुरमहाशय निमाई राय एका बहुमोल गालीच्यावर बसून नातीला जवळ घेऊन फराळ करीत होते. जवळच बसून त्यांची कन्या मनोरमा माथ्यावरचा पदर बराचसा पुढें ओढून घेऊन पिताजींसमोर आपल्या सावत्र आईचें गुणगान करीत होती. गोकुळ आला तो याचवेळीं. श्वशुरमहाशयांनीं खिरीची वाटी एका घोटासरशी खालीं केली, वाटीच्या कांठावर मिशा पुसून घेतल्या, वर पाहिलें आणि प्रश्न केला, " एक विचारायचं आहे तुम्हांला—मी असं म्हणतों, हातचा घोडा आणि तोंडचा बोल एकदां सुटून गेला कीं फिरून येतो का कधीं ? "

गोकुळ हतबुद्ध होऊन म्हणाला, " नाहीं ! "

निमाईबाबूंनीं आपल्या मुलीकडे प्रेमळपणानें पाहून हंसत जांवयाला उद्देशून म्हटलें ! " मग ? "

या ' मग ' चा अर्थ आकाशपातळ एक केलें तरी जांवईबाबूंना मुळींच कळला नाहीं. तो उगीच राहिला. निमाईबाबूंनीं ठाकठीकपणानें प्रस्ताव मांडायला सुरवात केली. ते म्हणाले, " बाबाजी, तुम्ही दोघां पोरांनीं रडारोय

करून या तुफानांत सुकाणुं धरण्यासाठीं मला बोलावून आणलं. हें सुकाणुं मला धरतां येईल—मी धरीनही—पण इथं घाई करून चालायचं नाहीं बाबा. जिथं बस म्हणेन, जिथं उभा रहा म्हणेन, तिथं अगदीं तसंच वागावं लागेल, तरच या तुफान समुद्रांत हें गलबत काबूत ठेवतां येईल मला. तुम्हीं कांहीं तरी बडबडत फिरतां आहां, विनोद हजारीबागला होता म्हणतांहां—हें काय चाललं आहे ? आपल्याच पायांवर आपणच कुऱ्हाड मारून घेतल्यासारखं होतंय हें, याचा कांहीं विचार केला आहे का ?"

बापाचें व्याख्यान ऐकून मुलीला आनंदाच्या उकळ्या आल्या. ती कुजबुजत म्हणाली, "विचार केला आहे तर बाबा, म्हणून तर तुम्हांला बोलावून आणलं. आम्हांला कांहीं कळत नाहीं—तुम्ही जसा हुकूम कराल तसं होऊन जाईल इथं. तुम्ही हें कां केलंत अन् कां नाहीं केलंत, एवढं सुद्धां आम्ही विचारणार नाहीं."

पिताजी खूष होऊन म्हणाले, "हेंच मला पाहिजे आहे मुली. मामला-मुकद्दमा करणं फार भयंकर. शिवी द्यायची असली कीं लोक म्हणतात, 'तुझ्या घरावर वकील पडो!' तें ऐकलं आहेस ना ? आतां तोच प्रसंग तुझ्या घरावर आला आहे. माझं डोकं तसंच शाबूत आहे म्हणून तर मी हें धाडस केलंय. तुमच्या या भानगडीचा शेवट लावीन तेव्हांच इथून जाईन—मग त्यांत माझं काय वाटेल तें होवो! एकेकाला मानगुटीला धरून बाहेर काढलं तरच मला म्हण बद्दीपाड्याचा 'निमाई राय'!"

वाटरलूची लढाई जिंकल्यावर वेलींग्टनच्या चेहऱ्यावरसुद्धां एवढी अभिमानाची छटा दिसली नसेल—अशा मुद्रेनें त्यांनीं त्या दोघांकडे पाहिलें.

दाराबाहेर पाहून आवाज वर चढवून ते म्हणाले, "मनु, पोरी, इथंच माझ्या हातावर पाणी घाल पाहूं—जरा आंचवून घेतों. आतां नाहीं बाहेर जात. आणखी असं पहा, जरा बाहेर नजर टाक, कुणी कुठं भिंतीला कान देऊन राहिलं आहे कीं काय ? कुणी सांगावं—किती झालं तरी ही शत्रूची छावणी!"

सांगितल्याप्रमाणें कामगिरी बजावून मनोरमा आपल्या जागीं येऊन बसली. गोकुळ केविलवाणा चेहरा करून एकदां आपल्या बायकोकडे आणि एकदां आपल्या सासऱ्याकडे पहात राहिला होता. आतांपर्यंत बापलेकीचें जें भाषण

झालें त्यांतला एक शब्दसुद्धां त्याला कळला नव्हता. ही गोष्ट कुणाची, कुणाच्या घरांत मामला शिरला, कुणाचा गळा पकडून कोण कुणाला बाहेर काढणार, कुणाचा सर्वनाश कशा प्रकारें झाला वगैरे सूचक गोष्टींतील एक तिळभरसुद्धां अर्थ त्याला कळूं शकला नाहीं. तो नुसता ताठरून बसला होता. निमाईबाबूंनीं म्हटलें, " उभे कां राहिलांत बाबाजी ? जरा स्वस्थपणें बसा. एकदां चार शब्द बोलून घेऊं दे. "

गोकुळ तिथल्या तिथेंच बसला.

ते बोलत होते, "—हीच खरी संधि आहे. जर कांहीं करायचं असेल तर हीच वेळ ! हें प्रकरण कोर्टांत जाणार, सत्यानाश होणार—अगदीं नजरे-समोर दिसतंय मला. मी म्हणतों, जाऊं दे ! अशा बाबतींत मी कच खायचा नाहीं—तसं भ्यावं हाटखोलच्या यदू वकीलानं अन् तारिणी मुखत्यारानं. बद्दी-पाड्याच्या निमाईरायचं नांव ऐकलं, कीं बड्या बडया वकील बॅरीस्टरांचंसुद्धां धाबं दाणाणतं !—अन् हें तर कालचं पोर—चार इंग्रजी शब्द कळतात एवढंच ना ? "

यापुढें गोकुळला स्वस्थ राहवेना. भीत भीत पण विनयानें त्यानें प्रश्न केला, " आपण कुणाबद्दल बोलतांहांत ? कुणाचा खटला ? "

या वेळीं थक्क होण्याची पाळी आली ती बद्दीपाडयाच्या निमाई रायवर. तो प्रश्न ऐकल्याबरोबर अत्यंत आश्चर्यचकित होऊन ते गोकुळच्या तोंडाकडे नुसते पहात राहिले.

मनोरमा अस्वस्थ होऊन बोलायला एकदम पुढें सरसावली, " पाहिलंत ना बाबा, मी म्हणतें तें हेंच ! हे आतां विचारताहेत कुणाचा खटला म्हणून. तुम्हाला शपथेवर सांगतें बाबा, यांच्यासारखा सरळ नि सीधा माणूस या भू-भारतांत मिळायचा नाहीं. भावजींनीं यांच्या डोक्यावरून हात फिरवला तर त्यांत आश्चर्य कसलं ? तुम्ही आलांत तेवढाच मला आधार वाटतोय—नाहींतर पहातां पाहतां तुमचीं मुलं नातवंडं भीक मागायला आलीं असतीं रस्त्यावर ! "

एक मोठा सुस्कारा सोडून निमाई राय म्हणाले, " तेंच तर !—तें जाऊं दे. आतां ती भीति नाहीं—मी येऊन पोंचलोंय ! पण या तुमच्या दुकाना-वरच्या चक्कोत्ति फक्कोत्तींना मी आधीं लाथ मारून घालवणार. हे सारे झालेयत वराची मावशी अन् वधुची आत्त्या ! कळलं ना पोरी ? आंतून

त्यांनीं विनोदबरोबर संधान बांधलंय—नाहीं शाबीत झालं तसं, तर माझं नांव निमाई रायच नव्हे ! नुसत्या सावलीवरून माणसाचं मन सांगेन मी ! ”

निमाई रायनीं असें म्हणून एकदां गोकुळकडे आणि एकदां आपल्या मुलीकडे नजर फेंकून पाहिलें. एकदम संमति देऊन मुलगी म्हणाली, “ आत्तां का ? आत्तां का ? मला काय कळत नव्हतं बाबा ? सारं कळत होतं मला. कळून सवरून मूग गिळून बसलेंय मी. तुम्हाला वाटेल त्याला ठेवा, तुम्हाला वाटेल त्याला काढून टाका, आम्ही एक शब्दसुद्धां बोलणार नाहीं.”

आतां कुठें गोकुळच्या डोक्यांत प्रकाश पडला.—आपला धाकटा भाऊ विनोद आपल्याविरुद्ध कोर्टांत दावा करण्याची मसलत करतो आहे, त्याचा तो कट यांना अचुक कळला आहे, अन् आपण मात्र मूर्खासारखा या धाकट्या भावाला खूष करण्यासाठीं त्याच्या मागेंमागें हिंडतों आहें !

त्याच्या रागाचा भडका ब्रह्मरंध्र भेद करून पहिल्यानें जळजळत उठला—पण तो अगदीं क्षणभरच. दुसऱ्याच क्षणाला तो जाळ निवून गेला. घनघोर अंधारानें त्याची दृष्टि, त्याची बुद्धि, त्याचें सारें चैतन्य उलटून पालटून टाकलें. त्याला वाटूं लागलें, कितीतरी लोक एकामागून एक आपल्या कानाजवळ येऊन किंचाळत आहेत,—‘ विनोद तुला कोर्टांत खेंचतो आहे ! ’

निमाई राय म्हणाले, “ आतां पैशाकडे पाहून चालायचं नाहीं बाबाजी, साक्षीदार तयार केले पाहिजेत. त्यांच्या तोंडीं तर सारा दावा. कळलं ना बाबाजी ? ”

मान झुकवून गोकुळ काष्ट होऊन बसला होता. कळलें कीं नाहीं तें त्यानें कांहींच सांगितलें नाहीं. कदाचित् ते शब्द त्याच्या कानीं गेले नसावेत.

पण ते शब्द त्यांच्या मुलीच्या कानीं गेले होते. तिनें द्यायचे ते हुकूम देऊनसुद्धां टाकले होते. अर्थात् मुलगी आणि जांवई यांच्यांत भेद नसल्यामुळें तिच्याच शब्दावर काम चालवायला हरकत नव्हती. तरीही, साक्षीदारांच्या बाबतींत जो पैसा गुपचुप खर्च घालावा लागणार होता त्याचा हुकूम जांवयाच्या तोंडून न मिळाल्यामुळें रायमहाशयांच्या उत्साहाचा जोर जरासा ढिला पडला. ते म्हणाले, “ ठीक आहे. उद्यांपरवां या बाबतींत स्वस्थपणें काय तें निश्चित ठरवून टाकूं. आतां तुम्ही जा बाबाजी. हातपाय धुऊन थोडा फराळ करा. सारा दिवस—”

त्याचें भाषण पुरें होण्यापूर्वीच गोकुळ उठून मुकाट्यानें बाहेर गेला. मुलीला उद्देशून रायमहाशय म्हणाले, " बाबाजी तर कांहीं बोललेच नाहींत ! पैशाशिवाय कोर्टकचेरीचीं कामं कशीं होतील ? प्रतिपक्षाचे साक्षीदार फोडायचं काम काय रिकाम्या हातानं होतं रे बाबा ? असं भिऊन कसं चालेल ? "

निमाई राय म्हणजे एक बुद्धिमान गृहस्थ होते. माणसाच्या सावलीवरून त्याच्या मनाचा ठाव त्यांना घेतां येत होता. अर्थात् गोकुळ जो हा निरुत्तर होऊन बसला तो पैसा खर्चीं घालायच्या भीतीनें, हें कळायला त्यांना एक क्षणसुद्धां लागला नाहीं.

पण तेवढ्यासाठीं अशा संकटाच्या काळांत भलता राग धरून बसून मुलीला निराधार टाकायची त्यांची तयारी नव्हती. बिनहिशेबी पैसे खर्च करण्याचें जोखीम जिव्हाळ्याच्या माणसाखेरीज दुसऱ्या कुणी आपल्या माथीं घेतलें असतें ? म्हणूनच स्वतःचें केवढेंही नुकसान होवो, कुंडूच्या अडतीचें काम कोसळून पडो, आतां मागें पाऊल घ्यायला वावच राहिला नव्हता. कळलें तर लोक थुंकतील ना तोंडावर ?

गोकुळ निघून गेल्यावर सारी रात्रभर अशा प्रकारें सर्व गोष्टीचा मागला-पुढला विचार करून त्यांनीं आपल्या संकटांत सांपडलेल्या मुलीला धीर दिला.

## १०

अगदीं क्षुल्लक कारणावरून चिरडीला यायची गोकुळला संवय होती. सारी रात्र जागून सकाळींच उठून ज्यावेळीं तो आपल्या सावत्र आईच्या खोलींत आला त्यावेळीं त्याची भकास मुद्रा पाहून भवानी घाबरून गेली. आंत पाऊल टाकतांच तो म्हणाला, " अंः ! सावत्र आई म्हणजे काय तें आतां कळलं. "

आजकाल त्याचें हेंच पालूपद सुरू होतें. उगीच इकडलें तिकडलें बोलून भवानीला तो जो त्रास देत होता त्यामुळें त्याच्या स्वतःच्या चांगुलपणाचें स्वरूप नष्ट होऊं लागलें होतें. श्राद्धासाठीं आलेले बाहेरचे लोक आणि आप्तेष्ट मंडळी अजून घरींच असल्यामुळें मनाचा संयम राखून तिनें थोडक्यांत विचारलें, " काय झालं ? "

गोकुळ एकदम भडकला. तो म्हणाला, " होणार काय ? काय करणार

आहांत तुम्ही लोक ? विंद्याला म्हणावं, खुशाल जा कोर्टात. कांहींसुद्धां व्हायचं नाहीं—कांहीं करतां यायचं नाहीं तुम्हाला—सांगून ठेवतोंय ! निमाईराय—बद्दीपाड्याचे निमाईराय म्हणजे असे तसे माणूस नव्हत ! खूप समजून ठेवा ! ”

भवानीचा राग नाहींसा झाला. आश्चर्यचकित होऊन ती म्हणाली, “विनोद दावा घालतो आहे असं कुणी सांगितलं तुला ? ”

गोकुळ म्हणाला, “ सारेच सांगताहेत, विनोद माझ्यावर दावा घालणार आहे. आता कुणाला कळायचं राहिलंय तें ? ”

भवानी म्हणाली, “ मला कुठं कळलं नाहीं तें ! ”

“ ठीक आहे. कळलं कीं नाहीं तें आतां आम्ही पाहून घेतों ! ”

गोकुळ रागारागानें खोलीबाहेर निघून जात होता -- पण तितक्यांत वळून थांबला. सहसा त्याच्या तोंडून त्याच्या सासऱ्याचे शब्द बाहेर पडेल, “ तुमच्या सारख्या वैऱ्यांना आतां या घरीं राखणं शक्यच नाहीं !—” पण ते शब्द तोंडातून बाहेर पडतात न पडतात तोंच त्याचा रुद्रावतार ओसरला आणि भीतीनें त्याचा चेहरा पांढरा फटक झाला. तो एवढेंसें तोंड करून राहिला होता. व्याधानें शरसंधान केलेल्या मनुष्यासमोरून घाबरलेला हरिण ज्ञानशून्य होऊन ज्या प्रमाणें सैरावैरा पळूं लागतो, त्याचप्रमाणें गोकुळ आपल्या आईच्या समोरून घाबऱ्या घाबऱ्या पळून गेला.

आतां आपल्या तोंडून कोणते शब्द निघून गेले याची त्याला जाणीव झाली. त्या दिवशीं सारा दिवस घरांत कुठें त्याचा पत्ता लागला नाहीं. कुटुंबभोजनाच्या वेळीं देखील तो हजर नव्हता. भवानीनें चौकशी केली त्या वेळीं तिला कळलें, जरूरीच्या कामासाठीं तो कुठें बाहेर गेला होता. परत केव्हां येणार तें सांगून गेला नाहीं. घरधन्याचा अधिकार हातीं घेऊन निमाई-राय यानीं कुणाच्या आदरसत्कारांत एवढीसुद्धां कमतरता पडूं दिली नाहीं. जे बाहेरचे आमंत्रित पाहुणे आले होते त्यांच्या पंगतीला बसून विनोद मुकाट्यानें जेवण करून निघून गेला.

वादळ सुरू होण्याच्या पूर्वी वातावरणांत जशी अवकळा निर्माण होते त्याच प्रकारची अवकळा माणसांनीं गजबजलेल्या त्या घरांत दिसून येऊं लागली. कारण काय झालें तें कळत नव्हतें तरीही नोकरचाकर माणसें चोरट्यासारखीं इकडे तिकडे वावरत होतीं.

अशाच प्रकारें आणखी दोन दिवस गेले. श्राद्धासाठीं आलेल्या लोकांपैकीं एकेकजण निरोप घेऊन जाऊं लागला. आपल्या मुलांबाळांना घेऊन आत्याबाई वर्धमानला निघून गेली होती. बाहेरच्या बैठकीच्या खोलींत विनोद सकाळपासून संध्याकाळपर्यंत बसून वेळ काढीत होता. तो कुणाशींच भाषण करीत नव्हता. आज भवानीमुद्धां मुखस्तंभ होऊन राहिली होती. गोकुळ सर्वांच्या दृष्टीआड राहायचा प्रयत्न करीत होता. आंत बाहेर कुठेंमुद्धां त्याचा थांगपत्ता लागत नव्हता.

अशा प्रकारें आणखी चार दिवस गेले—मनोरमा आणि तिचीं मुलेंबाळें यांखेरीज घरांत दुसऱ्या कुणाचीच जाग दिसून येत नव्हती.

कलकत्त्याचा संबंध तोडून टाकण्यासाठीं निमाई राय तिकडे गेले होते. बिचाऱ्या कुंडूंना निराधार वाऱ्यावर सोडून मुलगीजांवयाचे हितसंबंध पाहण्यासाठीं ते पुन: एके दिवशीं सकाळीं येऊन हजर झाले. येतांना त्यांच्या बरोबर त्यांचा धाकटा मुलगा आला होता. त्याच्या येण्याचा उद्देश जरी उघडपणें सांगण्यांत आला नव्हता तरीही बहिण आणि मेहुणा यांच्या नुसत्या भेटीसाठीं व्याकूळ होऊन तो आला नव्हता खास !

गेले कांहीं दिवस श्वशूरमहाशयांसारख्या जाणक माणसाच्या उत्तेजनाअभावीं आजवर गोकुळ मेल्यागत झाला होता. आतां त्याची ती वृत्ति बदलली होती. मनोरमेबद्दल तर बोलायलाच नको—सकाळपासून साऱ्या घरभर ती जशी कांहीं नाचत होती.

जेवणींखाणीं उरकल्यावर मनोरमेच्या खोलींत सर्वांची बैठक भरली. बराच वादविवाद होऊन सारें कांहीं निश्चित करण्यांत आलें.

आज चक्रवर्तीकडे त्यांची नजर वळली होती. त्याला निरोप देण्यापूर्वी निमाईबाबू सारे कागदपत्र हडसून खडसून पारखून घेऊं लागले होते. बिचारा चक्रवर्ति खचल्यासारखा झाला होता. मन बावरून गेल्यामुळें त्या बिचाऱ्याला प्रश्नांची उत्तरें धड देतां आलीं नाहींत, कीं हिशेबठिशेबही नीट समजावून देता आले नाहींत. बापबेट्यांनीं त्याला धमकावणी द्यायला सुरवात केली. त्यांच्या करड्या जरबीच्या माऱ्यामुळें त्यांचें त्यांनींच स्वत:ला चोर ठरवून घेण्यांत या बैठकीचा शेवट झाला.

निमाई म्हणाले, “ मी नव्हतों म्हणूनच तूं आजवर खूप पैसे खाल्लेस ! आतां बस्स झालं. जा. तुला बडतर्फ केलं आहे. ”

चक्रवर्तीच्या डोळयांतून आसवें गळूं लागलीं. तो म्हणाला, " मी आजकालचा नोकर नाहीं बाबू. थोरले घरधनी मला चांगला ओळखीत होते. "

गोकुळ मान खालीं घालून बसला होता.

रायमहाशयांचा धाकटा मुलगा तोंड वेंगाडून म्हणाला, " माझे बाबा म्हणजे तुझ्या धन्यासारखे बैलोबा का रे वाटले तुला ? जास्त बोलायचं काम नाहीं. निघ बाहेर. "

त्या यःकश्चित् पोरट्याच्या—गोकुळच्या मेहुण्याच्या अभद्र वागणुकीमुळें चक्रवर्तीच्या मनावर विशेष परिणाम झाला. क्षणभर थांबून डोळे पुसून घेऊन तो गोकुळला उद्देशून म्हणाला, " बाबू, माझा चार महिन्यांचा पगार ?—"

गोकुळ घाईघाईनें म्हणाला, " तो तर आहेच कीं ! शिवाय आणखी—"

निमाईबाबूंनीं त्याचें भाषण पुरें होऊं दिलें नाहीं. डावा हात पुढें करून गोकुळला थांबवून ते घनघोर गंभीरपणानें म्हणाले, " तुम्ही थांबा ना बाबाजी !—" चक्रवर्तीकडे वळून ते म्हणाले, " बाबू ते नव्हे—बाबू मी. इथं माझा अंमल सुरू आहे. तुला पगार मिळणार नाहीं. तुरुंगांत घातला नाहीं तुला, हेंच मोठं भाग्य समज. "

एक शब्द सुद्धां न बोलतां चक्रवर्ति उठून गेला.

अजूनपर्यंत बोलायची संधि न मिळाल्यामुळें मनोरमा सळसळत होती. चक्रवर्ति जातांच तिनें मुद्रा गंभीर केली, आवाजांत शक्य तेवढा लाडिकपणा आणला आणि नवऱ्याला उद्देशून ती हळुच म्हणाली, " यापुढं बाबांच्या कारभारांत तोंड घालाल तर मी गळयाला फांस लावून घेईन—नाहींतर सर्वांना घेऊन माहेरीं निघून जाईन ! "

गोकुळ कांहीं बोलला नाहीं. मान खालीं घालून मुकाट्यानें बसून राहिला. नवरा आतां पूर्णपणें आपल्या काबूंत आला आहे अशी खात्री झाल्यामुळें ती मोठ्या खुषींत आली आणि बापभावांना खुणावून नवऱ्याकडे वळून पुनः आपल्या बापाला उद्देशून म्हणाली, " बरं बाबा, आमच्या या नन्ददुलालला दुकानावरच्या कसल्या तरी कामांत गुंतवा ना. "

निमाई म्हणाले, " तेवढ्याचसाठीं तर पोराला बरोबर घेऊन आलों ना ? मला कांहीं इथं फार दिवस राहतां यायचं नाहीं. माझीं चालू कामं तिकडे

बंद पडतील ना ? तसं येणं मला शक्य होतं का पोरी ? मालकाबरोबर भाडून निघून आलोंय मी. तो बिचारा रडकुंडीला येऊन म्हणाला, 'रायमहाशय, तुम्ही परत येईपर्यंत माझं जेवणखाण बंद होईल बरं ! अहोरात्र तुमची वाट पहात राहिलों आहें असं समजा !' तेव्हां मी असं ठरवलंय पोरी, आमच्या या नन्ददुलालला सारं कांहीं एकदां दाखवून देईन—चांगला शिकवून पढवून इथ ठेवून जाईन. कांहीं झालं तरी तो मुलगा माझाच ना !"

"एवढं करून जाच बाबा. मी तेवढ्यासाठीं तर—"

मनोरमेनें चट्कन् माथ्यावरचा पदर ओढून घेऊन बोलणें थांबवलें. चक्रवर्ति खोलीच्या समोर येऊन उभे राहिले होते. ते म्हणाले, "बाबू, आई आल्या आहेत—"

अकस्मात आई आल्याचें ऐकून गोकुळ कावराबावरा झाला. आज सात आठ दिवस त्या दोघांची भेटसुद्धां झाली नव्हती. दाराआड उभी राहून भवानी शांतपणें म्हणाली, "गोकुळ !"

घाईघाईनें उठून उभें राहून गोकुळनें उत्तर दिलें, "काय आई ?"

तशीच आड राहून भवानी तितक्याच खणखणीत आवाजांत म्हणाली, "हें वेड कुणी तुझ्या डोक्यांत घातलं ? चक्रवर्ति महाशय म्हणजे आज किती दिवसाचे आपले माणूस—हयातीपर्यंत त्यांनीं इथं असायचं असं ठरलेलं—तिजोरीची किल्ली अन् खातेवह्या देऊन त्यांना दुकानीं पाठव पाहूं."

तिथें विज कोसळली असती तरी देखील कुणाला इतकें आश्चर्य वाटलें नसतें. क्षणभर थांबून भवानी म्हणाली, "आणखी एक सांगायचं आहे—व्याही-महाशय कृपा करून आलेयत, घरच्या माणसारखं दोन दिवस रहा म्हणावं त्यांना—नुसतं पहा, ऐका. दुकानांत चोरी होते कीं नाहीं याची काळजी.करायची त्यांना जरूरी नाहीं ! चक्रवर्ति महाशय, आपण उशीर लावूं नका. जा पाहूं. बाहेरच्या माणसांनीं दुकानांत शिरून खातेवह्या उलथून घालमेल करणं मला नाहीं मंजूर. गोकुळ, किल्ली दे. त्यांना जाऊं दे !"

उत्तराची अपेक्षा न करतां भवानी एकदम तिथून निघून गेली. ती गेल्याची चाहूल आंत ऐकूं आली. आंतील स्तंभितपणाचें वातावरण दूर झालें. निमाई राय हंसण्याचा प्रयत्न करीत म्हणाले, "यालाच म्हणतात 'परक्याच्या दौलतीची फुकट फौजदारी !' हुकूम सोडायचा ढंग पाहिलात बाबाजी ?"

बाबाजींनीं उत्तर दिलें नाहीं. उत्तर दिलें तें त्यांच्याच मुलानें. तो म्हणाला, " हें तर कळलंच होतं बाबा! तुम्ही असलांत कीं चोरी पचायची नाहीं. बलीहारी या हुकमाची!"

मानेनें होकार देत पिताजी उद्गारले, " तेंच तर!" चक्रवर्तीकडे नजर गेल्यामुळें ते तोंड वेंगाडून म्हणाले, " उभा राहिला आहेस कशाला रे इथं? चालता हो ना. बोलावून आणतो म्हणे! निमकहराम! तुरुंगांत धाडलं नाहीं म्हणून का? निघ माझ्या नजरेसमोरून. ब्राम्हण म्हणून गय केली—म्हटलं मरेना का—एकदां झालं तें झालं—म्हटलं दहा पांच रुपये देऊन टाकूं—पण पुन:?—तुला तुरुंगांतच घातलं पाहिजे होतं."

नवऱ्याच्या मुद्रेकडे पाहिल्यामुळें मनोरमेला यावर बोलण्याचें धैर्य झालें नाहीं. आई आल्यापासून गोकुळ जो खालीं मान घालून उभा राहिला होता तो अजूनही तसाच दगडाच्या पुतळीप्रमाणें उभा होता. त्या कुणाच्या बोलण्याला उत्तर न देतां मालकाला उद्देशून चक्रवर्तीनें नमस्कार केला आणि म्हटलें, " तर मग खातेवह्या घेऊन मी जातों. किल्ली द्या तिजोरीची."

एक शब्दसुद्धा न बोलतां गोकुळनें कनवटीचा किल्ल्यांचा जुडगा काढून चक्रवर्तीच्या पायाकडे फेंकला. किल्ल्या खिशांत टाकून, खातेवह्या बगलेला मारून, येत असलेलें हंसें दाबीत चक्रवर्ति डौलांत निघून गेला. त्याच्या या जाण्याचा अर्थ आतां अगदीं उघड झाला होता. कुणाला कांहींच विचारलें नाहीं तरी बद्रीपाड्याच्या निमाई रायच्या तोंडाला जगांत असलें नसलेलें सारें काजळ फांसलें गेलें होतें.

यानंतर त्या खलबतखान्यांत जें दृश्य दिसलें तें अनिर्वचनीय होतें. बापाच्या आणि भावाच्या या अपमानामुळें बेभान झालेल्या मनोरमेनें नवऱ्यावर तोंड टाकलें, घालून पाडून बोलून पाहिलें, भीति दाखवली, विनवणी केली आणि शेवटीं रडून पाहिलें तरीसुद्धां आपल्या बापाची तरफदारी करायचा एकही शब्द गोकुळच्या तोंडून निघत नाहीं असें जेव्हां तिला दिसून आलें, तेव्हां बिछान्यांत तोंड खुपसून ती मुडद्यासारखी पडून राहिली.

गोकुळला राग आला होता तसाच तो शरमिंदाही झाला होता. रडकुंडीला येऊन तो म्हणाला, " हा हुकूम सोडून आई माझं वैर साधील हें कसं कळावं मला?"

एक मोठा सुस्कारा सोडून निमाई राय म्हणाले, "जाऊं दे—बलाय गेली! एका जबरदस्त भानगडींतून मोकळा झालों. भोळ्या शंकरासारखा हा घरचा मालकच जिथं रडत बसलाय तिथं आम्हाला कोण विचारणार? शिवाय गाठचं खाऊन शेटची नोकरी करायचा हा उपद्व्याप कशाला? पण मनू, पोरी, पोराबाळांचा हात धरून जेव्हां रस्त्यावर उभं रहावं लागेल—तें व्हायचंच—अगदीं उघड उघड दिसतंय मला—तेव्हां मात्र मला दोष देऊं नकोस! आपल्याकडे पाहिलं नाहीं असं मात्र तेव्हां म्हणूं नकोस. तसला बाप मी नाहीं—अगदीं स्पष्ट सांगून ठेवतोंय—मग मुलगी असो कीं जांवई असो!" असें म्हणून त्यानें एक रागाचा कटाक्ष जांवयाकडे फेंकला.

पण कटाक्ष त्याच्याच मुलाखेरीज दुसऱ्या कुणाला लागला नाहीं. तें पाहून तो आणखी उठून उसळून म्हणाला, "अजून तेढा झालों नाहीं—पण एकदां तेढ धरली कीं निमाई राय कुणाचा नव्हे. ब्रह्माविष्णुलासुद्धां हटायचा नाहीं. आतां असं करा, तुम्ही उभयतां आपसांत विचार करून ठरवा!—बाबा नन्ददुलाल, आतां अडीच वाजले, साडेतीनच्या गाडीनं आपल्याला जायचं. समानसुमान बांधायाला लाग. पृथ्वी उलटीच्या पालटी झाली तरी तुझ्या बापाचा निश्चय ढळायचा नाहीं तें माहीत आहे ना तुला?" असें म्हणून मुलाचा हात धरून छाती पुढें काढून तो जायला निघाला.

मुलगीजांवयाला त्यानें फक्त एक तासाचा अवधि दिला होता.

पण कांहीं निष्पन्न झालें नाहीं. एकतास म्हणजे कांहीं फार अवधि नव्हे. तीन दिवस गेले. सारखी रागारागी, रुसवारुसवी, भांडाभांडी सुरू होती, तरीही गोकुळच्या तोंडून दुसरा शब्द निघाला नाहीं. सासऱ्याचा हा असा अपमान झाल्यामुळें त्याला राग आला होता, ओशाळवाणें वाटत होतें, पण आईनें सोडलेल्या करड्या हुकमाविरुद्ध कसें जावें हें न कळल्यामुळें, सर्व प्रकारचा अपमान आणि त्रास गिळून टाकून तो स्वस्थ राहिला.

## ११

आपल्या साऱ्या आकांक्षा, बोलीभाषणें, डावप्रतिडाव फुकट गेल्याचें दिसून आल्याचें ज्यावेळीं निमाई रायना दिसून आलें, त्या वेळीं ते भडकून उठले.

आपल्याला नोकरी सोडून यायला भाग पडल्यामुळें झालेल्या नुकसानीची भरपाई करून देण्याची त्यांनीं तंबी दिली. या मुदतींत त्यांनीं बानर्जी महाशयांना हाताशीं धरलें होतें. त्यांनीं येऊन गोकुळवर तोंड टाकलें, त्याला मूर्ख म्हटलें, आंधळा म्हटलें, आत्मघातकी म्हटलें आणि सूचकपणानें असें समजावून दिलें, कीं निमाई रायचा असा अपमान केला तर उलटून जाऊन आपण विनोदची बाजू घ्यायला तयार होईन.

गोकुळ काकुळतीला येऊन म्हणाला, " काय करूं मास्तरमहाशय, त्यांना घरीं ठेवून घ्यायला आई तयार नाहीं. दुकानांत त्यांना पाऊलसुद्धां टाकूं द्यायचं नाहीं असा चक्रवर्तीला हुकूम सोडलाय तिनं. "

मास्तरमहाशयानीं विचारलें, " हा धंदा उदीम, मालमिळकत तुझी कीं तुझ्या आईची ? शिवाय ही तुझी सावत्र आई तुझ्या शत्रुपक्षाकडची आहे, याची आठवण आहे का तुला ? "

गोकुळनें मानेनें होकार दिला त्यावेळीं बानर्जी महाशय खूष होऊन म्हणाले, " — तर मग असं वेड पांघरून बसूं नको भय्या. व्यवहाराचीं सारीं सूत्रं रायमहाशयांच्या हातीं देऊन मुकाट्यानं नुसती मजा तर पहा ! माझी गोष्ट सोडून दे—पण असला पक्का माणूस तुला त्रिभुवन धुंडाळून सुद्धां सांपडायचा नाहीं. "

गोकुळ म्हणाला, " तें मला माहीत आहे मास्तर महाशय—पण आईच्या संमतीशिवाय कोणतीही गोष्ट करायची नाहीं असं बाबानीं बजावलंय मला."

खवचटपणानें हसून बानर्जी महाशय म्हणाले, " बजावलंय म्हणे ! ही तुझी आई तुझं शत्रुत्व साधील हें कळलं होतं का तुझ्या बाबांना ? नुसतं बजावून भागत नाहीं ! बजावलेलं ऐकायचं म्हणून साऱ्या इस्टेटीवर पाणी का सोडायचं आहे ? सांग ना ? "

या प्रश्नांना गोकुळपाशीं उत्तर नव्हतें. तो मान खालीं घालून स्वस्थ राहिला होता. आड राहून राय महाशय हें सारें ऐकत होते, ते समोर आले. त्या दोघांही महारथी वीरांनीं जेव्हां गोकुळवर मारा सुरू केला त्यावेळीं तो बिचारा जर्जर झाला.

निरुत्तर होऊन तो मान खालीं घालून राहिलेला पाहून दोघेही खूष झाले आणि आतां तरी त्याला थोडी अक्कल आली म्हणून त्याची प्रशंसा करूं लागले.

बानर्जी महाशय घरीं जायला निघाले. सफल मनोरथ झालेल्या राय-महाशयानीं त्यांची पायधूळ घेऊन नमस्कार केला.

जातांना गोकुळच्या पाठीवर थाप मारून ते म्हणाले, " माझा आशीर्वाद आहे तुला गोकुळ. सारा भरिभार तूं आतां आमच्यावर टाकलायस. आता तुला भीति नाहीं. आम्ही तुझ्या रोमालासुद्धां धक्का लागूं देणार नाहीं. कसं रायमहाशय ? "

रायमहाशयाना गहिंवर आला. ते अत्यंत विनयपूर्वक उद्गारले, "आपल्या आशीर्वादाचं प्रत्यक्ष फळ आतां हे गांवचे चार लोकच पाहतील. आता आमच्या वैऱ्यांना मात्र मी एक घडीभर मुद्धां या घरीं राहूं देणार नाहीं, हें आपणाला सांगून ठेवतोंय बानर्जी महाशय—मग ती आमच्या बाबाजीची आई असो, कीं त्यांचा भाऊ असो ! त्या बेट्या चक्रवर्तीला लाथ मारून बाहेर काढीन तेव्हांच तोंडांत पाणी घेईन. कोण आहे रे तिकडे ? त्या बामणाला बोलावून आण पाहूं दुकानावरून."

इतक्यांतच सोळा आणे ताब्यांत आले अशा डौलानें त्यांनीं एक सतरा आणे मोलाचा हुंकार दिला.

गोकुळ बिचारा संकोचानें अर्धमेला झाला होता. तो काचरत काचरत म्हणाला, " नाहीं—नाहीं—त्यांना कशाला बोलावतां ? "

दोन्ही हात पुढें करून बानर्जी महाशय म्हणाले, " छे, छे, गोकुळ, आतां ही भीडमुर्वत पुरे झाली. यापुढं त्याला राहूं देणं शक्यच नाहीं—नाहींच नाहीं ! काय बेट्याची मिजास ! असला माणूस आम्हाला मुळींच नकोय—सांगून ठेवतोंय. "

पूर्वीप्रमाणेंच गोकुळनें विनयपूर्वक उत्तर दिलें, " पण तो आईला हवा आहे. ती ज्याला नेमील त्याला घालवून देणं कुणाच्याही हातीं नाहीं. तो अधिकार बाबानीं मला दिला नाहीं. "

पुन: गोकुळनें मान खालीं घातली. शांतपणानें पण तितक्याच दृढ-निश्चयानें दिलेलें हें त्याचें अनपेक्षित उत्तर ऐकून दोघेही आश्चर्यानें हतबुद्ध झाले.

थोडा वेळ विचार करून बानर्जी महाशय म्हणाले, " मग त्याला राहूं द्यायचा तर ? "

गोकुळ म्हणाला, “ जी—होय. चक्रवर्तीच्या बाबतींत मला हात घालत येत नाहीं. ”

बानर्जी महाशय घाबरून म्हणाले, “ तर मग रायमहाशयांची आतां काय वाट ? ”

गोकुळ म्हणाला, “ त्यांनीं आतां घरीं जावं. आई त्यांना इथं राहूं द्यायची नाहीं. नोकरी सोडल्यामुळं त्यांचं जें नुकसान झालं आहे त्याच्या भरपाईची रक्कम आईला विचारून पाठवून देईन. ” असें म्हणून कुणाच्याही उत्तराची वाट न पहातां तो तिथून निघून गेला.

एवढा मोठा अपमान झाल्यावर रायमहाशय आतां पळभरसुद्धां रहायचे नाहींत असें सर्वांना वाटलें होतें. पण आठ दहा दिवस गेले तरी या अपेक्षेची पूर्तता झाली नाहीं असें दिसून आलें. कदाचित् मुलगीजांवयावरील असाधारण लोभामुळें असली क्षुल्लक गोष्ट कानीं न घेतां, त्यांच्या हितसंबंधाचें निरीक्षण करड्या नजरेनें करण्यासाठीं ते राहिले असावेत.

पण या हितसंबंधाच्या रक्षणाच्या जबरदस्त जरबेखालीं गोकुळ जितका बेजार झाला होता तितकाच चिडीला आला होता. तिकडे भवानीलाही घरांत राहणें क्षणोक्षणीं असह्य होत चाललें होतें. उठतां बसतां खातां पीतां सून आणि तिच्या बापानें सोडलेले शब्दभेदी बाण तिच्या कानांत शिरून सारखे हृदयाचा भेद करीत होते.

अगदींच असह्य झालें त्यावेळीं सुनेला बोलावून ती म्हणाली, “ सूनबाई, मी या घरीं रहावं असं गोकुळला नाहीं का वाटत ? ”

इच्छा होती तरीही सूनबाईनें उत्तर दिलें नाहीं. मान खालीं घालून पायाच्या नखानें ती जमीन उकरूं लागली. कांहीं वेळ वाट पाहून भवानी म्हणाली, “ ठीक आहे—त्याला तसं वाटतं तर स्पष्टपणें मला कां नाहीं सांगत तो ! तुझ्या भावाकरवीं—तुझ्या बापाकरवीं कां असा माझा पाणउतारा करतोय ? ”

गोकुळला या बाबतींतला कांहींसुद्धां पत्ता नव्हता, इतकेंच नव्हे, पण या हलकट लोकांनीं तिचा हा जो छळ चालविला होता तो त्याला मुळींच कळला नव्हता याची कल्पना भवानीला नव्हती. पण सूनबाई म्हणजे आतां ती पूर्वींची सूनबाई राहिली नव्हती. तिनें फट्कन् उत्तर दिलें, “ कुणीं कुणाचा अपमान केला तें साऱ्या गांवाला कळलंय. चोरांच्या हातून आमची मिळकत

वांचवावी म्हणून ती आम्ही जर आमच्या बापाभावाच्या हातीं दिली, तर तुमच्या काळजाला एवढा बाण कां लागतो सासूबाई ? कुणातरी एकासाठीं कुणाचा तरी एकाचा सत्यानाश करणं बरं का ? ”

मन ताब्यांत ठेवून भवानी शांतपणें म्हणाली, “ मी कुणाचा सत्यानाश केला मुली ? ”

सून म्हणाली, “ ज्यांचा केला त्यांच्याच शिव्या घ्याव्या लागताहेत. इथं त्यांनीं तरी काय करावं अन् मी तरी काय करावं ? ढेकूळ मारलं कीं दगड खायला हवा—तिथं राग करून कसं चालेल सासूबाई ? ” असें म्हणून सूनबाई निघून गेली.

भवानी स्तंभित होऊन कांहीं वेळ तशीच उभी राहिली आणि नंतर हळुहळू आपल्या खोलींत जाऊन बिछान्यावर आडवी पडली. नवरा जिवंत असतां तिचा हाच गोकुळ आणि गोकुळच्या याच बायकोची गोष्ट आठवून कित्येक दिवसानंतर आज तिच्या डोळ्यांतून टिपें गळूं लागलीं. मूर्खपणानें स्वतः आपल्याच पायावर नव्हे, तर मुलाच्या पायावरही कुऱ्हाड मारायला आपण कारणीभूत झालों, या गोष्टीबद्दल वाटत असलेला पश्चात्ताप आज तिच्या मनातून दूर होईना. अशा प्रकारें सारी इस्टेट गोकुळच्या नांवें करून दिली नसती तर आज हा प्रसंग आला नसता. विनोद कसाही असला तरी आपल्या जन्मदात्रीचा असा अपमान करून त्यानें तिचा छळ केला नसता असें तिला वाटलें.

पण विनोद गुपचुप कांहीं पैसा कमावीत होता हें कुणाला माहीत नव्हतें. कोर्टांत त्यानें कसलीशी नोकरी पत्करली होती. शहराच्या एका भागांत त्यानें एक छोटेसें घर भाड्यानें घेतलें आणि दुसऱ्या दिवशीं सकाळपासून आपण तिकडे जाऊन रहाणार असें सांगून टाकलें.

भवानी त्याला आग्रह करून म्हणाली, “ मला देखील घेऊन चल बाबा विनोद ! जसं तुझं तसं माझं. त्याची काळजी नको. पण या घरांतून माझी एकदां सोडवणूक कर.” असें म्हणून ती रडूं लागली.

घडलेला सारा इतिहास तिनें विनोदला ऐकवला. विनोद बाहेर जात होता त्यावेळीं दुकानचें काम उरकून घरीं येत असलेला गोकुळ त्याला भेटला. असा तो आला तर त्याला चुकवून आजवर विनोद जात असे पण आज तो उभा राहिला आणि गोकुळ जवळ येतांच म्हणाला, “ उद्यां सकाळीं मी आईला घेऊन माझ्या नव्या घरीं जाणार.”

चकित होऊन गोकुळ म्हणाला, " नव्या घरीं ? मला विचारल्याशिवायच का नवं घर घेतलंस ?

विनोद म्हणाला, " हो. "

" एम्. ए.चा अभ्यास सोडणार वाटतं ? "

विनोद म्हणाला, " हो. "

तें उत्तर गोकुळच्या मनाला किती झोंबलें तें संध्याकाळच्या काळोखांत त्याचा चेहरा स्पष्ट न दिसल्यामुळें विनोदला कळून आलें नाहीं. अगदीं लहानपणापासून आपला भाऊ एम्. ए. होण्याचें स्वप्न तो पहात आला होता. परिचित माणसांपैकीं कुणी कुठलीही परीक्षा पास झाल्याची बातमी आली तर गोकुळ मुद्दाम होऊन त्याच्याकडे जाऊन त्याचें अभिनंदन करी आणि शेवटीं अत्यंत कठीण अशी एम्. ए. ची परिक्षा देऊन टाकण्यास सांगे. ऐकणारे जाणक लोक तोंड फिरवून हंसत. त्यांना कांहीं कल्पना नसे. ते प्रश्न करीत त्यावेळीं, तो ऑनर ग्रॅज्युएट झालेल्या आपल्या धाकट्या भावाची— विनोदची गोष्ट काढायला सुरवात करी. बोलतां बोलतां अगदीं नकळत विनोदचें सोन्याचें मेड्लही बाहेर येत असे. मखमलीच्या पेटीसकट तो जिन्नस गोकुळच्या खिशांत येऊन कसा पडला हें त्याला आठवत नसे. सोनाराला बोलावून ही दुर्लभ वस्तु एक दिवस आपल्या घड्याळाच्या सांखळीला अडकवून टाकावी अशी त्याची फार इच्छा होती—तसें त्यानें केलेंही असतें— पण विनोदनें तंबी दिली, असें कांहीं केलें तर साऱ्याच जिनसा तळ्यांत फेंकून देईन म्हटलें, तेव्हांच तो स्वस्थ राहिला होता. एम्. ए. चें मेड्ल् कसें असेल आणि ती वस्तु घरीं आली कीं कुठें कशा रीतीनें ठेवून द्यावी, याची अपेक्षा करीत गोकुळ राहिला होता.

म्हणूनच एम्. ए. चा अभ्यास सोडून विनोद दुसरीकडे जाणार असें ऐकतांच त्याच्या काळजाला बाण बसला. आत्मसंयमन करणें आज त्याला अशक्य झालें होतें. तो म्हणाला, " बरं बरं ! पण आईला नव्या घरीं नेऊन काय खायला घालणार आहेस ? "

" तें पहातां येईल." असें म्हणून विनोद निघून गेला. तोसुद्धां आपल्या आईप्रमाणें मितभाषणी होता. सारी हकीकत आईकडून आतांच कळली हें त्यानें आपल्या दादाला सांगितलें नाहीं.

गोकुळनें घरांत पाऊल टाकलें न टाकलें तोंच हाबूच्या आईनें त्याला सांगितलें, कीं आई बोलवते आहे. गोकुळ सरळ आपल्या आईच्या खोलींत गेला आणि पहातो तों, ती खचल्यासारखी होऊन बिछान्यावर पडली होती. तो आलेला पहातांच ती उठून बसली आणि म्हणाली, " गोकुळ, उद्यां सकाळीं मी हें घर सोडणार. "

हीच हकिकत विनोदच्या तोंडून ऐकल्यामुळें तो मनांतल्या मनांत जळफळत होता म्हणूनच एकदम म्हणाला, " कुणी तुझ्या पायाला कांहीं दोरी बांधून ठेवली नाहीं आई ! वाटेल तिकडे गेलीस तरी मला त्याचं काय होय ? एकदां गेलीस कीं सुटलों—"

तोंड फिरवून गोकुळ निघून गेला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं भवानी जाण्याच्या तयारीला लागली होती. हाबूची आई तिला मदत करीत होती. गोकुळ जवळ येऊन उभा राहिला आणि ओरडून म्हणाला, "हाबूची आई ! आज यांचं जाणं होत नाहीं म्हणावं ! सांगून टाक. "

आश्चर्यचकित होऊन हाबूच्या आईनें विचारलें, " कां बडेबाबू ? "

गोकुळ म्हणाला, " आज दशमी ना ? मुलाबाळाचं घर हें, आज गेलं तर गृहस्थाच्या घरांत संकट कोसळेल. कांहीं झालं तरी आज मी जाऊं देणार नाहीं. सांगून दे तसं. वाटलं तर उद्यां जा म्हणावं.—मी घालवून दिलंय गाडीवाल्याला. "

गोकुळ घाईघाईनें जात होता त्याला अडवून एका बाजूला घेऊन हातवारे करीत मनोरमा म्हणाली, " जात होती ब्याद—त्यांना थांबवायला गेलांत कशाला ? "

अलिकडे कांहीं दिवस गोकुळ आणि त्याच्या बायकोचें चांगलें मेतकूट जमत आलें होतें पण आज एकदम भडकून उठून तो म्हणाला, " थांबवलं !—माझी खुषी ! घरची मालकीण ती—भलत्या दिवशीं भलत्या वेळीं अशी घरांतून निघून गेली तर तुझीं पोरंबाळं पटापट मरून जातील ना ? " असें म्हणून तितक्याच घाईघाईनें तो निघून गेला.

" आतां पहा हें ! " असा उद्गार काढून संतापलेली मनोरमा नुसती टकमक पहात राहिली.

# १२

दशमीनंतर एकादशी गेली, द्वादशीही गेली, आईला पाठवतां येईल असें तिथिनक्षत्र गोकुळला शोधून सांपडेना. त्रयोदशीच्या दिवशीं पुरोहित स्वतः घरीं आले आणि तो दिवस चांगला आहे असें म्हणाले, तेव्हां गोकुळ कांहीं कारण नसतां गरम झाला आणि म्हणाला, " ज्याचं खातां त्याचा सर्वनाश का करणार तुम्ही ? जा. आपल्या कामाला जा. मी केव्हांच पाठवणार नाहीं कुठं माझ्या आईला ! "

त्या दिवशीं धमकावणी मिळाल्यापासून मनोरमा स्वतः कांहीं बोलत नव्हती, आज तिनें आपल्या बापाला पाठवून दिलें. निमाई येऊन म्हणाले, " ही कांहीं बरी गोष्ट झाली नाहीं बाबाजी. "

गोकुळ कधीं वर्तमानपत्र वाचीत नसे—पण आज वाचीत बसला होता. तो म्हणाला, " कोणती ? "

" विहिणबाई आपखुषीनं आपल्या मुलाच्या घरीं जायला निघाली होती—तिला आम्ही अडथळा केला हें कांहीं योग्य झालं नाहीं. "

वाचीत वाचीत गोकुळ म्हणाला, " गांवच्या लोकांनीं ऐकलं तर ते आमची बदनामी करतील. "

अत्यंत आश्चर्यचकित होऊन निमाई म्हणाले, " बदनामी करण्याजोगं त्यांत मला कांहीं दिसत नाहीं ! "

इतके दिवस गोकुळ सासऱ्याचा मान राखून बोलत असे. आज एकदम भडकून म्हणाला, " ही उठाठेव आपल्याला नको. माझ्या आईला मी दुसऱ्या कुणाकडे पाठवणार नाहीं. बस्स ! साफ सांगतों—कुणाला माझं काय करायचं असेल तें करा म्हणावं . "

गोकुळचें हें 'साफ सांगणें' विनोदच्या कानीं पोंचायला अवधि लागला नाहीं. रोज गाडी बोलवावी आणि परत पाठवावी, असें चाललेलें असल्यामुळें तो मनांतल्या मनांत चिडला होता. आज रागानें खवळून तो म्हणाला, " दादा, मी आईला आज घेऊन जाणार. तुम्ही निष्कारण अडथळा करूं नका. "

वर्तमानपत्रांत अधिकच डोकें खुपसून गोकुळ म्हणाला, " आज तरी तें होणंच शक्य नाहीं. "

विनोद म्हणाला, " कां शक्य नाहीं ? मी आतां घेऊन जाणार ! "

त्याचा रागाचा आवाज ऐकून हातचें वर्तमानपत्र फेंकून देऊन गोकुळ म्हणाला, " घेऊन जातों म्हटलं म्हणजे काय जातां येतं ? बाबांनीं मरतांना तिला माझ्या स्वाधीन केली आहे—तुझ्या नव्हे ! मी तिला कुठं जाऊं देणार नाहीं."

विनोद म्हणाला, " तो भार आपण खरोखरच घेतला असता दादा, तर अशा रीतीनं आईला रात्रंदिवस अपमान सहन करावा लागला नसता.—आई, चल नीघ. गाडी उभी आहे—" असें म्हणून विनोदनें मागें वळून पाहिलें तेव्हां भवानी बाहेर आली.

ती येऊन आड उभी राहिली होती हें गोकुळला माहीत नव्हतें. ती सरळ जाऊन गाडींत बसली असें पाहून गोकुळ कांहीं वेळ स्तब्ध होऊन राहिला होता. शेवटीं गाडीच्या मागोमाग जाऊन गाडी गांठून तो म्हणाला, " नको म्हणत असतांना अशी गेलीस तर तुझा माझा संबंध रहायचा नाहीं—सांगून ठेवतोंय आई. "

भवानीनें उत्तर दिलें नाहीं. गाडीवाल्याला हाक मारून विनोदनें गाडी हांकायला सांगितलें. गाडी चालू झाली तेव्हां गोकुळ गहिंवरून म्हणाला, " मला टाकून चाललीस आई ! मी काय तुझा मुलगा नव्हें ? तूंच नाहीं का मला माणसांत आणलंस ? "

गाडीच्या चाकांच्या आवाजामुळें ते उद्गार भवानीच्या कानीं गेले नाहींत पण ते विनोदच्या कानीं गेले. त्यानें बाहेर डोकावून पाहिलें—धोतराचा बोळा तोंडांत घालून गोकुळ झपाझप निघून गेला आणि आंत विनोदच्या खोलींत जाऊन दार ओढून घेऊन बिछान्यावर आडवा पडला. हा प्रकार आड राहून पहात असलेले निमाई राय मात्र उद्विग्न झाले होते—पण थोड्या वेळानें दार उघडून जेव्हां तो बाहेर आला, नित्याप्रमाणें स्नान भोजन उरकून दुकानावर गेला, त्यावेळीं जेव्हां त्याच्या मुद्रेवर किंवा आचरणांत काळजी करण्याजोगें कोणतेंच चिन्ह दिसलें नाहीं, तेव्हां त्यांचा जीव खालीं पडला—तेव्हांच विघ्नें टळलीं असें वाटून ते आपल्या कामाला लागले.—अर्थात् तोंडांत पकडलेल्या बेडकाला साप जसा हळुहळू घशाखालीं घालतो त्याचप्रमाणें आपल्या जांवयाला कशा रीतीनें काबूंत आणावें या उद्योगाला ते लागले.

एकंदरींत लक्षण ठीक आहे, असें त्यांना वाटलें. बापाच्या मृत्यूनंतर गोकुळ

पिसाळल्यासारखा झाला होता. क्षुल्लक कारणानें तो चिडत असे. भवानी ज्या दिवशीं निघून गेली त्या दिवसापासून तो जसा कांहीं वेगळाच माणूस होऊन गेला होता. कुणी कांहींही बोललें तरी तो रागाला येत नसे कीं प्रतिवादही करीत नसे. तें पाहून निमाईराय खूष झाले खरे, पण .त्यांची' मुलगी मात्र तितकीशी खूष झाली नाहीं. गोकुळला ती ओळखीत होती. खाण्यापीण्याच्या बाबतींत तो जेव्हां तक्रार करीत नसे, मिळेल त्यावर संतुष्ट होऊन जेवून जात असे, तेव्हां तिला भीति वाटे. लहानपणापासून तो मोठा जिभाळ होता. त्याला स्वतःला चांगल्या वस्तूंची जशी आवड होती तसेंच दुसऱ्यालाही चांगलें चांगलें खायला घालायला आवडत असे. दर रविवारीं कुणाला ना कुणाला तरी तो जेवायला बोलावी. या रविवारीं त्यानें कुणालाच बोलावलें नाहीं म्हणून मनोरमेनें त्याचें कारण विचारलें.

उदासपणानें गोकुळनें उत्तर दिलें, " तें सारं गेलं आईबरोबर! रांधून वाढणार कोण ? "

अभिमानपूर्वक मनोरमा म्हणाली, " रांधायला काय नुसतं तुमच्या आईलाच येत होतं ? आम्ही नाहीं शिकलों ? "

गोकुळ म्हणाला, " तो तुझा सैंपाक तुझ्या बापाभावाला घाल खायला. मला नको तो. "

मनोरमेची आई कालीघाटावरून परत जात असतांना एक दिंवस येऊन हजर झाली. सावत्रसासू रागावून निघून गेली त्यामुळें विस्कळित झालेला मुलीचा संसार आवरून सुरक्षित करण्यासाठीं चार दोन दिवस रहाण्याच्या उद्देशानें ती आली होती.

पहातां पहातां संसाराचें मोडलेलें गाडें दुरुस्त होऊन सुंदर रीतीनें चालूं लागलें. मजबूत हातानीं कासरे पकडून तो गाडा हांकीत तिचे दिवसांवर दिवस जाऊं लागले.

पहिल्या पहिल्यानें गांवच्या लोकांनीं नावें ठेवायला सुरवात केली पण कलिकालाच्या रहाटीप्रमाणें थोडयाच दिवसांत सारे विसरून गेले.

हाबूच्या आईचेंघर त्याच रस्त्यावर होतें. ती मधून मधून भवानीला भेटत असे. तिच्या तोंडून या नव्या थाटलेल्या संसाराची हकिकत गोकुळला कळली पण त्याबद्दल तो बरेंवाईट असें कांहींच बोलला नाहीं.

त्या दिवशीं निघायच्या वेळीं गोकुळ बोलला होता, कीं इथेंच आपला संबंध तुटला. अभिमानाच्या भरांत त्यानें ते उद्गार त्यावेळीं हिशेबीं घेतले नव्हते. एक महिना होऊन गेला तरीही गोकुळनें जेव्हां त्यांची चौकशी केली नाहीं तेव्हां त्याला तो प्रकार जाणवला. खरोखरच तो आपलें नांव टाकील, धाकट्या भावाला असा विसरून जाईल, असें एवढी रागारागी झाली असतांनासुद्धां त्याला वाटलें नव्हतें. म्हणूनच हाबूच्या आईच्या तोंडून त्याच्या सासूसासऱ्यांनीं पक्कें ठाण मांडल्याचें जेव्हां त्यानें ऐकलें तेव्हां तो एकदम स्तब्ध झाला.

नवीन बिऱ्हाड थाटल्यापासून पहिले कांहीं दिवस विनोद व्यवस्थित राहिला होता. हळुहळू त्याचें स्वरूप उघडकीला येऊं लागलें. तो आईची खिजगणति बाळगीत नाहींसा झाला. रात्रीं तो घरीं रहात नसे. सकाळीं ज्या वेळीं परत येई त्यावेळीं भवानीला इतकें दुःख होई, कीं त्याच्या तोंडाकडे सुद्धां पाहूं नयेसें तिला वाटे.

त्याला नोकरी लागली आहे एवढेंच तिनें ऐकलें होतें. पण ती नोकरी कसली, पगार किती, तें कांहीं सुद्धां तिला माहीत नव्हतें. हा प्रकार जाणवला तेव्हां तिला वाटलें, कीं मुलाला ना-वारस करण्यांत आपण जी निमित्तमात्र झालें त्यात आपली कांहींच चूक झाली नाहीं. तिला समाधान वाटलें तें एवढेंच. सासूसासऱ्याच्या नादीं लागून गोकुळनें आपल्याशीं कितीही प्रतारणा केली तरी ज्या दुकानांत आपल्या नवऱ्याचा जीव गुंतून राहिला होता तें दुकान तो शाबूत ठेवतो आहे, असें पाहून आपल्या स्वर्गस्थ नवऱ्याची आठवण येऊन या क्लेशमय परिस्थितींतही तिला समाधान वाटत होतें.

अशा प्रकारें दिवसांवर दिवस जात होते. आज वैशाखी संक्रांति—दर वर्षी या दिवशीं मोठ्या थाटानें ब्राह्मणभोजन घालण्यांत येत असे. स्वतःच्या हातीं पैसे नसल्यामुळें आणि एकदोनदां सहज बोलतांना विनोदला विचारल्या-वेळीं त्याच्याकडून कांहींच उत्तर न मिळाल्यामुळें या वर्षी भवानीनें तो बेत रहित करण्याचें ठरवलें होतें.

भल्या पहांटे कुणी तरी मोठ्यानें हांका मारतो आहे असें ऐकून हाबूच्या आईनें सदर दरवाजा उघडला तेव्हां गोकुळ घाईघाईनें आंत आला. त्याच्या-बरोबर बरेच लोक होते. तूप, कणीक, नानाप्रकारची मेवामिठाई, एक टोपलीभर पिकलेले आंबे त्यानें बरोबर आणले होते.

आंत येतांच तो म्हणाला, "आमच्या आळींतल्या साऱ्या ब्राह्मणांना आमंत्रण देऊन आलोंय. त्या माकडांचं पित्त खवळेल म्हणून काहीं वर्षाचं कार्य टाकतां येत नाहीं! आई कुठं आहे? अजून उठली नाहीं वाटतं? मी जातों आतां—कामासाठीं माणसं पाठवून दिलीं पाहिजेत इकडे. जशी आई तसाच मुलगा! कुणालाच चाड नाहीं. मीच केली पाहिजे सारी डोकेफोड! आईला म्हणावं हाबूची आई, घटकाभऱ्यांत मी येतों!" असें म्हणून गोकुळ जितक्या घाईनें आला होता तितक्याच घाईनें निघून गेला.

भवानी यापूर्वीच जागी झाली होती. आड उभी राहून ती सारें कांहीं पहात होती. गोकुळ निघून जाताक्षणींच एकदम तिच्या डोळयांतून आसवांची बरसात सुरू झाली.

तो रविवारचा दिवस होता. 'शनिवारची रात्र' करून बऱ्याच उशीरानें विनोद घरीं आला, तो सारा प्रकार पाहून थक्क झाला. हाबूच्या आईच्या तोंडून सारी हकीकत कळली तेव्हां आईला उद्देशून तो म्हणाला, "दादाला कळवून इतक्यातच ही सारी व्यवस्था करायच्या ऐवजीं मला कळवलं असतंस तर बरं झालं असतं. हा अपमान झालाय माझा!"

सारें कांहीं कळलें असतांही भवानीनें या बाबतींत मुळींच तोंड घातलें नाहीं. ती उगीच राहिली होती. गोकुळ परत आला तेव्हां त्यानें विनोदला पाहिलें न पाहिल्यासारखें केलें. साऱ्या कामाची व्यवस्था करीत तो घरभर वावरूं लागला. योग्य वेळीं ब्राह्मणभोजन होऊन गेलें. कुणाकडे कांहींसुद्धां न बोलतां ज्या वेळीं तो जायला निघाला, त्यावेळीं बानर्जी महाशयांनीं जमलेल्या मंडळीच्या मेळाव्यांत त्याला बोलावून घेतलें आणि म्हटलें, "बैस!"

गोकुळच्या निमंत्रणावरूनच आज ते आले होते. त्याचेच पैसे कनवटीला लावून, त्याच्याच मिष्टान्नावर भरपूर ताव मारल्यावर त्या दिवसाच्या अपमानाचा सूड घ्यायला ते प्रवृत्त झाले. आजवर मुझुमदाराघरचें अन्न त्यानीं कितीतरी हजम केलें होतें. म्हणूनच निमाईरायच्या प्रकरणीं मिळालेला फटका त्यांना चांगलाच जाणवला होता. सर्वांसमक्ष विनोदला उद्देशून डोळे मिचकावून ते म्हणाले, "असं म्हणतों भय्या, दादाच्या आजच्या या डावाचा पत्ता लागला आहे का तुला!"

त्यांच्या भाषणाचें धोरण अंदाजून गोकुळला संकोच वाटला

विनोद थोडक्यांत म्हणाला, " नाहीं. "

मृदुगंभीर हास्य करून बानर्जी म्हणाले, " तर मग तो खास खटला जिंकणार ! एवढा बी. ए. एम्. ए. झालास भाई, पण आईला बगलेंत मारायचा हा डाव मात्र तुला कळला नाहीं. त्यावर आतां आणखी तो दावा ! "

गोकुळचा चेहरा काळठिक्कर पडला, " मुळींच नाहीं महाशय—मुळींच नाहीं !—" असें म्हणत म्हणत तो एकदम निघून गेला.

बानर्जी महाशय ओरडून म्हणाले, " इथं त्याला पाऊल टाकूं देऊं नकोस भय्या. तो तुझा सत्यानाश करील तेव्हां सोडील. "

हे उद्गार देखील गोकुळच्या कानीं पोंचले.

खालीं मान घालून विनोद शरमिंदा होऊन बसला होता. दादाला तो ओळखत नव्हता असें नाहीं. दाखवायचें एक आणि करायचें एक असें वर्तन त्याच्याकडून कधींच झालें नसतें हेंही त्याला माहीत होतें. त्यामुळें बानर्जींचें भाषण त्याला मुळींच पटलें नाहीं. इतकेंच नव्हे, तर इतक्या लोकांसमोर दादाचा झालेला हा अपमान त्याला फार जाणवला.

आमंत्रित मंडळींना निरोप दिल्यावर विनोद आंत आला त्यावेळीं त्याची आई आपल्या खोलींत जाऊन झोंपली होती असें त्याला दिसून आलें. झालेला प्रकार तिच्या कानीं गेलेला असावा याची विनोदला खात्री पटली.

दुकानचें काम उरकून संध्याकाळीं गोकुळ जेव्हां आपल्या घरीं आला, त्यावेळीं घरचीं माणसेंही भयंकर चेहरे बनवून बसायचा अभिनय करीत होतीं, असें त्याला दिसून आलें. स्वतः रायमहाशय एवढें लांब तोंड करून खाटेवर बसले होते. त्यांची मुलगी हेमूला जवळ घेऊन बापाचें अनुकरण करून खालीं जमिनीवरच बसली होती.

तो आंत येतांच राय महाशय म्हणाले, " बाबाजी, आज वेड्यासारखं वागून आपल्या आईकरवीं तुम्ही जो आमचा अपमान केला, त्याचा प्रतिकार आतां कसा व्हायचा ? "

आधींच गोकुळचें मन अत्यंत अस्वस्थ झालें होतें, त्यांतून साऱ्या दिवसाच्या परिश्रमामुळें तो अतिशय थकला होता, म्हणूनच ही तक्रार ऐकल्याबरोबर त्याच्या आंगाचा भडका उडला.

स्फुंदून स्फुंदून रडत मनोरमा म्हणाली, "यापुढं जर तुम्ही तिकडे जाल तर मी गळयाला फांस लावून घेईन!"

मुलीचा उत्साह पाहून रायमहाशयांना अवसान आलें. ते अधिकच गंभीर होऊन म्हणाले, "ती बथा काय सरळ—"

बॉम्बप्रमाणें भडकून गोकुळ म्हणाला, "चूप रहो म्हणतोंय! माझ्या आईला असं कांहीं कुणी म्हटलं तर त्याला गचांडी देऊन बाहेर काढीन!" असें म्हणून तो तीरासारखा बाहेर निघून गेला.

वज्राघात झाल्याप्रमाणें रायमहाशय आणि त्यांची मुलगी एकमेकांच्या तोंडाकडे पहात राहिलीं. काय केलें हें गोकुळनें! पूज्यपाद श्वशुरमहाशयांचा केवढा भयंकर अपमान केला हा!

## १३

विनोदच्या आजूबाजूला दोस्तांचा गोतावळा गोळा झाला होता. कोर्टात जाऊन दावा लावण्यासाठीं हे लोक सारखे त्याच्या मागें लागले होते. दावा हरला तर नुकसान नाहीं, जिंकला तर फायदा होईल, असें ते म्हणत. त्यांना वाटे, तसें झालें तर चैनचान करण्याच्या बाबतींत कांहीं दिवस तरी आपली चंगळ होईल.

कोर्टात जायचें आतां एक प्रकारें ठरल्यासारखें झालें होतें. विनोदच्या वतीनें या प्रकरणीं मिटवामिटव करण्याचा उपक्रम करण्यासाठीं जे गृहस्थ गोकुळकडे गेले होते त्यांना धुडकावून गोकुळ म्हणाला, "त्या पाजी हरामखोराला मी एक दमडीसुद्धां देणार नाहीं. काय करायचं तें कर म्हणावं."

एवढया मोठ्या मिळकतीच्या बाबतींत दावा रुजू करण्यासाठीं बऱ्याच मोठ्या रकमेची गरज होती. तेवढयाच साठीं विनोदकडून या कामीं विलंब होत होता.

दादावर विनोदचा केवढाही राग झालेला असला तरी त्या दिवसापासून त्याचा जीव त्याच्यासाठीं तळमळत होता. एवढया लोकांच्या समक्ष अपमान झाल्यावेळीं निघून जातांवेळची त्याच्या चेहऱ्यावरची केविलवाणी छाया त्याच्या नजरेसमोरून हालत नव्हती. त्याचें मन आंतून सारखें सांगत होतें,

' चुकतोयस—चुकतोयस—मोठी चूक करतोयस ! ' अतिशय खोडसाळ आणि ओंगळ आरोप करून त्या दिवशीं दादाला निरोप दिला होता—तो दादा आतां या जन्मीं या रस्त्यानें यापुढें फिरकायचासुद्धां नाहीं असें विनोदला नि:संशय वाटत होतें.

इकडचे बरेचसे सुशिक्षित तरुण विनोदचे दोस्त झाले होते. त्या सर्वांची सहानुभूति विनोदकडे होती. त्या दिवशीं सकाळीं ते विनोदच्या दिवाणखान्यात गोळा झाले होते. मास्तरमहाशयांनाही त्यांनीं बोलावून आणलें होतें. बराच वादविवाद झाल्यावर सर्वानुमतें ठरलें, कीं या प्रकरणीं गोकुळला गुंतवल्या-खेरीज आतां उपाय नाहीं. गोकुळ खुळा आहे—अगदीं भोळा आहे—हें सर्वांना माहीत होतें—म्हणूनच त्याला खिजवून बोलायला लावायचें आणि त्याच्याच भाषेत त्याला पकडण्यासाठीं साक्षीदार उभे करायचे, असें त्यांनीं ठरवलें होतें. तसें करणेंही कठीण नव्हतें.

येत्या रविवारीं सकाळीं गावांतल्या दहा पाच सन्मान्य गृहस्थांना बरोबर घेऊन गोकुळकडे जायचें आणि तिथेंच त्याला शब्दांत पकडायचें असें ठरलें होतें. या प्रसंगीं कसें बोलायचें, त्याला कसें खिजवायचें, कशा प्रकारें टिंगल उडवून बिचाऱ्या गोकुळच्या माथ्यावर कसे आरोप लादायचे,—कुणी काय बोलायचें, कुणी काय करायचें, याची प्रत्येकजण वेगवेगळ्या प्रकारें तालीम घेत होता. एकटा विनोद काय तो मुकाट्यानें बसून राहिला होता. स्वत:च्या उत्साहाच्या भरांत विनोदच्या उत्साहाचा अभाव कुणाच्याही ध्यानीं गेला नाहीं.

आज विनोद कामावर गेला नव्हता. जेवण उरकून आपल्या खोलींत स्वस्थपणें बसला होता. एक वाजायच्या सुमाराला, " कुठं आहे ग हाबूची आई ? जेवणं झालीं का ? " असें म्हणत गोकुळ आंत आला.

घाबऱ्या घाबऱ्या हाबूची आई बाहेर आली आणि बैठक आंथरून म्हणाली, " नाहीं बडेबाबू , अजून सर्वांचीं जेवणं झालीं नाहींत. "

" नाहीं अजून ! " असें म्हणून गोकुळनें बैठकीचें आसन स्वत: उचलून सैंपाकघराच्या दारांत पसरलें. बसल्यावर तो म्हणाला, " एक ग्लास थंड पाणी दे पाहूं हाबूची आई ! वसुलीला गेलों होतों, भर दुपारच्या उन्हाच्या तडाख्यानं हैराण झालोंय अगदीं. आई कुठं आहे ग ? "

भवानी सैंपाकघरांतच होती. त्या दिवशींची आठवण आल्यामुळें ती इतकी शरमिंदी झाली होती, कीं चट्कन् बाहेर येणें तिला कठीण गेलें. विनोद नोकरीवर गेला आहे, घरीं नाहीं, असा गोकुळचा समज होता. तो म्हणाला, " सारं खोटं हाबूची आई, सारं खोटं ! हें कलियुग बरं—धर्मकर्म कुठं राहिलंय ? मरायच्या वेळीं बाबानीं आईला माझ्या स्वाधीन करून म्हटलं, ' बाबा गोकुळ, ही घे तुझी आई ! ' मी आपला तसाच सरळ माणूस म्हणून—नाहीं तर अशा जबरदस्तीनं आईचा भार माझ्यावर टाकायची विंद्याच्या बापाचीसुद्धां छाती नव्हती म्हणावं ! कां ? मी काय मुलगा नव्हे ? मनांत आलं तर या क्षणाला हाताला धरून तिला घेऊन जातां यायचं नाहीं का मला ? बाबांचं अस्सल मृत्युपत्र तें हें—तें माहीत आहे का हाबूची आई ? उगीच चार ओळी खरडल्या कीं मृत्युपत्र होत नाहीं म्हणावं ! "

हाबूच्या आईनें डोळयानें खूण करून विनोद घरीं असल्याचें सांगितलें, त्यावेळीं पाण्याचें ग्लास खालीं ठेवून पुनः एक शब्दसुद्धां न बोलतां गोकुळ निघून गेला.

रात्रीं नऊ दहा वाजायच्या सुमाराला अकस्मात दुकानचे चक्रवर्ति भवानीच्या घरीं आले. त्यांनीं विचारलें, " आई, बडेबाबू अजून घरीं गेले नाहींत. इथनं जेवून केव्हां गेले ? "

आश्चर्यचकित होऊन भवानी म्हणाली, " इथं जेवला नाहीं तो. वसुलीला निघाल्यावेळीं नुसता एक ग्लास पाणी पिऊन गेला. "

चक्रवर्ति म्हणाला, " आतां पहा ! बडेबाबूचा आज वाढदिवस. घरीं भांडून बाहेर पडले. म्हणाले, ' आईचा प्रसाद घ्यायला जातों ! ' म्हणजे सारा दिवस जेवलेच नाहींत वाटतं ! "

ती हकीकत ऐकून भवानीच्या हृदयानें ठाव सोडला. शेजारच्या खोलींत विनोद होता. चक्रवर्तीचा आवाज ऐकून थट्टेच्या स्वरानें म्हणाला, " कसं काय चक्रवर्तिमहाशय, निमाई रायच्या अंमलाखालीं कसं काय चाललंय तुमचं ? "

आश्चर्यचकित होऊन चक्रवर्ति म्हणाला, " निमाई राय ? राम तूं !— दुकानांत पाऊल टाकायची शहामत आहे का त्याची ? "

विनोद म्हणाला, " दादाला तो गिळून बसलाय म्हणे ! "

भवानीला उद्देशून चक्रवर्ति हंसून म्हणाला, "या जोंवर हयात आहेत तोंवर तसं होणं शक्य आहे का छोटेबाबू ? मला घालवून देऊन सर्वांचा मालक व्हायला आला होता बेटा—पण आईच्या एका शब्दासरशीं सारं कांहीं ढासळलं. आतां इकडून तिकडून चार गप्पा मारून आडहातानं चार पैसे कनवटीला लावीत असेल तेवढेच—नाहींतर दुकानच्या गल्ल्यांत आतां हात घालायची ताकद नाहीं त्याची !"

त्या दिवशींची सारी हकीकत त्यांनीं विनोदला तपशीलवार सांगितली. ते म्हणाले, "बडेबाबू म्हणजे भारीच सरळ माणूस कीं नाहीं, कुणाचे मारपेंच त्यांना कळत नाहींत. तसं असलं तरी काय झालं—बापाच्या आणि आईच्या ठिकाणची त्यांची भक्ति मात्र निश्चल आहे. म्हणूनच ते म्हणाले, कीं आईनें दिलेला हुकूम रद्द करणं मला शक्य नाहीं. त्यामुळंच तिकडे एवढी भांडाभांड, एवढी रडारड सुरू आहे.—तरी त्यांचं एकच उत्तर—'नाहीं, तें होणं नाहीं —हा माझ्या बाबांचा हुकूम—हा आईचा हुकूम !' म्हणूनच बाबू, होतों त्याच अधिकारावर आहें मी—अन् पूर्वीसारखंच सारं कांहीं चाललंय."

विनोदच्या दोन्ही डोळ्यांतून सळसळून पाणी आलें. चक्रवर्ति सांगत होता, "—असला दादा कधीं कुणाला लाभला होता का छोटेबाबू ? सदा तोंडीं विनोद आणि विनोद ! 'माझ्या विनोदसारख्या परीक्षा कुणी दिल्या आहेत ? माझ्या विनोदसारखा विद्वान कोण आहे ? माझ्या विनोदसारखा भाऊ कुणाला लाभला आहे ?' ही त्यांची सदाची भाषा ! लोकांनीं तुमच्या नांवें काय काय म्हणून सांगितलं—तेव्हां माझ्याकडे येऊन ते हंसून म्हणाले, 'चक्कोत्ति मशाय, साले नुसते माझ्या भावाच्या मत्सरानं जळताहेत म्हणून बदनामी करताहेत त्याची !' त्यांच्या बोलण्यावर विश्वास ठेवीन इतका मी पागल आहें असं वाटतंय साल्यांना !"

थोडा वेळ थांबून तो म्हणाला, "—परवां कुणी काशीचा एक पंडित आला होता, तुमचं मन ताळ्यावर आणतों म्हणून सांगून एकशें आठ सोन्याच्या तुळशीपत्रांची किंमत म्हणून बडेबाबूंकडून पांचशें रुपये उकळून घेऊन गेला ! मी किती 'नको नको' म्हटलं पण ऐकलं नाहीं त्यांनीं. म्हणाले, 'माझा विनोद ताळ्यावर येईल, माझा विनोद एम्. ए. होईल, तर जाईनात का माझे पांचशें रुपये !' "

विनोदनें डोळे पुसले. गहिंवरल्या आवाजानें तो म्हणाला, " माझ्यासाठीं म्हणून किती लोक दादाला फसवून कितीतरी पैसे नेताहेत, असं मी मुद्धां ऐकलं होतं चक्रोत्ति मशाय. "

आवाज खालीं आणून चक्रवर्ति म्हणाला, " त्या जयलाल बानर्जीनं काय कमी पैसे मारलेयत छोटेबाबू ? तो बेटा तर मुलखाचा नलायक !—" असें म्हणून वैकुंठच्या मृत्यूनंतर विनोदचा पत्ता लावण्यासाठीं मास्तरमहाशयांनी केलेल्या उपद्व्यापांची हकीकत त्यानें सांगितली.

या बाबतींत भवानी एकही शब्द बोलली नाहीं. तिच्या डोळ्यांतून श्रावणाचा पाऊस कोसळत होता. निरोप घेऊन चक्रवर्ति निघून गेल्यावर विनोद जाऊन बिछान्यावर पडला. सारी रात्र त्याला झोंप लागली नाहीं. असा अस्वाभाविक प्रकार कां झाला, बापानें आपला वारसा असा कां नाकारला, आपल्याला आपला वांटा द्यायला दादा कां तयार नाहीं वगैरे सर्व हकीकत आज चक्रवर्तीच्या तोंडून कळल्यामुळें तेच विचार त्याच्या डोक्यांत सारखे थैमान घालीत होते.

विनोदचे कांहीं उपद्व्यापी दोस्त गांवांतल्या कांहीं सन्मान्य लोकांना बरोबर घेऊन एका रविवारीं सकाळीं गोकुळच्या बैठकखान्यांत हजर झाले. गोकुळ दुकानीं जायला निघाला होता. एवढे लोक एकाएकीं आलेले पाहून तो तटस्थ झाला. विशेषतः डेप्युटीबाबू आणि सदरवाले गिरीशबाबू आलेले पाहतांच त्यांना कुठें बसवावें, काय करावें, हेंच त्याला सुचेना. विनोद मात्र एवढेंसें तोंड करून मुकाट्यानें एका बाजूला जाऊन बसला. त्याच्या चेहऱ्याकडे पाहिलें म्हणजे त्याला कुणीतरी पकडून बळी द्यायला आणलें असावें, असा भास होत होता.

बानर्जीमहाशय आले होतेच. बोलायला सुरवात केली ती त्यांनींच.

पहातां पाहतां गोकुळचा चेहरा लालीलाल झाला. तो म्हणाला, " अस्सं ! तेव्हांच एवढे लोक आले हे ! जा—खुशाल फिर्याद करा. या दळभद्र्याला मी एक दमडीसुद्धां देणार नाहीं. हा दारू पीतो—"

सारेच बोलेनासे झाले. बानर्जीमहाशय टिंगल करण्याच्या ढंगानें हंसून

म्हणाले, " हो, दारू पितो !—पण दारू पितो म्हणून त्याचा हक्काचा वाटा कांहीं अडकावून ठेवतां येत नाहीं तुला ? बाप मरायला टेकला असतां—तो शुद्धीवर नसताना त्याच्याकडून बनावट मृत्युपत्र तूं लिहून घेतलं नाहींस, याला पुरावा काय ? "

गोकुळ एकदम भडकून उठला. मोठ्यानें किंचाळून तो म्हणाला, "बनावट केलं ? कोण साला म्हणतोय असं ? "

गिरीशबाबू वृद्ध माणूस—ते शांतपणें म्हणाले, " गोकुळबाबू , असे भडकूं नका. थंडपणानं उत्तर द्या. "

बानर्जीमहाशयांना पूर्वीपासून साऱ्या हकीकती माहीत होत्या. डोळे गरगर फिरवीत ते म्हणाले, " तर मग कोर्टांत उभं राहून तुझ्या आईला साक्ष द्यावी लागेल गोकुळ. "

त्यांच्या अंदाजाप्रमाणें गोळी बरोबर लागू पडली. गोकुळ बेफाम होऊन म्हणाला, " काय म्हटलंत ? माझ्या आईला कोर्टांत उभी करणार ? साक्षी-दाराच्या पिंजऱ्यांत ? घेऊन जा तुमची सारी दौलत—घेऊन जा ना !—कांहीं नको मला. मी कोर्टांत उभा राहाणार नाहीं. आईला घेऊन मी काशीयात्रेला जाईन. "

निमाई राय देखील तिथें हजर होते. डोळा घालून ते म्हणाले, " अरे ! अरे ! थांबा ना गोकुळ, काय—काय चाललंय हें ? काय बोलतांहांत ? "

गोकुळनें तें भाषण कानीं घेतलें नाहीं. सर्वांच्या समोर उजवा पाय वर उचलून विनोदला उद्देशून तो तसाच ओरडून म्हणाला, " ये रे दळभद्र्या, इकडे ये.—हा पाय पुढं केला आहे—मार याच्यावर हात अन् सांग, कीं तुझा दादा बदमाष आहे ! या घटकेला जर सारी इस्टेट तुला देऊन टाकली नाहीं तर वैकुंठ मुजुमदारांचा मुलगाच नव्हे. "

निमाई रायच्या तोंडचें पाणी पळालें. ते म्हणाले, " हं ! हं ! हें काय चाललंय बाबाजी ? करूं दे त्यांना फिर्याद. कोर्टांत जें व्हायचं असेल तें होईल ! या शपथा अन् दिव्यं कशाला ? चला, चला. घरांत चला—" असें म्हणून त्याचा हात धरून ते ओढूं लागले.

पण विनोदनें नजर वर करून पाहिलें नाहीं. एका शब्दानें उत्तर दिलें नाहीं. तो तशाचा तसा मुकाट बसून राहिला होता.

जोरानें हात सोडवून घेऊन गोकुळ म्हणाला, " नाहीं. एक पाऊलसुद्धां हलणार नाहीं ! "

वरःपाहून तो म्हणूं लागला, "—बाबा ऐकताहेत वर ! मरायच्या वेळेला ते म्हणाले होते, ' गोकुळ, ही सारी मिळकत आहे तुम्हां दोघां भावांची. त्याचा जो योग्य वांटा असेल तो देऊन टाक त्याला तो ताळ्यावर येईल तेव्हां. ' वरून बाबा पहाताहेत—ती मिळकत मी यक्षासारखी जपतो आहें—कधीं हा ताळ्यावर येतो अन् कधीं मी त्याला घरीं परत आणतों—रात्रंदिवस देवाला हांक घालीत मी वाट पहातोंय त्या दिवसाची ! अन् हा म्हणतोय मला बदमाष ! ये,—असा पुढं ये दळभद्र्या, माझ्या पायाला हात लावून या सर्वांच्या समोर सांग, कीं तुझा वडील भाऊ अपहार करून बसलाय या दौलतीचा म्हणून ! "

जमलेली इष्टमित्र मंडळी पुढें सरसावण्यासाठीं विनोदला चोहींकडून लोटूं लागली—पण तो उठेना.

बानर्जीमहाशयांनीं पुढें येऊन त्याचा हात धरून त्याला जोरानें ओढलें आणि म्हटलें, " बोल ना विनोद !— मार त्याच्या पायावर हात ! भितोस कशाला ? अशी संधि पुन्हां केव्हां येणार ? "

विनोद उठून उभा राहिला आणि म्हणाला, " नाहीं—खरोखरच अशी संधि पुन्हा यायची नाहीं—" असें म्हणून तो दोन पावलें पुढें आला आणि म्हणाला, "—तुमच्या पायाला हात लावून सांगतों दादा,—शपथ घेतों—मी दारुड्या असो कीं नसो, पण दादा, तुम्हांला मी ओळखतों. तुमच्या पायाला हात लावून जर तुम्हांला मी बदमाष म्हटलं दादा, तर इथल्या इथं हा माझा उजवा दात तुटून पडेल. मी तें म्हणत नाहीं—पण या पायाला हात लावून आज शपथ घेतों, कीं यापुढं मी दारूला हात लावणार नाहीं. मला आशीर्वाद द्या दादा, कीं यापुढं ' हा माझा धाकटा भाऊ ' असं अभिमानानं म्हणायला तुम्हांला संकोच वाटणार नाहीं. तुमचा मान राखून तुमच्या पायातळीं चिरकाल मी सुखानं राहीन, एवढाच मला आशीर्वाद द्या !—" असें म्हणून पुढें केलेल्या त्या आपल्या वडील भावाच्या पायावर विनोदनें आपलें मस्तक ठेवलें.

# एकादशी बैरागी

कालीदोह हा गांव मुख्यत्वेंकरून ब्राह्मणवस्तीचा होता. इथल्या गोपाळ मुखर्जींचा मुलगा अपूर्व हा लहानपणापासूनच एक नमुनेदार मुलगा म्हणून समजला जात असे. गेलीं पांच-सहा वर्षे कलकत्त्याच्या हॉस्टेलमधें राहून ऑनर्स घेऊन बी. ए. पास होऊन आतां जेव्हां तो घरीं परत आला, तेव्हां गांवांत चोहींकडे त्याची नाम्ना व्हायला सुमार राहिला नाहीं.

गांवांत एक मोडकेंतोडकें हायस्कूल होतें. त्याचे समवयस्क विद्यार्थी इतक्यांतच शिक्षण संपवून किंवा शाळा सोडून निघाले होते, ते संध्यापूजेचें आपलें ब्राह्मणाचें कर्तव्य सोडून केसांना छाट देऊन बसले होते. पण कलकत्त्याहून परतलेला हा ग्रॅज्युएट मुलगा केसाना छाट दिल्याशिवाय परत आला, इतकेंच नव्हे, तर डोक्यावर चांगली वितीहून मोठी शेंडी ठेवून आला, हें पहातांच नुसते गांवांतले मुलगेच काय, पण त्या मुलांचे बाप-आजे सुद्धां आश्चर्यानें थक्क होऊन गेले.

तो शहरांत होता त्यावेळीं प्रत्येक सभासमितींत भाग घेतल्यामुळें मोठमोठ्या ज्ञानी विभूतींचीं प्रवचनें ऐकून सनातन हिंदुधर्मांतील अनेक गूढ रहस्यांच्या मर्मांचा भेद करून आपल्या गांवीं आला होता.

गांवांत येतांच त्यानें आपले स्नेहीसोबती गोळा करून अट्टाहासानें प्रचारकार्य सुरू केलें होतें. हिंदुधर्मासारखा दुसरा सनातन धर्म नाहीं, त्यांतील प्रत्येक व्यवस्था विज्ञानसंमत आहे, शेंडीची वैद्युतिक उपयुक्तता, देहरक्षणासाठीं उपयुक्त असलेली संध्यापूजेंतील तंत्रांची उपकारिता, स्नान-आचमन-प्रभृति पद्धतींतील रासायनिक प्रतिक्रिया, वगैरे वगैरेबद्दलच्या आजवर न ऐकलेल्या तात्त्विक व्याख्या त्याच्या तोंडून ऐकून गांवांतल्या लहानापासून थोरापर्यंत सारेच थक्क होऊन गेले.

थोड्याच काळांत त्याचा परिणाम दिसूं लागला. पुष्कळांनीं शेंडी ठेवायला सुरवात केली. कित्येक संध्यापूजा करूं लागले. एकादशीचा उपास, व्रतें-वैकल्यें, गंगास्नान वगैरे करण्यांत त्यांनीं घरच्या बायकामंडळींनाही मागें टाकलें. हिंदुधर्माचा पुनरुद्धार, देशोद्धार वगैरे मोठमोठ्या शब्दांनीं ग्रामस्थ तरुणांनीं दशदिशा दणाणून टाकायला सुरवात केली.

वृद्धक लोक म्हणूं लागले, " गोपाळ मुखर्जींचं भाग्य मोठं. आई लक्ष्मीची जशी कृपादृष्टि, तसाच कुलदीपक मुलगाही पोटीं आला. नाहींतर या कलिकालात चारदोन इंग्रजी परीक्षा पास होतांच किती जणांची श्रद्धा धर्मावर रहाते आहे ? "

अर्थात् त्या गांवच्या पंचक्रोशींत अपूर्व म्हणजे एक तितकीच अपूर्व व्यक्ति ठरूं लागली. त्यानें स्थापन केलेल्या हिंदुधर्मप्रचारिणी, धूम्रपान-निवारिणी आणि दुर्नीतिदलिनी अशा तीन तीन सभांच्या सभासदांनीं गांवच्या शेतकरीशूद्रांपर्यंत सर्वत्रांना हवालदिल करून सोडायला सुरवात केली.

पांचकडी तेवर ताडी पिऊन आपल्या बायकोला मारतो, असें कळतांच ते आपले सैनिक घेऊन तिथें हजर झाले आणि पांचकडीला त्यांनीं असें बडवून काढलें, कीं दुसऱ्याच दिवशीं पांचकडीची बायको आपल्या नवऱ्याला घेऊन आपल्या माहेरीं पळून गेली !

भगा कावरा भल्या रात्रीं नदीच्या कपारींत मासे मारून परत येत असतांना गांजाच्या तारेंत विद्यासुंदरमालिनीच्या लावण्या म्हणत असे. ब्राह्मणवाड्यांतल्या अविनाशच्या कानीं ती गोष्ट गेली तेव्हां त्यानें नाक फुटून रक्त बाहेर येईपर्यंत भगाला बडवलें तेव्हांच सोडलें !

दुर्गा डोमाचा चौदापंधरा वर्षांचा मुलगा विडी ओढीत शेतावरून जात होता. अपूर्वच्या एका सैनिकानें तें पाहिलें. त्याच्या हातातली विडी काढून घेऊन त्या जळत्या विडीनें पाठीला फोड येईपर्यंत चुरका दिला तेव्हां त्यानें त्याला सोडलें !

**अशा प्रकारें अपूर्वची हिंदुधर्मप्रचारिणी आणि दुर्नीतिदलिनी सभा गारुड्याच्या आंब्याच्या झाडाप्रमाणें देखतां देखतां फुलांफळांनीं वाढत जाऊन कालीदोह गांवाला व्यापून बसली.**

यानंतर गांवाच्या मानसिक उन्नतीकडे नजर टाकायचा प्रयत्न करतांना अपूर्वला असें दिसून आलें, कीं शाळेंतल्या लायब्ररींत शशिभूषणच्या चित्रांतील दीड चित्र आणि बंकीमबाबूच्या अडीच कादंबऱ्यांपलीकडे कसल्याच पुस्तकांचा तिथें संग्रह नव्हता. या लायब्ररीच्या दैन्याच्या पायीं हेडमास्तरला शक्य तितकी तंबी देऊन झाल्यावर शेवटीं लायब्ररीची तन्दुरुस्ती करण्यासाठीं त्यानें स्वतःच कंबर बांधली. सभासदत्वाची वर्गणी वसूल करायच्या चोपड्या तयार झाल्या, घटना तयार झाली, घटनेचे नियम तयार झाले आणि विकत घ्यायच्या पुस्तकांची यादीही तयार करण्यांत आली.

या तरुणांचा धर्मप्रचाराबद्दलचा उत्साह गांवच्या लोकांनीं आजवर कसाबसा सहन केला होता. पण एकदोन दिवसांतच वर्गणी वसूल करायचा दौरा सुरू होतांच, ब्राह्मणांपासून शूद्रांपर्यंत, भिकाऱ्यांपासून गृहस्थांपर्यंत, सारेच लोक इतके घाबरून गेले, कीं चोपड्या बगलेला लावून येणारा तरुण समोर दिसला रे दिसला, कीं प्रत्येक जण घराचें दार बंद करून घेऊं लागला.

धर्मप्रचार आणि दुर्नीतिदलन करायचा मार्ग जेवढा लंबाचवडा होता त्या मानानें लायब्ररीसाठीं पैसे गोळा करण्याचा मार्ग त्याच्या शतांशांतल्या एकांशाइतकाही प्रशस्त नव्हता, असें त्यांना दिसून आलें. आतां कुणाला गांठावें याचा विचार अपूर्व करीत होता तोंच अचानक एक महत्त्वाची गोष्ट त्याच्या नजरेला आली.

शाळेपासून थोड्या अंतरावर एक पडित घर होतें त्याचा चौथरा एके दिवशीं अपूर्वच्या नजरेला आला. चौकशी करतां कळलें, कीं तें घर एकादशी बैराग्याचें होतें. तपास करतांना असें कळून आलें, कीं कसला तरी सामाजिक अपराध केल्यामुळें गांवच्या ब्राह्मणांनीं त्याचे न्हावी, धोबी, वाणी आणि गुडगुडीपाणी बंद केल्यामुळें दहा वर्षांपूर्वी तो गांव सोडून गेला होता. दोन कोसांपलीकडे असलेल्या बारुईपूर गांवीं आतां त्यानें वस्ती केली होती.

माणूस पैशाला मोठा चिकट होता. चांगले पैसे राखूनही होता. त्याचें मूळचें नांव आतां सारेच विसरून गेले होते. त्याचें नांवसुद्धां काढायचें नाहीं अशी पूर्वी केव्हां एकदां व्यवस्था झालेली असल्यामुळें, तें न वापरलेलें नांव आतां धुऊन पुसून पार नाहींसें झालेलें होतें. तेव्हांपासून ‘ एकादशी ’ याच नांवानें हे बैरागीमहाशय सुप्रसिद्ध झाले होते.

टाळी देऊन अपूर्व म्हणाला, " पैसेवाला का ? पैशाची मगरमिठी का ? वाळींत टाकला होता म्हणतां ? तर मग या बेट्याला लायब्ररीसाठीं जरूर असलेली अर्धी तरी रक्कम द्यायला भाग पाडलंच पाहिजे. नाहींतर तिथं सुद्धां न्हावीधोबी गुडगुडीपाणी बंद करायला लावायचं. बारुईपूरचा जमीदार तर माझ्या अक्काचा मामेसासरा ! "

सारे तरुण उसळून उठले. डोनेशनच्या यादींत बैराग्याच्या नांवावर भला मोठा आंकडा टाकून सुद्धां बसले.

एकादशी बैराग्याकडून पैसे वसूल करण्यांत येणार, नाहींतर अपूर्व आपल्या अक्काच्या मामेसासऱ्याकडून बारुईपूर गावांत त्याच्यावर बहिष्कार टाकवणार, ही बातमी कळतांच स्मृतिरत्न रसिकमहाशय लायब्ररीच्या कल्याणार्थ तरुणांना उपदेश देण्यासाठीं स्वयंस्फूर्तीनें पुढें सरसावले. चांगली भली मोठी रक्कम दिली नाहीं तर या बेट्याच्या कालीदोहमधल्या घराचा एक दगडसुद्धां राहूं द्यायचा नाहीं, अशी त्याला तंबी द्यायला त्यांनीं सांगितलें. एकादशी जरी त्या घरांत रहात नव्हता, तरी या वडिलोपार्जित वास्तुवर त्याचा अगदीं जीव होता, हें स्मृतिरत्न महाशयाना माहीत होतें.

त्याला एक कारण झालें होतें. एक वर्षापूर्वी ही जमीन खरेदी करून स्वतःच्या बागेला सामिल करून घेण्याच्या उद्देशानें त्यांनीं खूप प्रयत्न करून पाहिला होता, पण तो सफल झाला नव्हता ! एकादशीकडे त्यांनीं ही गोष्ट काढली, त्यावेळीं अगदीं साळसूद माणसाप्रमाणें कानांत बोटें घालून तो म्हणाला होता, "एवढी गोष्ट मात्र काढूं नका भटजीमहाराज ! या टीचभर जमिनीसाठीं ब्राह्मणाकडून पैसे घेणं मला मुळींसुद्धां पटायचं नाहीं. ब्राम्हणाच्या सेवेला ही जमीन लागली तर माझ्या सात पिढ्यांचं भाग्य फळाला आलं असं मी समजेन ! "

त्याचे ते उद्गार ऐकून स्मृतिरत्न महाशयांच्या अंगावर रोमांच उभे राहिले. देवाब्राम्हणांवरची त्याची ही असाधारण भक्ति-श्रद्धा पाहून तोंड फाटेपर्यंत त्यांनीं त्याची स्तुति केली. त्यावेळीं एकादशी हात जोडून नम्रपणानें म्हणाला, "—पण काय माझं दुर्भाग्य आहे पहा भटजीमहाराज, सात पिढ्यांची ही वास्तु मला हातसांड करतां येत नाहीं. मरायच्या वेळेस बाबांनीं आपल्या गळ्याची शपथ घालून मला सांगितलं, कीं खायला अन्न नाहीं मिळालं

तरी बेहेत्तर पण ही वडिलांची वास्तु कधीं हातची जाऊं देऊं नकोस—"
वगैरे, वगैरे !

त्याची ही लफंगेगिरी स्मृतिरत्न महाशय विसरले नव्हते. चार पांच दिवसा नंतर एके दिवशीं सकाळीं ही तरुणांची सेना दोन कोस रस्ता तुडवीत एकादशी बैराग्याच्या दारीं येऊन दाखल झाली. त्याचें घर अर्थात्‌च चिखल-मातीचें होतें, पण सारवून रंगवून त्याला सौंदर्य आणलेलें होतें. घर पहातांच वाटे, कीं इथें कुठें तरी लक्ष्मीची वस्ती आहे.

एकादशी बैराग्याला यापूर्वी अपूर्व किंवा त्याच्या सेनेंतील कुणीही पाहिलें नव्हतें. अर्थात् अंगणांत पाऊल टाकतांच त्यांना एक प्रकारची शिसारी आली. हा माणूस पैशाचा मगर असो कीं सुसर असो, लायब्ररीच्या बाबतींत बोटभर माशाइतका देखील याचा उपयोग व्हायचा नाहीं, असें त्यांना निःसंशय वाटलें.

एकादशीचा पेशा तागाच्या व्यापाराचा होता. त्याचें वय साठीपलिकडे गेलें असावें. देह जितका जीर्ण, तितकाच शुष्क होता. गळाभर तुळशीच्या माळा होत्या. तो दाढीमिशी काढीत असे. चेहऱ्याकडे पाहिलें तर असें वाटे, कीं या माणसाच्या ठायीं एक थेंबभरसुद्धां ओलावा नसेल. स्वतःच्या देहांतून निघालेला रस उकळायला चरकांत घातलेला ऊसच शेवटीं जसा सर्पण म्हणून उपयोगी पडतो, तसाच हा माणूस माणुसकीचा रस पिळून काढल्यावर माणसाच्या जातीला भाजून काढण्यासाठीं 'महाजन' होऊन बसला आहे, असा भास होई !

त्याच्या चेहऱ्याकडे पहातांच अपूर्व मनांतल्या मनांत एकदम खचला. ओटीवर सर्वत्र गादी अंथरली होती. तिथें मध्यभागीं एकादशी बैराग्याची स्वारी विराजमान झाली होती. त्याच्यासमोर एक लाकडी पेटी होती आणि एका बाजूला हिशेबाच्या खातेवह्या रचून ठेवलेल्या होत्या. मागें, पुढें, ओटीवर, ओटीखालीं, अंगणांत, निरनिराळ्या वयाचीं, निरनिराळ्या घरांतलीं माणसें—पुरुष-बायका—उतरल्या चेहऱ्यानें बसून राहिलीं होतीं. कुणी कर्ज मागायला आले होते, तर कुणी व्याज द्यायला आले होते, तर कुणी नुसतेच मुदतीची याचना करायला आले होते. त्यांच्या चेहऱ्याकडे पाहिलें, कीं त्यांच्यापैकीं एकसुद्धां माणूस कर्जफेड करण्यासाठीं आला असावा असें वाटत नव्हतें.

एकाएकीं बरीचशीं अपरिचित गृहस्थ माणसांचीं मुलें दारीं आलेलीं पाहून एकादशी आश्चर्यचकित झाला. हातांतली स्लेटपाटी बाजूला ठेवून त्याचा गुमास्ता म्हणाला, " कुठून येणं झालं ? "

अपूर्व म्हणाला, " आम्ही कालीदोहचे. "

" महाशय, आपण ?—"

" आम्हीं सारे ब्राह्मण आहोंत. "

ब्राह्मण म्हणून ऐकतांच एकादशी घाईघाईनें उठून उभा राहिला आणि मोठ्या विनयानें खालीं वांकून प्रणाम करून म्हणाला, " बसायची कृपा व्हावी. "

आलेले सारे लोक बसले तेव्हां एकादशीही बसला. गुमास्त्यानें विचारलें, " काय उद्देशानं येणं झालं ? "

लायब्ररीच्या आवश्यकतेबद्दल प्रास्तविक भाषण करून अपूर्वनें वर्गणीबद्दल गोष्ट काढायला सुरवात केली तेव्हां एकादशीचें तोंड दुसऱ्याच बाजूकडे वळलें. भिंतीच्या आड बसलेल्या एका बाईला उद्देशून तो म्हणाला, " तुला काय वेड लागलंय हारूची आई ? व्याजाचे पैसे झालेयत एकूण सात रुपये दोन आणे. त्यांतल्या दोन आण्यांवर पाणी सोडण्यापेक्षां माझ्या गळ्यावर पाय देऊन हातांनीं जीभ ओढून मारीत कां नाहींस मला ? "

त्यानंतर त्या दोघांमधें ओढाताण सुरू झाली. दोन आण्यांच्या पैशांवर जसें कांहीं त्यांचें जिणेंमरणें अवलंबून राहिलें होतें ! हारूची आई जितकी चिकट होती तितकाच एकादशीही आपला शब्द दातीं धरून बसला होता. तें तंटाभांडण सुरू होतें—तरीही उशीर होतो आहे असें पाहून अपूर्व मधेंच म्हणाला, " आमचं हें लायब्ररीबद्दलचं बोलणं—"

एकदा जरा मान वळवून एकादशी म्हणाला, " जी. जरा थांबा हं !— काय रे नफर, माझ्या डोक्यावर पाय देऊन बुडवणार आहेस का रे मला ? आधीं घेतलेले दोन रुपये अजून दिले नाहींस अन् आतां आणखी एक रुपया मागतोस ? लाज नाहीं वाटत ? बरं—व्याजबीज कांहीं आणलंयस ? "

बटवा सोडून नफरनें एक आण्याचे पैसे बाहेर काढतांच एकादशी डोळे वटारून म्हणाला, " तीन महिने झाले ना रे ! आणखी दोन पैसे कुठं आहेत ? "

नफर हात जोडून म्हणाला, " आणखी नाहींत धनी. हातींपायीं पडून एका दोस्ताकडून हे चार पैसे उसने आणले आहेत. आतां बाजारच्या दिवशीं बाकीचे दोन पैसे घेऊन येईन. "

पुढें डोकावून पाहून एकादशी म्हणाला, " तुझा तो खिसा झाडून दाखीव पाहूं. "

खिसा उलटून दाखवून नफर छाती फुलवून म्हणाला, " दोन पैशांसाठीं खोटं कशाला बोलूं धनी ? हातीं पैसा असून नाहीं म्हणेल त्या साल्याच्या तोंडांत पडो माती !—अगदीं सांगून ठेवतों ! "

त्याच्याकडे रोखून पाहून एकादशी म्हणाला. " चार पैसे तुला उसने मिळाले, तसेच आणखी दोन नसते का मिळाले ? "

नफर रागारागानें म्हणाला, " अगदीं शपथेवर सांगतों धनी, खोटं बोलेल त्याच्या तोंडांत माती—"

अपूर्वच्या आंगाचा भडका भडका झाला. समोर दिसत असलेला प्रकार असह्य होऊन तो म्हणाला, " मोठे चांगले माणूस दिसतां तुम्ही महाशय ! "

एकादशीनें एकदां नुसतें वळून त्याच्याकडे पाहिलें पण उत्तर दिलें नाहीं. अंगणापलीकडच्या रस्त्यावरून पराण चांभार जात होता. त्याला हातानें खूण करून बोलावून एकादशी म्हणाला, " पराण, या नफरच्या खिसाकडोसरीला एकदां चापसून पहा पाहूं — दोन पैसे आहेत कीं नाहींत पहा. "

पराण येतो आहे असें पाहातांच नफर रागारागानें उठला आणि कडोसरीचे दोन पैसे काढून त्यानें एकादशीच्या समोर फेंकले. त्याच्या या बेअदबीबद्दल एकादशीला एवढासुद्धां राग आला नाहीं. गंभीर मुद्रेनें पेटी उघडून त्यानें ते सहा पैसे आंत टाकले आणि गुमास्त्याला म्हटलें, " घोषाळमहाशय, नफरच्या नांवें व्याजाची रक्कम जमा करून घ्या.—काय रे, आणखी एक रुपया कशाला हवा तुला ? "

नफर म्हणाला, " जरूर असल्याशिवाय काय मागायला आलोंय ? "

एकादशी म्हणाला, " मग आठ आणे घेऊन जा तर. आख्खा रुपया घेऊन गेलास तर उगीच कुठं तरी घालवून बसशील. "

त्यानंतर दोघांची बरीच बाचाबाची आली. शेवटीं नफर बारा आण्यांचे पैसे कर्जाऊ घेऊन बसला.

दिवस वर येत चालला होता. वर्गणीची यादी एकादशीच्या पुढें करून अपूर्वचा हस्तक अनाथ म्हणाला, " जें कांहीं द्यायचं असेल तें देऊन टाका. आम्हांला आतां बसायला वेळ नाहीं. "

एकादशीनें यादी हातीं घेतली आणि जवळजवळ पंधरा मिनिटेंपर्यंत काळजीपूर्वक त्यानें तिचें निरीक्षण केलें. शेवटीं एक सुस्कारा टाकून यादी परत देत तो म्हणाला, " मी म्हातारा माणूस, माझ्याकडे कसली वर्गणी मागतां ? "

कसाबसा राग गिळून अपूर्व म्हणाला, " म्हाताऱ्यांनीं पैसे द्यायचे नाहींत, तर काय पाळण्यांतल्या बाळाकडे पैसे मागायचे ? "

या प्रश्नाचें सरळ उत्तर न देतां एकादशी म्हणाला, " आज वीस वर्ष ही शाळा चालू आहे, मग आजवर कुणीच कशी लायब्ररीची गोष्ट काढली नाहीं बाबानों ? तें जाऊं दे. तसं हें काम कांहीं अगदीं वाईट नाहीं. प्रत्यक्ष माझीं पोरं पुस्तकं वाचोत कीं न वाचोत, पण माझ्या गांवचीं चार मुलं तर वाचतील ? होय कीं नाहीं घोषाळमहाशय ? " घोषाळ मान हलवून काय म्हणाला तें कांहीं कुणाला कळलें नाहीं. एकादशी म्हणाला. "—ठीक, ठीक, वर्गणी द्यायला माझी हरकत नाहीं. केव्हां तरी एक दिवस येऊन चार आणे घेऊन जा. कसं घोषाळ ? यापेक्षां कमी देणं बरं दिसायचं नाहीं. एवढ्या दूर अंतरावरून मुलं पायपीट करीत आलीं ! कसं का असेना, चार लोक नांव घेतात ना ? आणखी पुष्कळ लोक आहेत इथं—त्यांच्याकडे तर हे गेले नाहींत ! असंच कीं नाहीं ? "

अपूर्व इतका संतापला होता, कीं त्याच्या तोंडून शब्द बाहेर फुटेना. अनाथ म्हणाला, " या चार आण्यांसाठीं का आम्ही एवढे दूरवर आलों ? अन् ते चार आणे सुद्धां आज नव्हे, केव्हां तरी एकदां येऊन घेऊन जायचे ! "

'चुक्-चुक्' करीत माथें हलवीत एकादशी म्हणाला, " हक्काच्या व्याजाचे सहा पैसे वसूल करण्यासाठीं मला आतां केवढी ओढाताण करावी

लागली तें पाहिलंत ना तुम्हीच ? आतां ही तागाची विक्री झाल्याशिवाय वर्गणीचे पैसे द्यायची सोय—"

रागानें अपूर्वचे ओठ थरथर कापूं लागले. तो म्हणाला, "वेळ आली तर आजसुद्धां न्हावीधोबी बंद करूं. बेटा पिशाच्च ! अंगभर मुद्रा मारून जात बुडवून वैष्णव झालाय ! ठीक आहे !—"

विपिन उठून उभा राहिला आणि बोट दाखवून बजावून म्हणाला, "ध्यानांत ठेव, या बारुईपूरचे राखालदासबाबू आमच्या नात्याचे आहेत—बरं का बैरागी !"

या अनपेक्षित प्रकारामुळें बिचारा म्हातारा बैरागी हतबुद्ध होऊन पहात राहिला. एकाएकीं हीं मुलें अशीं कां पिसाळलीं याची त्याला कल्पनाच होईना.

अपूर्व म्हणाला, "गरीबांचं रक्त पिळून खाल्लंयस तें पुन्हां ओकवायला लावूं तेव्हां सोडूं !"

नफर अजूनही बसून होता. कनवटीचे पैसे सोडून काढल्याचा राग अजूनही त्याच्या मनात सळमळत होता. तो म्हणाला, "अगदीं बरोबर बोललांत तुम्ही बाबू. बैरागी नव्हे, ग्वबीस आहे हा ! माझे दोन पैसे कसे ओकवले ते पाहिलेत ना तुम्हीं ?"

सर्वांदेखत म्हाताऱ्याची चांगलीच फजिती झाल्याचें पाहून सर्वांनाच मनांतल्या मनांत आनंद वाटला. त्याच्या मुद्रेवरचा परिणाम पाहून विनिन देखील मोठ्या जोरात आला आणि बसलेल्या लोकांना डोळा घालून म्हणाला, "अंदरकी बात तुम्हांला माहीत नाहीं—आम्ही याच्या गांवचे लोक—सारं कांहीं माहीत आहे आम्हाला. काय रे म्हाताऱ्या, कां तुला वाळींत टाकलं होतं आमच्या गांवीं, तें सांगशील का यांना ?"

ती गोष्ट जुनी होती. एकादशीचा जन्म गवळ्याच्या कुळांत झाला होता. त्याची मूळ जात वैष्णव नव्हती हें सर्वांना माहीत होतें. त्याची एक सावत्र बहिण केव्हां तरी वांकडें पाऊल पडून परागंदा झाली होती. पुष्कळ प्रयत्न करून एकादशीनें तिला परत आपल्या घरीं आणलें होतें. या अत्याचाराबद्दल गांवचे सारे लोक त्याच्यावर चिडून उठले होते. तरीही आईबाप नसलेल्या या आपल्या छोट्या सावत्र बहिणीला टाकून द्यायला तो तयार होईना. त्याचें

जवळचें असें नात्याचें कुणी नव्हतें. लहानपणापासून या मुलीला त्यानें आपल्या अंगाखांद्यावर वाढवलें होतें. मोठ्या थाटांत त्यानें तिचें लग्न लावून दिलें होतें. लहानपणींच विधवा झाल्यामुळें ती पुन्हां आपल्या दादाच्या घरीं येऊन सुखासमाधानांत राहूं लागली होती.

वयाच्या म्हणा किंवा बुद्धीच्या म्हणा, दोषामुळें या पोरीचें पाऊल वाकडें पडलें तेव्हां म्हाताऱ्यानें रडून भुई थोडी केली. खाणेंपिणें टाकून गांवोगांव शहरोशहरीं धुंडतां धुंडतां शेवटीं जेव्हां ती त्याला सांपडली, त्यावेळीं तिला घेऊन तो घरीं आला. गांवांतल्या उपद्व्यापी लोकांना तेवढेंच कारण मिळालें. पण झाल्या चुकीमुळें खचलेली, पश्चात्तापानें पोळलेली, ही आपली अभागी बहिण घराबाहेर घालवून देऊन प्रायश्चित्त करून जातगंगेकडून पावन व्हायला एकादशी मुळींच तयार होईना.

गांवच्या लोकांनीं त्याला वाळींत टाकलें. न्हावीधोबी, गुडगुडीपाणी बंद केलें. तेव्हा निरुपाय होऊन एकादशीनें वैष्णवाची दीक्षा घेतली आणि गांव सोडून तो बारुईपूरला येऊन राहिला.

ही हकिकत सर्वांना माहीत होती. पण ही कुणाची तरी कुटाळ कहाणी कुणाच्या तरी तोंडून पुन्हां एकदां ऐकण्याचा आनंद अनुभवण्यासाठीं सारेच उत्सुक झाले होते. बिचारा एकादशी लाजेनें आणि भीतीनें मेल्याहून मेल्या-सारखा झाला होता. स्वत:साठीं नव्हे—आपल्या छोट्या बहिणीच्या अब्रूसाठीं! तारुण्यांत पहिलें पाऊल टाकतांच गौरीच्या हृदयाला जी भयंकर जखम झाली होती ती अजूनही तितकीच ओली होती, एक तिळभरसुद्धां वाळली नव्हती, हें म्हातारा जाणून होता. कुणीतरी कांहींतरी बोलेल, तिच्या तें कानीं जाईल आणि तिची ती जखम पुन्हा फांकेल, या भीतीनें काळवंडलेल्या चेहऱ्यानें तो मुकाट्यानें सर्वांकडे पहात बसला होता. त्याची ही काकुळतवाणी मनस्थिति इतर कुणाच्याही नजरेला आली नाहीं. पण त्याच्या चेहऱ्याकडे पहातांच अपूर्वला ती जाणवली आणि म्हणूनच तो आश्चर्यचकित झाला.

विपिन बोलत होता, "—दोन कोस पायपीट करीत भर उन्हांतून आम्ही आलों, ते काय चार आण्यांची भीक मागायला? इतकी काय भीक लागलीय आम्हांला? अन् ते चार आणे सुद्धां आज मिळायचे नाहींत - तर केव्हांतरी याच्या तागाची विक्री होणार, आम्ही ती बातमी मिळवायची, मग यायचं

न्हा अशीच पायपीट करीत, तेव्हां मिळणार ! अन तेंसुद्धां बाबूजीनं दया केली तर ! व्याजाच्या पैशापायीं लोकांचं रक्त चोखून खाणाऱ्या या म्हाताऱ्याला काय वाटतं ? नुसता दम देऊन काम भागेलसं वाटतं याला ? ध्यानांत ठेव म्हणावं, इथल्या इथं तुझीं हाडं खुमळून काढलीं नाहींत तर माझं नांव विपिन भट्टाचार्यच नव्हे ! किती झालं तरी शूद्र माणूस, पैसा मिळाल्याबरोबर डोळे फिरले ! चल रे अपूर्व, चल आपण जाऊं. पुढं काय करायचं तें पाहून घेऊं !" असें म्हणून त्यानें अपूर्वचा हात ओढला.

अकरा वाजून गेले होते. एवढा लांब पल्ला पायींपायींच गाठीत आल्यामुळें यापूर्वीच अपूर्वला तहान लागली होती म्हणून त्यानें नोकराला सांगून पाणी मागवलें होतें. त्यानंतर हा तंटा सुरू झाला तेव्हां ती गोष्ट तो विसरून गेला होता. एका हातांत पाण्याचा तांब्या आणि दुसऱ्या हातांतल्या थाळींत बत्तासे घेऊन एक सत्तावीस अठ्ठावीस वर्षांची विधवा मुलगी, बाजूचा दरवाजा पायानें उघडून, आंत आली त्यावेंळीं आपण पाणी मागवल्याचें त्याला आठवलें.

गौरी कांहीं शूद्राच्या मुलीसारखी दिसत नव्हती. नुकतीच स्नान करून ती पूजेला बसलेली असावी. ती पीतांबर नेसली होती. बाहेर आलेला ब्राह्मण पाणी मागतो आहे असें नोकराच्या तोंडून कळल्यामुळें ती पूजा टाकून बाहेर आली होती.

तिनें विचारलें, " आपणांपैकीं कुणी पाणी मागितलं होतं ? "

विपिन उद्गारला, " पीतांबर नेसून आलीस म्हणजे तुझ्या हातचं पाणी आम्ही पिऊं असं का वाटलं तुला ? अपूर्व, हीच बरं ती विद्याधरी ! "

तिच्या हातची बत्ताशांची थाळी एकदम खालीं पडली ! तिच्या चेहऱ्यावर आलेली कळा पाहून अपूर्व देखील मनांतल्या मनांत शरमिंदा झाला. रागा-रागानें विपिनला एक कोपरखळी मारून तो म्हणाला, " काय माकडचेष्टा लावल्या आहेस ? कांहीं रीतभात आहे कीं नाहीं तुला ? "

विपिन होता खेड्यांतला माणूस. तंटेभाडणाचा प्रश्न आला, कुणाचा तरी पाणउतारा करायची संधि मिळाली, कीं स्त्री-पुरुष, लहान-मोठा असले भेदाभेद न पहाणारा तो होता एक निरपेक्ष वीरपुरुष. अपूर्वची कोपरखळी मिळाल्यामुळें तो अधिकच चिडला आणि एवढाले डोळे करून म्हणाला,

" कां ? खोटं बोलतोय कीं काय ? ब्राह्मणासाठीं प्यायला पाणी ही आणते ? शर्थ नाहीं का हिची ? भर बाजारात हिची हंडी फोडीन तें माहीत आहे का हिला ? "

ही वादविवाद करण्याची वेळ नव्हे असा विचार करून अपूर्वनें माघार घेतली. उगीच अपमानाची मात्रा वाढेल, कमी होणार नाहीं, असा विचार करून तो म्हणाला. " मीच पाणी आणायला सांगितलं होतं विपिन. तुला माहीत नव्हतं तें. उगीच कशाला झगडा करतोस ? चल आपण जाऊं. "

कुणाकडेसुद्धां न पहतां गौरीनें खालीं पडलेली थाळी उचलून घेतली. ती मुकाट्यानें जाऊन दाराआड उभी राहिली आणि नंतर तिथून म्हणाली, " दादा, हे लोक कसली वर्गणी मागायला आले होते ती दिलीस का तूं ? "

हा वेळपर्यंत एकादशी वेड्यापिशासारखा होऊन बसला होता, तो बहिणीच्या हाकेनें भानावर आला आणि म्हणाला, " नाहीं. आतां देतों ना ताई ! "— अपूर्वला उद्देशून हात जोडून तो म्हणाला, " बाबूमहाशय, मी गरीब माणूस. चार आणेच मला भारी आहेत. कृपा करून एवढे घ्याल ना ? "

विपिन पुन्हां चिडून कांहीतरी वाईटसाईट बोलणार होता, त्याला अपूर्वनें खुणेनें गप्प बसायला लावलें. तरीही एवढा सगळा प्रकार झाल्यावर अजूनही हा माणूस चार आण्यांची गोष्ट बोलतो आहे, असें पाहून त्याला स्वतःलाही त्याचा तिटकारा आला होता. राग आवरून तो म्हणाला, " राहूं दे बैरागी— बुवा, तुमच्याकडून कांहींच नको आम्हांला. "

एकादशीला कळून चुकलें कीं ही रागाची भाषा होती. एक सुस्कारा सोडून तो म्हणाला, " कलिकाल आहे झालं ! अडचणींत माणूस सांपडलं कीं त्याची हाडें मोडायला सोडतोय का कुणी ! घोषाळमहाशय, द्या. पांच आणे खाते- वहीला खर्ची घाला. यापेक्षां जास्त काय करायचं ? " असें म्हणून बैराग्यानें पुन्हां एकदां मोठा सुस्कारा सोडला.

त्याची मुद्रा पाहून आतां अपूर्वला हंसूं लोटलें. या कंजूष म्हाताऱ्याच्या नजरेनें चार आणे आणि पाच आणे यांच्यामधला फरक केवढा मोठा होता याची त्याला कल्पना आली होती. उगीच थोडेंसें हंसून तो म्हणाला, " आतां

राहूं दे. कांहींच नको द्यायला तुम्हाला. असे चारपांच आणे आम्ही घेत नाहीं कुणाकडून. आम्ही चाललों."

या चारपांच आण्यांच्या बाबतींत दाराच्या आडून कांहींतरी बोलणें ऐकूं येईल अशी अपूर्वची अपेक्षा होती. तिच्या पदराचें टोंक अजूनही दाराआड दिसत होतें. पण ती कांहींच बोलली नाहीं. जायच्यापूर्वी अपूर्व खरोखरच रागारागानें आपल्याशीं म्हणाला, "खरोखरच हीं माणसं हलकट आहेत. दानाच्या बाबतींत यांच्या मनाची मजल चारपांच आण्यांपलीकडे जात नाहीं. यांना पैसाच प्राणासारखा वाटतो. यांचं हाडमांस म्हणजे पैसा. हीं माणसं पैशासाठीं काय वाटेल तें करायला मागंपुढं पहायचीं नाहींत."

साऱ्या मंडळीसह जाण्यासाठीं अपूर्व उठून उभा राहिला. तितक्यांत अनाथबाबूची दृष्टि तिथें असलेल्या एका दहा अकरा वर्षांच्या मुलाकडे गेली. त्या मुलाच्या गळयांत उत्तरीय होतें, त्यावरून तो सुतकांत असावा. बाप किंवा असाच कुणीतरी त्याचा अगदीं जवळचा नातेवाईक मेलेला असावा. त्याची विधवा आई पडवीच्या भिंतीआड बसलेली होती. आश्चर्यचकित होत अनाथनें विचारलें, "अरे पूंट्या, तूं रे कुठं इकडे?"

बोटानें दाखवून पूंट्या म्हणाला, "माझी आई बसलीय तिथं. ती म्हणते, आमचे बरेचसे पैसे जमा आहेत यांच्याकडे." असं म्हणून त्यानें एकादशीकडे बोट केलें.

तें ऐकून सारेच आश्चर्यचकित झाले. हें प्रकरण काय आहे हें समजून घेण्याच्या जिज्ञासेनें सारेच थांबून राहिले. तहानेनं जीव कासावीस होत होता तरीही अपूर्व देखील विपिनचा हात धरून पुन्हा खालीं बसला.

एकादशीनें विचारलें, "तुझं नांव काय रे बाळ? घर कुठं तुझं?"

मुलगा म्हणाला, "माझं नांव शशधर. माझं घर यांच्याच गावीं—कालीदोहला."

"तुझ्या बापाचं नांव काय रे?"

मुलाच्या वतीनें उत्तर देण्यासाठीं अनाथ पुढें सरसावला. तो म्हणाला, "याचा बाप मरून पुष्कळ दिवस झाले. याचा आजोबा रामलोचन चतर्जी. त्याचा मुलगा—म्हणजे या मुलाचा बाप—मेला तेव्हा तो कुठं तरी निघून

गेला होता. सात वर्षे त्याचा पत्ता नव्हता. एक महिन्यापूर्वी तो आला. परवांच्या दिवशीं यांच्या घराला आग लागली. आग विझवायचा प्रयत्न करताना म्हातारा जळून मेला. आता या नातवाशिवाय त्याचा कुणी वारस नाहीं."

ती हकिकत ऐकून सर्वांनाच वाईट वाटलें. एकादशी मात्र उगीच बसून राहिला होता. थोड्या वेळानें त्यानें विचारलें, "पैशाची पावती आहे का? तुझ्या आईला विचारून ये पाहूं."

आईला विचारून येऊन मुलगा म्हणाला, "कागदपत्र कांहींसुद्धा नाहीं. सारं जळून गेलं."

एकादशीनें विचारलें, "किती रक्कम आहे?"

आतां ती विधवा पुढें आली आणि माथ्यावरचा पदर बराच पुढें ओढून म्हणाली, "मरायच्या पूर्वी त्यानीं सांगितलं होतं, कीं पांचशें रुपये तुमच्याकडे ठेवून आजोबा तीर्थयात्रेला गेले होते म्हणून. आम्ही अगदीं गरीब माणसं आहोंत बाबा. हवी तर सारी रक्कम देऊं नका. भिक्षा म्हणून कांहींतरी द्या." असें म्हणून ती विधवा स्फुंदस्फुंदून रडूं लागली.

हा वेळपर्यंत घोषाळमहाशय खातेवह्या बाजूला ठेवून मन लावून तिचें भाषण ऐकत होते, ते पुढें होऊन म्हणाले, "असं पहा, कुणी साक्षीबिक्षी आहेत?"

विधवा म्हणाली, "नाहीं. आम्हाला तरी कुठं माहीत होतं? आजोबांनीं गुपचुप पैसे इथं आणून जमा केले होते."

गालांतल्या गालात हंसत घोषाळ म्हणाले, "नुसतं रडलं म्हणून काय होणार बाई? भल्यामोठ्या रकमेचा प्रश्न आहे हा. पावती नाहीं, साक्षीदार नाहीं, मग रक्कम कशी मिळेल?"

बिचारी विधवा फुलून फुलून रडत होती. या रडण्याचा परिणाम काय होणार, तें सर्वांना कळून चुकलें होतें.—आतां एकादशी पुढें आला आणि घोषाळला उद्देशून म्हणाला, "कुणीतरी पांचशें रुपये आणून दिल्याचं मला आठवतं. ते कांहीं नेले नाहींत त्यानं. जुन्या खातेवह्या काढून एकदां शोधून पहा पाहूं, कुठं नोंदबिंद मिळते कीं काय?"

घोषाळमहाशय सणसणून उद्गारले, "एवढ्या जुन्या कबरींतलीं भुतं उकरून काढायला वेळ कुणाला आहे बाबूजी ? लेग्व नाहीं, चराटी नाहीं, माक्ष नाहीं—"

त्याचें वाक्य पुरें होण्यापूर्वीच दाराच्या आडून जबाब आला, "चिठीपत्र नाहीं म्हणून ब्राह्मणाचे पैसे बुडवायचे कीं काय ? जुन्या खातेवह्या पहा ना. तुम्हाला वेळ नसेल तर माझ्याकडे द्या. मी पहातें."

सारे आश्चर्यचकित होऊन दाराकडे पाहूं लागले. पण हा हुकूम देणारी व्यक्ति कांहीं कुणाच्या नजरेस आली नाहीं.

घोषाळ नरम येऊन म्हणाले, "किती वर्षं झाली आहेत कोण जाणे ताई ! इतक्या दिवसाच्या खातेवह्या धुंडाळणं कांहीं सोपं काम नाहीं. ही रास आहे खातेवह्यांची ! असेल जमा तर मिळेल की नोंद !—" विधवेला उद्देशून तो म्हणाला, "तूं रडूं नको बाई. असेल तुझा पैसा तर मिळून जाईल. असं कर, उद्यां आमच्या घरीं ये, मग साऱ्या खाणाखुणा विचारून घेईन आणि खातेवह्यांत करूं मग शोध. असं घाईघाईनं व्हायचं नाहीं तें काम ?"

लगेच कबुली देऊन ती विधवा म्हणाली, "बरं बाबा, उद्या सकाळीं तुमच्या तिकडेच येतें."

"ये हं." असें म्हणून घोषाळमहाशयांनीं समोरची खातेवही बंद करून त्या दिवसाचें काम संपवलें.

खाणाखुणा विचारण्यासाठीं त्या विधवेला आपल्या घरीं बोलावण्याचा त्याचा उद्देश उघड होता. दाराआडून गौरी म्हणाली, "आठ वर्षांपूर्वी का ?—मग १३०१ सालच्या खातेवह्या काढून पहा बरं पैसे जमा आहेत कीं नाहींत ते ?"

घोषाळ म्हणाले, "एवढी कसली घाई आली आहे आतांच ?"

गौरी म्हणाली, "माझ्याकडे द्या वह्या. मी काढून देतें. ब्राह्मणाची बाई, दोन कोस पायपीट करीत आली, पुन्हा या भरल्या उन्हांतून आता दोन कोस चालत जाणार, आणि पुन्हां तिनं उद्यां आपल्या तिकडे यायचं, एवढी दगदग करायची काय जरुरी घोषाळकाका ?"

एकादशी म्हणाला, "खरंच तर घोषाळमहाशय, ब्राह्मणाच्या बाईला निष्कारण त्रास देणं बरं का ? द्या, द्या, झटपट काढून द्या."

संतापलेले घोषाळबाबू हातपाय आपटीत शेजारच्या खोलींत गेले आणि १३०१ सालच्या खातेवह्या घेऊन बाहेर आले. दहा बारा मिनिटें पानें उलटून झाल्यावर ते एकदम खूष होऊन म्हणाले, " काय आमच्या गौरी-माईची तीक्ष्ण बुद्धि ! अगदीं याच खातेवहींत मिळाली कीं जमेची नोंद. हें पहा रामलोचन चतर्जींचे जमा पांचशें—"

एकादशी म्हणाला, " हं. झटपट व्याजाचा आकार करा पाहूं घोषाळ-महाशय. "

घोषाळ आश्चर्यचकित होऊन म्हणाले, " आणखी व्याज ? "

एकादशी म्हणाला, " अर्थात् ! नको का द्यायला ? तो पैसा खेळता राह्यलाय ना ? गाडून तर ठेवला नव्हता ! आठ वर्षांचं व्याज —आणखी वर किती महिने गेले आहेत पहा पाहूं. "

हिशेब करतांना व्याज मुद्दल मिळून साडेसातशें रुपये झाले. बहिणीला उद्देशून एकादशी म्हणाला, " ताई, संदुकींतले पैसे घेऊन ये पाहूं. बरं. बाई, सारी रक्कम एकदाच घेऊन जाणार का ? "

विधवेच्या अन्तरींचा बोल त्या अन्तर्यामी भगवंतालाच ऐकूं आला !

डोळे पुसून ती म्हणाली, " यावेळीं एवढे पैसे कांहीं नकोत मला. सध्यां मला पन्नास रुपये पुरेत. "

" मग घेऊन जा ते बाई. घोषाळमहाशय, ती खातेवही इकडे द्या पाहूं. सही करतो तिच्यावर—आणि बाकी रकमेची पावती करून देऊंया तिला. "

घोषाळ म्हणाले, " मीच देतों सही करून. तुम्हाला कशाला—"

एकादशी म्हणाला, " नाहीं, नाहीं. ती खातेवही इकडे द्या. माझ्या डोळ्यानं पाहून घेऊं दे मला—" असें म्हणून खातेवही घेऊन पाहून एक मिनिटभऱ्यानें डोळे मिटून तो हंसूं लागला आणि म्हणाला, " घोषाळमहाशय, त्या ब्राह्मणाच्या नांवानं ही एक मोत्याची जोडी जमा आहे ना ? मला माहीत आहे तें ! आमच्या घोषाळमहाशयांना साऱ्याच वेळीं साऱ्याच गोष्टी कांहीं डोळ्यांना नीटशा दिसत नाहींत !—" असें म्हणून एकादशी दरवाजाकडे पाहून हंसला. एवढ्या लोकांच्या समोर धन्यानें घेतलेल्या या चिमट्यानें घोषाळबाबूंचा चेहरा काळवंडून गेला.

ही सारी भानगड उरकल्यानंतर आपल्या दोस्तांना घेऊन अपूर्व ज्यावेळीं सळसळत्या उन्हांतून जायला निघाला त्यावेळीं त्याच्या मनांत कसलें तरी काहूर माजलें होतें. घोषाळ बरोबर होते. ते मोठ्या आदरानें आमंत्रण देऊन म्हणाले, "या ना, गरीबाघरचं थोडं गूळपाणी खाऊन जा ना."

एक शब्दसुद्धां न बोलतां अपूर्व त्याच्याबरोबर जायला निघाला.

घोषाळच्या अंगाची आग झाली होती. धन्याला उद्देशून तो म्हणाला, "पाह्यलंत ? या हलकट माणसाची दानत पाह्यलीत ? हरामजाद्याच्या बेचाळीस पूर्वजांचं भाग्य म्हणून आपल्यासारख्या ब्राह्मणसंतानांची पायधूळ त्याच्या घरीं पडली. बेटा संतान कीं नाहीं ! पांच आण्याचे पैसे देऊन भिकाऱ्यासारखा घालवून द्यायला पहात होता."

विपिन म्हणाला, "जरा दोन दिवस थांबा. हरामजाद्याचे न्हावीधोबी बंद करून पांच आणे कसे बाहेर काढतों ते पहा. राखालबाबू आमचे पाहुणे आहेत, हें विसरूं नका घोषाळमहाशय."

घोषाळ म्हणाले, "मी एक ब्राह्मण. सकाळसंध्याकाळ संध्यापूजा केल्या-शिवाय कधीं पाणी घालीत नाहीं तोंडांत. भरदुपारीं दोन मोत्यांसाठीं कशी माझी अब्रू घेतली म्हाताऱ्यानं, तें पाहिलंत ना तुम्हींच ? कधीं कल्याण व्हायचं नाहीं बेस्याचं ! अगदीं माझा शाप आहे हा ! अन् ती कारटी—तिला शिवलं तर आंघोळ करावी लागेल—त्या कारटीनं येऊन ब्राह्मणाला प्यायला पाणी द्यायचं होय ? पैशाची गुर्मी कशी चढते तें एकदां बघून घ्या चांगलं !"

हें भाषण चाललें असतां अपूर्वनें त्यांत मुळींच तोंड घातलें नव्हतें. तो रस्त्यांत एकदम मधेंच थांबला आणि म्हणाला, "अनाथ, मी मागं जातों बाबा, मला भारी तहान लागली आहे."

घोषाळ चकित होऊन म्हणाले, "आतां मागं कुठं जातां ? हें तर आमचं घर दिसतंय समोर."

अपूर्व नकार देत म्हणाला, "यांना घेऊन जा आपण. मी एकादशीच्याच घरीं जाणार पाणी प्यायला."

“ एकादशीच्या घरीं पाणी प्यायला ? ” सारेच डोळे वटारून पहात राहिले.

त्याचा हात धरून हिसडा मारून विपिन म्हणाला, “ भर दुपारच्या उन्हांत हीं पुरे झालीं तुझीं ढोंगं ! तोंड तरी पहा. एकादशीच्या बहिणीच्या हातचं पाणी का तूं पिणार ? ”

हात सोडवून घेऊन अपूर्व निकरानं म्हणाला, “ हो. खरोखर तें पाणी राहिलंय तिथं— तें पिऊन यायचंय् मला, तुम्ही जा घोषाळमहाशयाच्या घरीं. मी तिकडे जाऊन येतों आणि या झाडाखालीं तुमची वाट पहातो. ”

त्याचें तें आणीबाणीचें भाषण ऐकून हतबुद्ध होऊन घोषाळ म्हणाले, “ पण मग प्रायश्चित्त करावं लागेल तें माहीत आहे ना ? ”

अनाथ म्हणाला, “ वेड लागलं कीं काय तुला ? ”

अपूर्व म्हणाला, “ कोण जाणे !—प्रायश्चित्त करायचं असल तर तें मग पाहून घेऊं ! पण आतां मी निघालों—”

असें म्हणून त्या तडतडत्या उन्हांतून भराभर पावलें टाकीत तो एकादशी बैराग्याच्या घराच्या दिशेनें चालता झाला.